॥ श्रीगजाननप्रसन्न ॥

# हातीमताईचरित्र.



॥ परदुःखेन दुःखिता विरलाः ॥

फार वर्षांमागें खुरासान प्रांतांत एक नामांकित **बादशाहा** राज्य करीत होता. त्याचे पदरीं अष्टप्रधान आदिकरून मुत्सद्दी व लाखो सेना अष्टौप्रहर आपापल्या कामांत तत्पर असे. त्याच्या राज्यांत वाघ आणि बकरीं एके ठिकाणीं पाणी पीत असून न्यायाच्या कामांत प्रत्यक्ष तो आपल्या मुलाचीही क्षमा करीत नसे. त्याच वेळीं त्या शहरांत **बरजख** या नांवाचा एक सौदागर धनवान व उदारबुद्धीचा असा रहात असे. तो आपले गुमास्ते निरनिराळ्या अनेक शहरीं व्यापाराकरितां पाठवून आपला व्यापार चालवी असे. त्याची व राजाची अतिशय मैत्री असून एकमेकास ते फार चाहात असत. पुढें कांहीं दिवसांनीं तो सौदागर जेव्हां अगदीं मरणोन्मुख झाला तेव्हां त्यानें राजाला बोलावून आपल्या पदरची एक द्वादश वार्षिकी **हस्नबानू** नांवाच्या कन्येस सर्व दौलतीसह त्याचे स्वाधीन केलें व आपण परलोकवासी झाला. राजानेंही **हस्नबानू**चें आपल्या पोटच्या मुली प्रमाणेंच पालन केलें, आणि तिच्या दौलतीचा अपस्वार्थीपणा केला नाहीं.

कांहीं दिवस गेल्यावर **हस्नबानू** तारुण्यांत आली, तेव्हां एके दिवशीं तिनें आपल्या दाईस ह्मटलें कीं, हे आई, ह्या सृष्टीचा कारभार पाण्यावरच्या बुडबुड्या प्रमाणें आहे. यास्तव ही सर्व दौलत घेऊन मी एकटी काय करूं ? मला असें वाटतें कीं, ही सर्व संपत्ति परमेश्वराचे नांवानें दानधर्म करून रात्रंदिवस परमेश्वराचे सेवेंत कालक्रमण करावें, व ह्या मायिक जगसौख्यापासून अलिप्त रहावें. आतां तूं माझ्या आईच्याच ठिकाणीं आहेस. ( कारण

हस्नबानूची खरी आई लहानपणींच वारल्यामुळें ती नेहमीं दाई-जवळच असे ह्यामुळें ती तिलाच आई असें समजे. ) सबब ह्या माझ्या विचारास कांहींतरी इलाज सांग. हें तिचें भाषण ऐकून दाई मोठ्या प्रेमानें ह्मणाली:—हे मुली, मला एका साधूच्या कृपेनें सात प्रश्न माहीत आहेत. ते सातही प्रश्न एका कागदावर लिहून तूं आपल्या दरवाज्यावर चिकटव; व त्या प्रश्नांचा जो कोणी जबाब देईल त्याजबरोबर विवाह रज्जूनें बद्ध होऊन रहा ह्मणजे सुखी होशील.

दाईचें हें भाषण ऐकून **हस्नबानू** ह्मणाली:—आई, माझ्यावर मेहेरबानी करून ते सात प्रश्न काय आहेत हें मला सांग. तेव्हां दायी ह्मणाली:—

**प्रश्न १ लाः—" एक वेळ पाहिलें आहे, पण पुन्हां पाहण्याची हौस आहे."**

**प्र० २ राः—" चांगलें कर व पाण्यावर टाक."**

**प्र० ३ राः—" कोणाशीं दगा करूं नकोस. करशील तर तसें फळ पावशील."**

**प्र० ४ थाः—" खरें बोलणारा नेहमीं सुखी असतो."**

**प्र० ५ वाः—" 'कोहानिदा' असा आवाज करणाऱ्या पहाडाची गुप्त खबर काय आहे?"**

**प्र० ६ वाः—"एक मोतीं जें पाण्यांत राहणाऱ्या कोंबड्याच्या अंड्या एवढें असून हल्लीं माझ्याजवळ आहे त्याच्या जोडीचें दुसरें आण."**

**प्र० ७ वाः—" हमाम बादगिर्दची खबर आण."**

दाईच्या तोंडचे हे सातही प्रश्न ऐकून बानूनें मनांत विचार केला कीं, असा कोण ज्ञानवान पुरुष आहे कीं, तो माझ्या सातही प्रश्नांचा निकाल करील व मी त्याजबरोबर विवाह करून सुखांत कालक्रमण करीन. ह्याच गोष्टीच्या विचारांत पुढें ती आपल्या आयुष्याचे दिवस कंठीत असे.

पुढें एके दिवशीं असें झालें कीं, **बानू** आपल्या वाड्यांत खिडकींत उभी राहून बाजारची व रस्त्याची गम्मत पहात असतां एक

बयातीत **साधू** आपल्या चाळीस शिष्यांसहवर्तमान रस्त्यावरून चालला होता. तो चालत असतां त्याचे शिष्य सोन्यारुप्याच्या विटा त्याचे पुढें ठेवीत व त्याजवरून तो चालत असे. हा अजब चमत्कार पाहून त्या गोष्टीचें **बानू**ला फारच आश्चर्य वाटलें. व तिनें आपल्या दाईला बोलावून त्या साधूच्या अशा कृतीचें कारण विचारलें.

तेव्हां दाई ह्मणालीः—हे मुली, हा **साधू** राजाचा गुरु आहे. महिन्यांतून दोन चार वेळां राजा त्याचे दर्शनास जात असतो. केव्हां केव्हां हा **साधू**ही राजाच्या भेटीला जात असतो. हें तिचें भाषण ऐकून **बानू** ह्मणाली, आई, तूं जर मला परवानगी देशील तर मी ह्या **साधू**ला आपल्या घरीं बोलावून मेजवानी करीन व त्याचे चरणारविंदीं लीन होईन. दाई ह्मणालीः—फार उत्तम आहे. तुझ्या मर्जीस वाटेल तेव्हां त्यास आपल्या येथें बोलीव.

पुढें एके दिवशीं **बानू**नें आपल्या सेवकाबरोबर **साधू**स असा निरोप पाठविला कीं, मजवर कृपा करून आपल्या चरणधूलिकेनें माझें गृह पुनीत करून दर्शन दिलें असतां मी आपल्याला मोठी भाग्यवान समजेन. **साधू**नें हा निरोप मान्य केला व तो ह्मणाला, आह्मां **साधूं**ना जर कोणी बोलाविलें तर त्याचे घरीं न जाणें हें आह्मांला योग्य नाहीं. कारण, जर आह्मी त्यांचे येथें गेलों नाहीं तर परमेश्वराचे गुन्हेगार होऊं. यास्तव आज तर मला येण्यास सवड नाहीं, परंतु उद्यां सकाळीं जरूर येईन.

**साधू**चा हा निरोप सेवकानें तावडतोब **बानू**स कळविला. तो ऐकतांच तिला फारच आनंद होऊन तिनें **साधू**स अर्पण करण्याकरितां अनेक तऱ्हेचीं पक्वानें तयार केलीं, व सर्व महाल उत्तम प्रकारें शृंगारून साधुदर्शनास उत्सुक होत्साती ती त्या रात्रीं झोंपी गेली. कांहीं वेळानें कोंबडा ओरडला व प्रभातकाळचीं सर्व चिन्हें एका मागून एक होऊन अरुणानें आपला तांब्र व शुभ्र मिश्रित प्रकाश पृथ्वीतलावर सोडला तेव्हां **बानू**नें आपल्या सेवकांस **साधू**स बोलावूं पाठविलें.

आतां ह्या साधूची ओळख वाचकांस करून दिली पाहिजे.

हे साधू त्याच शहरांतील एक रहिवाशी होते. ह्यांची थोरवी काय वर्णावी ? ह्यांनीं बाहेरून साधूपणाचें घोंगडें पांघरलें होतें परंतु अंतर्यामी हे फार दुष्ट होते. पाषाणहृदयीं मनुष्याच्या हातूनही होऊं शकणार नाहींत अशा ह्यांच्या एकेक कृति असत. ह्यांचे बरोबर जे चाळीस शिष्य होते तेही दुष्ट कर्मीत एकापेक्षां एक सवाई होते. ह्या सर्वांस देहांत शिक्षाही कमीच समजावयाची. परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, अशा प्रकारचे दुष्कर्माचरणी हे साधू असून राजा त्यास फारच पूज्य मानीत असे. कारण, साधुच्या दुष्कर्माचरणाचा कोणालाही पत्ता लागला नव्हता.

इकडे **हस्नबानूनें** देवडीपासून तों तहत दिवाणखान्यापर्यंत भरजरी बैठका घालून तयारी केली. जेव्हां **साधू** त्या बैठकीवरून दिवाणखान्यांत आले व आपल्या सिंहासनावर विराजमान झाले; तेव्हां बानूनें जवाहिरांनीं भरलेलीं ताटें पुढें ठेविलीं व समोर हात जोडून उभी राहिली. जवाहिरांचीं ताटें पाहून **साधू** ह्मणाले:—"हें द्रव्य आमच्या कांहीं उपयोगाचें नाहीं तर यास घेऊन आह्मीं काय करावें? सबब हें मला नको." इतकें बोलणें झाल्यावर **बानूनें** त्या सर्वांस दुसऱ्या दालनांत नेलें आणि मोठमोठे उंची पोषाख सर्वांना दिले, परंतु तेही घेण्याचें **साधुनें** नाकारिलें. नंतर ती सर्व मंडळी तिसऱ्या दालनांत गेली. तेथें सर्व दालनभर जरीचे गालिचे अंथरलेले असून खिडक्यांस जरीच्या नकशीचे पडदे सोडले होते. दालनाचे मधोमध एक सुंदर झुंबर प्रज्वालित केला होता. दरवाज्यांत मोत्यांचा जाळीदार पडदा सोडला होता. आणि सेवक उत्तम तऱ्हेचा पोषाख करून सोन्या रुप्याच्या ताटांत अनेक तऱ्हेचीं पक्वानें व दुसरे खाण्याचे पदार्थ घालून **साधू** व त्याचे शिष्य यांजपुढें तीं ताटें मांडीत होते. नंतर **बानूनें** साधूची अर्घ्यपाद्य पूजा करून प्रार्थना केली कीं, महाराज आपण जवाहीर व पोषाख यांचा तर अंगीकार केला नाहींच, परंतु आतां जर थोडा उपहार कराल तर मी आपणांस फारच कृतकृत्य समजेन.

**हस्नबानूचें** हें भाषण ऐकतांच तो ढोंगी साधू भोजन करूं लागला, परंतु **बानूचें** ऐश्वर्य पाहून त्याजला वैष्म्य वाटून तो आपल्या

मनांत ह्मणालाः—"**बरजख सौदागर** मोठाच श्रीमान् होता. प्रत्यक्ष राजाच्या घरीं संपत्ति व ऐश्वर्य नसेल." असो आज रात्रौ ही सर्व संपत्ति हरण केल्याशिवाय सोडावयाची नाहीं. असा विचार करून व थोडेंसें भोजन करून तो थांबला; तेव्हां सेवकांनीं त्याचें मुख प्रक्षालन केलें. नंतर तो अत्तरगुलाबादि झाल्यावर बानूस उत्तम प्रकारचा आशिर्वाद देऊन साधु महाराज 'बानूची संपती कोणत्या रीतीनें हरण करावी' ह्या गोष्टीचा विचार करीत मार्गस्थ झाले.

इकडे सर्व सेवक व **बानू, साधू** महाराजांच्या सेवेची तयारी करण्याच्या कामीं फारच थकून गेल्यामुळें सूर्यास्त होतांच गाढ निद्रेच्या स्वाधीन झालीं. परंतु मेजवानीच्या थाटाकरितां काढलेली सर्व चिजवस्त जागच्या जागींच पडली होती. सोन्या रुप्याचीं ताटें वगैरे मौल्यवान् जिनसा सुद्धां कोणीही बंदोबस्तानें ठेविल्या नव्हत्या. इतकेंच नव्हे, तर वाड्याचे सर्व दरवाजेही त्या दिवशीं उघडेच होते. मध्यरात्रीचे सुमारास तो ढोंगी **साधू** आपल्या चाळीस शिष्यगणांसह **बानूच्या** घरांत शिरला, आणि ज्याच्या जें हातीं लागेल तें त्यानें लांबविण्याचा सपाटा लाविला. इतक्यांत कांहीं सेवक जागे होऊन त्यांस प्रतिबंध करूं लागले, परंतु त्या पाषाणहृदयी साधुवर्गांनीं कित्येकांस ठार मारून व कित्येकांस जखमी करून **बानूची** सर्व दौलत पसार केली.

हा सर्व प्रकार त्या वेळीं **बानू** आपल्या महालाच्या खिडकींतून पहात होती. जेव्हां तिनें त्या साधूचें हें कृत्य पाहिलें तेव्हा मनांत विचार केला कीं, ज्याला मी इतकावेळ पूज्य असें समजत होतें व जो सर्व शहरभर ढोंग माजवून राजाचा गुरु असें ह्मणवितो त्याच्या पारिपत्याचा कांहींतरी उपाय केला पाहिजे. अशा प्रकारच्या विचारांत तिनें शेष रात्र क्रमिल्यावर प्रभातकाळीं जखमी झालेले व मृत झालेले सेवक डोलींत घालून ती राजवाड्यांत गेली, आणि दरबारांत उभी राहून दीनमुद्रेनें राजाजवळ दाद मागूं लागली. तेव्हां राजा ह्मणालाः—प्रधानजी, ही स्त्री कोणाच्या त्रासानें त्रस्त होऊन रडत रडत फिर्याद घेऊन आली आहे याचा

तपास करा. एकंदर तपास करून प्रधान ह्मणाला; खुदावंत, ही आपल्याच शहरांतील परलोकवासी झालेल्या **बरजख सौदागरा**ची कन्या असून जिला आपण कन्येप्रमाणें समजतां, तीच **हुस्नबानू** आहे. हिनें मृत झालेले व जखमी झालेले सेवक डोलींत घालून येथें आणले आहेत व "आपण सन्निध बोलविल्यास मी आपली सर्व हकीगत सांगेन" असा अर्ज करीत आहे. हें ऐकतांच राजानें **हुस्नबानू**स जवळ बोलावून आपली हकीगत सांगण्या विषयीं आज्ञा केली. तेव्हां ती ह्मणालीः—**खुदावंत**, मी जी आपली हकीगत सांगणार आहें ती मेहेरबानी करून ऐका. 'मी काल एका साधूस आपल्या घरीं भोजनास बोलाविलें होतें, प्रथमतः मी त्यास चांगला मनुष्य असें समजत होतें, परंतु काल अर्धरात्रीचे समयीं त्यानें आपल्या चाळीस शिष्यांसह माझ्या घरीं येऊन जेवढा ह्मणून अजबाब होता तितका तो घेऊन गेला. परमेश्वर त्याचा केव्हां सत्यनाश करील तो करो. त्यानें तर मला अगदींच कंगाल करून सोडलें.

**हुस्नबानू**च्या तोंडची हीं अक्षरें ऐकतांच राजास अतिशय क्रोध येऊन तो अगदीं लाल झाला आणि **बानू**स ह्मणाला; हे मूर्खे ह्यापुढें तोंडातून एकही शब्द काढूं नकोस. ज्याला सर्व लोक मान देतात त्याची तूं निंदा करतेस ह्या तुझ्या मूर्खपणास काय ह्मणावें ? तो जगमान्य साधू जगांतील सर्व वस्तूंस केवळ मातीप्रमाणें समजतो; असें असतां तो तुझ्या घरांतील सर्व संपत्ती काय ह्मणून नेईल ? हें ऐकतांच **बानू** ह्मणाली, महाराज, तो साधू नसून महाढोंगी आहे. त्याच्या सारखा दुसरा मनुष्य ह्या जगांत सांपडणार नाहीं. असें असून तुह्मी तर त्याची फारच तारीफ करतां ? ह्या वरून आपणांस त्या साधूची कर्त्तबगारी बिलकुल समजली नाहीं असें वाटतें. हें तिचें उद्दामपणाचें भाषण ऐकून राजा अतिशय संतप्त होऊन मोठ्यानें ओरडून ह्मणाला; आतांच्या आतां ह्या स्त्रीचा शिरच्छेद करा. ह्मणजे पुन्हां अशी फिर्याद कोणीही आणणार नाहीं.

इतक्यांत प्रधान पुढें होऊन हात जोडून ह्मणालाः—महाराज, आपण हें काय करतां ? जिला लहानपणापासून हाताखांद्यावर

आपण खेळविलीत, क्षणभर सुद्धां जिचा वियोग आपणांस सहन झाला नाहीं, बालपणींचे बोबडे शब्द ऐकतांच जो तुह्मांस आल्हाद व्हावयाचा; तो सर्व एकीकडे करून तिलाच आपण मारण्याची शिक्षा देतां याला काय ह्मणावें? असा हा आपला न्यायाचा अपूर्व मासला पाहून आपली तरी काय अवस्था होईल? अशा चिंतेनें शहरवासी प्रजा आपणांस दोष देतील. या करितां बानूस दिलेल्या शिक्षेचें स्वरूप कांहीं तरी सौम्य करावें अशी माझी विनंती आहे. प्रधानाचें हें भाषण ऐकून राजा ह्मणाला, प्रधानजी, तुमच्या भाषणास मान देऊन मी तिची शिक्षा कमी केली आहे. आतां तिला जर आपल्या चांगुलपणाची इच्छा असेल तर तिनें आजच्या आज ह्या शहरांतून निघून जावें, परंतु तसें न करील तर दरबारांतील कांहीं सेवकांनीं जाऊन तिला हद्दपार करावें आणि कांहीं सेवकांनीं बानूच्या घरीं जाऊन जी कांहीं अजबाब मिळेल ती जामदार खान्यांत जमा करावी.

बिचारी हस्नबानू आपला बे इनसाफ झाला ह्मणून फारच दुःखी होऊन दाईस बराबर घेऊन शहरा बाहेर आली आणि अरण्याचा मार्ग क्रमूं लागली. जातां जातां कांहीं वेळानें ती एका मोठ्या मैदानांत आली आणि एका झाडाखालीं विश्रांती करितां बसली असतां पूर्वस्थितीची आठवण होऊन ती फारच रडूं लागली. नंतर कांहीं वेळानें सावध होऊन दाईस ह्मणाली; आई, मी परमेश्वराचा असा कोणता अपराध केला होता कीं, माझ्या हातून कोणत्याही प्रकारचा अपराध घडला नसतां मला एकदम सुखांतून काढून दुःखसागरांत लोटून दिली. त्यावर दाई ह्मणाली; बेटा, एकदां मनुष्याचें दैव फिरलें ह्मणजे सर्वच गोष्टी विपरीत होत असतात. तेव्हां त्याला परमेश्वर तरी काय करणार? अशीं बोलणीं बोलत त्या उभयतांही भुकेनें व तहानेनें व्याकुळ होत्सात्या त्याच वृक्षाच्या छायेखालीं निद्रिस्त झाल्या. हस्नबानूला चालण्याचे फारच श्रम झाले असल्यामुळें तिला ताबडतोब झोंप लागली. इतक्यांत एक सिद्धपुरुष स्वप्नांत येऊन ह्मणाला; हे मुली, तूं कोणत्याही प्रकारचें दुःख करूं नकोस. ह्या वृक्षाखालीं हिरे, माणकें

इत्यादिकांनीं भरलेल्या सात कोठड्या आहेत; त्या मीं तुला बक्षीस दिल्या आहेत; तरी उदईक ह्या ठिकाणीं तूं खण आणि येथें एक मोठें शहर वसवून सुखानें कालक्रमण कर. इतकें सांगून तो सिद्ध-पुरुष गुप्त झाला.

दुसरें दिवशीं सकाळीं ही गोष्ट **हस्नबानूनें** आपल्या दाईस कळविली; तेव्हां तिला अतिशय आनंद होऊन त्या उभयतांनीं वृक्षाखालीं थोडेंसें खणलें. तों अतोनात द्रव्य त्यांचे दृष्टीस पडलें तें पाहून दोघींसही परमानंद होऊन त्यांनीं कांहीं वेळपर्यंत परमेश्वराची स्तुति केली. नंतर **हस्नबानूनें** त्या द्रव्या पैकीं कांहीं मोहोरा दाईजवळ देऊन तिला बाजारांतून अन्न, वस्त्रें व चाकरमाणसें घेऊन येण्यास सांगितलें. परंतु दाई ह्मणाली; या भयान अरण्यांत तुझ्या सारख्या अल्पवयी मुलीला एकटी टाकून माझ्यानें जाववत नाहीं. यास्तव दुसरें कोणी मनुष्य येथें आलें ह्मणजे शहरांत जाईन. असें त्यांचें बोलणें चाललें आहे इतक्यांत **हस्नबानूचा** चुलत भाऊ फकीरवेषानें त्या रस्त्यानें जात होता; त्यास दाईनें ओळखून हांक मारली. थोडावेळपर्यंत त्या सर्वांचें क्षेम कुशल झाल्यावर दाईनें सर्व हकीगत त्यास सांगितली, आणि कांहीं मोहरा त्याजवळ देऊन त्याची शहरांत रवानगी केली. विदुरानें (**हस्नबानूच्या** भावानें) शहरांत जाऊन अन्न, वस्त्रें, चाकरमाणसें आणि डेरे राहुट्या हीं खरीदी केलीं, आणि एका उत्तम कारागिराची भेट घेऊन नवीन शहर वसविण्याविषयींचा सर्व मजकुर त्यास सांगितला. तेव्हां त्या कारागिरानें जागा वगैरे पहाण्या करितां आपला भाऊ विदुरा बरोबर दिला. नंतर तें सर्व लटांबर ज्या ठिकाणीं **हस्नबानू** होती त्या ठिकाणीं येऊन दाखल झालें. तेव्हां **हस्नबानूनें** चांगली हवाशीर जागा पाहून तेथें आपणांकरितां एक अतिउत्कृष्ट बंगला बांधावयास त्या कारागिराचे भावास सांगितलें; व त्याच्या खर्चाकरितां तिनें बऱ्याच मोहोरा तावडतोब त्या कारागिराच्या भावाचे स्वाधीन केल्या. पुढें थोडक्याच दिवसांनीं तो बंगला बांधून तयार झाल्यावर **हस्नबानू** त्यांतच रहावयास गेली. नंतर तिनें त्या कारागिरास तेथेंच एक

शहर बांधावयास सांगितलें; परंतु ह्या गोष्टीस राजाची परवानगी पाहिजे असें त्यानें सांगितल्यावरून **हस्नबानूनें** राजाची परवानगी आणावयास जाण्याचा निश्चय केला.

ह्या गोष्टीस कांहीं दिवस गेल्यावर एके दिवशीं **हस्नबानूनें** मरदानी पोषाख केला, आणि एका खंद्या घोड्यावर स्वार होऊन ती राजवाड्यांत जाण्याच्या उद्देशानें दासीची व आपल्या भावाची आज्ञा घेऊन निघाली. मजल दरमजल करीत करीत कांहीं दिवसांनी ती त्या शहरास आल्यावर राजवाड्यांत गेली. तेव्हां सेवकांनीं "आपल्या भेटीकरितां कोणी एक **राजपुत्र** आला आहे" असें राजास कळविलें. तेव्हां त्यानें ताबडतोब त्या मनुष्यास दरबारांत घेऊन येण्याविषयीं सेवकांस सांगितलें. आज्ञेप्रमाणें सेवकांनीं **हस्नबानूस** दरबारांत आणल्यावर तिनें मोठ्या अदबीनें राजास प्रणाम केला, आणि बरोबर आणलेला नजराणा राजापुढें ठेऊन ती हस्त जोडून उभी राहिली. तो नजराणा पहातांच राजास अतिशय आनंद होऊन तो ह्मणाला; हे राजपुत्रा, तूं कोठून आलास ? तेव्हां **हस्नबानू** मोठ्या नम्रतेनें ह्मणाली:—हे राजा, माझा बाप मोठा व्यापारी असून अनेक देशीं व्यापारानिमित्त त्याचें जाणें येणें असे. एके वेळीं जलप्रवास करीत असतां तुफानाच्या योगानें तो ज्या गलबतांत बसला होता तें गलबत बुडालें, तेव्हां माझा बापही समुद्रांत पडून बुडून मेला. त्यावेळीं मी अगदींच लहान होतों. पुढें मी वयांत आल्यावर माझ्या मनाला कोठें तरी एका शहराची वसाहत करून ईश्वरभजनांत सुखानें कालक्रमण करावें, असें वाटल्यावरून मी कोठें तरी सोयस्कर व हवाशीर जागा पहाण्याच्या उद्देशानें निघालों; तों आपल्या ह्या शहरापासून दोन दिवसांचे रस्त्यावर जें एक मोठें अफाट मैदान आहे तेथें आलों. ती जागा माझ्या उद्देशास योग्य अशी वाटल्यावरून तेथें एखाद्या शहराची वसाहत करण्याकरितां आपली परवानगी घ्यावी या हेतूनें मी येथें आलों आहें. वास्तवीक पाहिलें तर आतां मला दुसऱ्या कोणाचाही आधार नाहीं तेव्हां आपण कृपाळू होऊन माझी मनीषा पूर्ण कराल अशी पूर्ण

आशा आहे. **हस्नबानूचें** हें भाषण ऐकतांच राजा अतिशय आनंद भरित होऊन ह्मणालाः—हे **सावकारपुत्रा,** तुला पाहिल्या पासून माझ्या अंतःकरणांत प्रीतीचा अंकूर उद्भवला आहे. यास्तव मी तुला आपले पुत्रासमान समजून तुझें नांव **जहांगीर** असें ठेवितों. तुझ्या मनांत जें नवीन शहर वसाहत करण्याचें वेड भरलें आहे तें तूं सोडून दे आणि नेहमीं माझ्या सन्निध रहात जा. मला ही दुसरें कोणीच पुत्रसंतान नसल्यामुळें मीही तुझें पुत्रवत् पालन करून आपलें सर्व राज्य तुला बक्षीस देईन. राजाचें हें भाषण ऐकतांच **हस्नबानू** ह्मणालीः—हे **सत्ताधीशा,** ज्या अर्थी तुह्मी मला पुत्राप्रमाणें समजतां त्या अर्थीं परमेश्वराचा हा माझ्यावर मोठा अनुग्रह झाला असेंच समजलें पाहिजे. आतां पुत्राचे हरएक प्रकारचे कोड पित्यानें पुरवावें अशी जनरूढी असल्यामुळें माझ्या मनांत जी इच्छा उत्पन्न झाली आहे ती आपण कृपाळू होऊन शेवटास न्यालच. हें तिचें भाषण ऐकतांच **कुर्दनशाहा** अगदीं निरुत्तर झाला, आणि त्यानें **हस्नबानूस** मोठ्या आनंदानें नवीन शहर वसविण्याची परवानगी दिली. परंतु महिन्यांतून एकवेळ येऊन भेटण्याविषयीं मात्र त्यानें त्यास निक्षून सांगितलें.

नवीन शहर वसविण्याविषयीं राजाज्ञा होतांच तिनें उत्तम कारागिरांकडून थोडक्याच दिवसांत एक टूमदार शहर बांधून तयार केलें. नंतर राजाकडे जाऊन त्यास नवीन वसाहतीच्या समारंभा करितां तेथें आणलें. तें शहर पाहून राजास अतिशय आनंद झाला आणि त्यानें त्या शहराचें नांव '**शहाबाद**' असें ठेवून **हस्नबानूस** त्या शहराच्या पूर्ण स्वामित्वाचा अभिषेक केला. नंतर ज्या कारागिरांनीं तें शहर बांधलें होतें त्यास बानूनें मोठमोठीं इनामें देऊन त्यांचीं मोठ्या संतोषानें रवानगी केली. **शाहाबाद** शहराच्या सुरेखपणाची व तेथील अधिपतीच्या गुणांची कीर्ती ऐकून अनेक ठिकाणांहून पुष्कळ लोकांनीं येऊन तेथें वस्ती केली; त्यामुळें थोडक्याच दिवसांनीं लोकांच्या वसाहतीनें व व्यापाराच्या योगानें शहर अगदीं गजबजून गेलें.

नेहमींच्या सांप्रदाया प्रमाणें एके वेळीं **हस्नबानू** राजदर्शना क-

रितां गेली असतां, त्या ठिकाणीं त्या ढोंगी राजगुरुची स्वारी आली होती. त्यास पहातांच तिनें साष्टांग नमस्कार केला आणि ह्मणाली:—महाराज, आपल्या सारख्या विरक्त **साधूपुरुषांनीं** एक वेळ या दासाच्या घरीं येऊन चरण धूलीकेनें गृह पुनीत करून सेवा गृहण करावी अशी माझी आपणांस विनयपूर्वक प्रार्थना आहे, तरी तिचा आपण अनादर करणार नाहीं अशी मला पूर्ण आशा आहे. **बानू**चें हें भाषण ऐकून त्या ढोंगी साधूनें तिच्या घरीं येण्याचें कबूल केलें. तेव्हां **बानू** राजास ह्मणाली:—हे राजा, ह्या तुमच्या शहरांत बरझाक व्यापाऱ्याचें जें ओसाड घर आहे तें मला द्या, ह्मणजे त्या ठिकाणीं राहून ह्या **साधुपुरुषा**च्या दर्शनाचा लाभ घेईन. राजानें हें तिचें ह्मणणें ताबडतोब मान्य केलें. नंतर त्या दिवशीं **बानू** राजाचा निरोप घेऊन परत आपल्या शहरास येऊन पोंचली. पुढें एक महिन्यानंतर तिनें मेजवानीचें सर्व साहित्य तयार केलें आणि **बरझाक** व्यापाऱ्याच्या घरीं येऊन राहिली. नंतर दुसरे दिवशींच तिनें मेजवानीची सर्व सिद्धता केली आणि एका सेवकास **राजगुरूस** बोलावूं पाठविलें. त्या दिवशींचा मेजवानीचा थाट तिनें फारच उत्तम प्रकारचा ठेविला होता. सर्व वाडा उत्तम प्रकारच्या उंची वस्त्रांनीं सुशोभित केला होता मुख्य दिवानखान्याच्या मध्यभागीं **साधूस** बसण्या करितां एक रत्नखचित **सिंहासन** मांडलें होतें, व इतर शिष्य गणांस बसण्याकरितां रुप्याचे पाट मांडले होते; जिकडे तिकडे झुंबरें हंड्या प्रज्वलित केल्या होत्या. सारांश प्रत्यक्ष राजवाड्यांत सुद्धां तशा प्रकारचा थाट उडावयाचा नाहीं, अशा तऱ्हेचा त्या दिवशींचा तिनें बेत ठेविला होता. **राजगुरूची** स्वारी येतांच **बानुनें** त्याची अर्घ्यपाद्य पूजा केली आणि गुरुदक्षणा ह्मणून एका रत्नजडित ताटांत उत्तम प्रकारचें जवाहिर भरून ती त्यास देऊं लागली. परंतु तो **साधु** तें द्रव्य घेईना. तो ह्मणाला, आह्मां विरक्त प्राण्यांना हें द्रव्य घेऊन काय करावयाचें आहे ? तें तुमचें तुह्मालाच लखलाभ होवो. फक्त तूं भक्तिपुर:सर बोलावून माझी सेवा केलीस हें पाहून मला फारच संतोष झाला आहे. हें त्याचें भाषण ऐकून **बानूनें** ठीक आहे,

असें ह्मणून भोजनाची सिद्धता करविली. त्या दिवशीं तिनें सर्वांसच सोन्याचीं ताटें मांडिलीं होतीं व भोजनाकरितां उत्तम उत्तम प्रकारचीं पक्वान्नें तयार केलीं होतीं. मोठ्या समारंभानें सर्वांचीं भोजनें झाल्यावर राजगुरुची स्वारी **बानूस** आशिर्वाद देऊन निघून गेली. परंतु मनामध्यें मात्र **बानू**ची संपत्ती कोणत्या रीतीनें हरण होईल हे विचार चालले होते. इकडे **बानू**नें शहर संरक्षकांस बोलावून आणून त्यांस सांगितलें कीं, आज रात्रीं कांहीं चौर्यकलाभिज्ञ मनुष्यें माझ्या घरीं येऊन संपत्तीचें हरण करणार आहेत; तरी आह्मी सावधगिरीनें राहूंच. परंतु प्रसंगवशात् मदत करण्याकरितां तुह्मी तयार असावें. कोतवालानें ती गोष्ट ताबडतोब मान्य केली आणि तो निघून गेला. नंतर **बानू**नें आपल्या चाकरांस सांगितलें कीं, आज रात्रीं कांहीं चोरटे लोक आपल्या घरीं यावयाचे आहेत, तरी तुह्मी सामानाची आटोपाआटप न करितां फक्त झोंपेचें सोंग घेऊन पडून रहा; आणि चोरटे येऊन सामान घेऊन जावूं लागले ह्मणजे त्यांस धरून बांधून ठेवा. धनीनीच्या ह्या आज्ञेप्रमाणें रात्र होतांच झोंपेचें मिष घेऊन ते सेवक स्वस्थ पडून राहिले. नंतर मध्यरात्रीचे सुमारास तो ढोंगी **राजगुरू** आपल्या चाळीस शिष्यांसह **बानू**चे घरीं आला. आणि तेथें असलेल्या सर्व मौल्यवान सामानाचे गठ्ठे बांधून घेऊन जावूं लागला. इतक्यांत **बानू**चे सेवक एकदम उठले आणि त्यांनीं त्या सर्व चोरट्यांस बांधून ठेविलें. पूर्वीच्या सूचनेप्रमाणें कोतवाल आपल्या शिपायांसह **बानू**चे घराच्या आसपास दबा धरून बसलाच होता; तो ही गडबड ऐकतांच ताबडतोब धांवून आला, आणि त्यानें त्या ढोंगी **राजगुरूस** संपूर्ण शिष्यांसह तत्काळ नेवून चावडीवर कोंडून ठेविलें. हा सर्व प्रकार पाहून **बानूस** तर अतिशयच आनंद झाला होता. नंतर दुसरे दिवशीं सकाळीं **बानू** मरदानी पोषाख करून राजवाड्यांत गेली आणि तिनें रात्रौ घडलेली सर्व हकिकत राजास कळविली. इतक्यांत कोतवाल ते सर्व चोर घेऊन राजदरबारीं आला त्यांत आपला गुरु आहे असें पाहून राजास फारच वाईट वाटलें. नंतर त्या खटल्याचा तपास चालला असतां त्या ढोंगी **साधू**नें मागेंही

**हस्नबानू**कडे अशीच चोरी केल्याचें कबूल केलें त्यावेळेस **राजास** अतिशय पश्चाताप होऊन तो मनांत ह्मणालाः—ह्या ढोंगी **साधूची** ही दुष्ट कृति न जाणतां मी **हस्नबानूस** व्यर्थ हद्दपार केलें; आतां तिची व आपली भेट होणें कठीण आहे. असा तो विचार करीत आहे तोंच **बानू** हस्त जोडून ह्मणालीः—हे राजाधिराज, मला आपण अझून ओळखिलें नाहीं काय ? ह्या साधूवर चोरीचा व्यर्थ आळ घेतला अशा समजुतीनें ज्या **बरझाक** व्यापाऱ्याच्या **हस्नबानू** नांवाच्या मुलीस आपण हद्दपार करण्याची शिक्षा दिलीत तीच मी आहें. **बानूच्या** तोंडचे हे शब्द ऐकतांच राजास अतिशय गहिंवर आला, आणि तो ताबडतोब आपल्या सिंहासनावरून उठून **बानूस** कडकडावून भेटला. नंतर त्यानें आपल्या हातून घडलेला अन्याय क्षमाकरण्याविषयीं अनन्यभावानें परमेश्वराची प्रार्थना केली; आणि त्या चौर्यकलाभिज्ञ ढोंगी **साधूस** सर्व शिष्यांसह सुळी देण्याचा कोतवालास हुकूम केला.

राजाज्ञेवरून कोतवालानें त्या ढोंगी साधूच्या मठाचा झाडा घेतला तों बानूची पूर्वीं हरण केलेली सर्व संपत्ति व दुसरीही पुष्कळ मालमत्ता आणि चोरी करण्याची हत्यारें व शस्त्रें इतके जिन्नस त्याच्या मठांत सांपडले; ते त्यानें ताबडतोब राजदरबारीं आणले. ते पाहून राजास फारच नवल वाटलें. नंतर तो **बानूची** संपत्ति तिला परत देऊं लागला, परंतु तिनें ती घेण्याचें नाकारलें. तेव्हां राजा तिला ह्मणालाः—बेटा, जी गोष्ट झाली ती कांहीं परत येत नाहीं. परंतु आतां तूं नेहमीं माझ्या सान्निध असावें अशी माझी मनापासून इच्छा आहे. राजाचें हें भाषण ऐकून **बानू** ह्मणालीः—राजा, मी जरी आपल्या शहरीं जाऊन राहिलें तरी ज्या ज्या वेळीं मला भेटावें अशी आपणांस इच्छा होईल त्या त्या वेळीं मी आपले चरणाजवळ हजर होत जाईन. मी येथेंही राहिलें असतें; परंतु मोठ्या हौसेनें जें मी शहर वसविलें आहे तेथें कांहीं दिवस तरी रहावें अशी माझी इच्छा आहे. शिवाय दुसरी माझी अशी मनीषा आहे कीं, आपण एकवेळ माझ्या शहरीं येऊन मी जी आपली सेवा करीन ती ग्रहण करावी. रा-

**जानें बानूच्या** ह्या दोन्हीही गोष्टी मान्य केल्या व दोन दिवसांनीं **शहाबाद** शहरीं जाण्याचा त्यानें निश्चय केला. नंतर राजाची आज्ञा घेऊन **बानू** आपल्या शहरास निघून गेली.

ठरावाप्रमाणें ज्या दिवशीं राजाची स्वारी यावयाची त्यादिवशीं **बानूनें** सर्व नगर शृंगारून घरोघरीं उत्साह करण्याचा हुकूम केला, आणि आपण सर्व परिवारासह राजास सामोरी जाण्या करितां निघाली. राजा शहरा बाहेर **बानूच्या** येण्याची वाट पहातच होता; तो **बानू** येतांच तिजबरोबर शहरांत येऊन दाखल झाला. चार दिवसपर्यंत मोठ्या थाटाच्या मेजवान्या झाल्यावर ज्यावेळीं राजा जावयास निघाला त्यावेळेस **सिद्धपुरुषानें** दिलेल्या द्रव्याच्या साती कोठड्या तिनें राजास नजराणा दिला. राजानें तो घेण्याचें प्रथमतः नाकारलें, परंतु **बानूचा** फारच आग्रह पडल्यावरून त्यानें आपल्या **प्रधानास** तें द्रव्य घेऊन जाण्याविषयीं हुकूम केला. आज्ञेप्रमाणें **प्रधान** कांहीं सेवक बरोबर घेऊन त्या कोठड्यांजवळ गेला तों त्यांत सर्प व विंचू असलेले त्याच्या नजरेस पडले. **प्रधानानें** ती गोष्ट **राजास** कळविली तेव्हां त्यास अतिशय नवल वाटून तो **बानूस** ह्मणालाः—बेटा, हें सर्व द्रव्य तुझ्या नशिबाचें आहे; तें दुसऱ्या कोणासही प्राप्त होणार नाहीं. यास्तव त्या द्रव्याचा तूं सुखानें उपभोग घे. इतकें सांगून राजा आपल्या **राजधानी**स निघून गेला.

इकडे **बानूनें** आपल्या शहरांत एक मोठी धर्मशाळा बांधिली. व त्यांत जे प्रवासी उतरावयास येत त्यांचा ती योग्यतेप्रमाणें परामर्ष घेत असे, आणि तो जावयास लागला ह्मणजे त्यास जें अपेक्षित असेल तें देऊन त्याची रवानगी करीत असे. ह्या तिच्या औदार्यामुळें अनेक शहरीं तिची कीर्ती पसरली; इतकेंच नव्हे तर तिच्या नोकर मनुष्यांच्या प्रामाणिकपणाची व प्रवासी लोकांची आस्थेनें व्यवस्था राखण्या विषयींची जिकडे तिकडे ख्याती झाली. सारांश सूर्य–तेजा प्रमाणें **बानूची** कीर्ती समुद्र–वलयांकित पृथ्वीमध्यें पसरली.

---

# शहाजादा मुनीर याची गोष्ट.



**हस्नबानू**ची कीर्ती शहरोशहरीं पसरतां पसरतां **खारझिम** शहरामध्यें जाऊन पोहोंचली. तेथील राजास **मुनीरशहा** या नांवाचा एक पुत्र होता. हा **राजपुत्र** रुपानें फारच सुंदर असून सर्व प्रकारच्या विद्येंत प्रवीण होता. ईश्वरेच्छेनें प्राप्त झालेल्या सुखांत संतोष मानून तो कालक्रमण करीत असतां एके दिवशीं **हस्नबानू**ची औदार्याची कीर्ती त्याच्या कानीं आली. तेव्हां अशा जगप्रसिद्ध स्त्रीला एकवेळ तरी पहावें असें **राजपुत्रा**च्या मनांत आलें. परंतु ही गोष्ट होणें दुरापस्त असल्यामुळें त्यानें आपल्या पदरच्या एका उत्कृष्ट चितान्यास **बानू**ची तसबीर काढून आणण्याकरितां **शहाबादे**स रवाना केलें. त्याप्रमाणें तो चित्रकार कांहीं दिवसांनीं **शहाबादे**स जाऊन पोंचल्यावर प्रवाशांकरितां जी धर्मशाळा बांधिली होती तेथें जाऊन उतरला. चालीप्रमाणें तेथें त्याची सर्व प्रकारची व्यवस्था झाल्यावर दुसरे दिवशीं सेवकांनीं त्यास **बानू**कडे नेलें. तिनें 'तुझी काय इच्छा आहे?' असें विचारल्यावरून तो ह्मणालाः—मी चितान्याचा धंदा करणारा असून आपल्या पदरीं राहून कांहीं सेवा करावी अशी माझी इच्छा आहे. हें त्याचें भाषण ऐकतांच **बानू**नें त्यास ठेवून घेतलें. पुढें एके दिवशीं आपली तसबीर काढून घ्यावी असें **बानू**स वाटल्यावरून तिनें ती आपली मनीषा चितान्यास कळविली. तेव्हां तो ह्मणालाः—आपणांला जर माझें कौशल्य पहावयाचें असेल तर आपण एका उंचस्थानीं उभ्या राहून खालीं एक मोठें पाण्यानें भरलेलें भांडें ठेवून त्यांत पहात रहा ह्मणजे थोडक्याच वेळांत मी आपली तसबीर उतरून घेईन. **बानू**नें ती गोष्ट तत्काळ मान्य केली, आणि अति उत्तम पोषाख करून उंचावर उभी राहून खालीं एक मोठें पाण्यानें भरलेलें भांडें ठेवून त्यांत पाहूं लागली. तेव्हां चितान्यानें तावडतोब तिच्या प्रतिबिंबावरून तसबीर उतरून घेतली आणि

तो घरीं निघून गेला. नंतर दुसरे दिवशीं त्यानें त्या तसबिरीच्या दोन प्रती उत्तम रंगवून तयार केल्या आणि त्या पैकीं एक **बानूस** नेऊन देऊन दुसरी आपले जवळ ठेवली. ह्या गोष्टीस कांहीं दिवस गेल्यावर एके दिवशीं तो चितारी **बानू**कडे गेला आणि आपल्या मुलांबाळांस भेटण्याकरितां जाण्यास पंधरा दिवसांची रजा मागूं लागला. तेव्हां **बानूनें** त्याच्या झाल्या दिवसांचें वेतन तावडतोब चुकवून देऊन त्यास जाण्यास रजा दिली. नंतर एक दोन दिवसांनीं तो चितारी **शहाबादे**हून निघाला; तो मजले मजलेनें **खारझिम** शहरास येऊन पोंचला; आणि राजवाड्यांत जाऊन **बानूची** तसबीर **शहाजाद्यास** देऊन त्यानें साकल्य वर्तमान निवेदन केलें.

**हस्नबानू**ची तसबीर पहातांच **शहाजादा** अगदीं वेडा झाला. त्याला वाटूं लागलें कीं, अशा सुंदर व कीर्तिमान् स्त्रीशीं जर आपण लग्न केलें तरच आपल्या जन्माचें सार्थक. नाहीं तर जन्मास येऊन आणि न येऊन सारखेंच. अशा तऱ्हेचे विचार त्याच्या मनांत येऊन तो अगदीं गोंधळून गेला. नंतर कांहीं वेळानें तो जरासा शुद्धीवर आल्यावर कोणासही न विचारतां **शहाबादेस** जाऊन स्वतःच **बानू**ची भेट घेऊन आपले मनोरथ तिला कळविण्याचा त्यानें निश्चय केला. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं शिकारीस जाण्याच्या निमित्तानें फक्त प्रवासास जरूर लागणाऱ्या जिनसा बरोबर घेऊन तो आपल्या नगराहून निघाला आणि दरकूच दरमजल करीत करीत **शहाबादेस** येऊन धर्मशाळेंत उतरला. मामुलवहिवाटीप्रमाणें **बानू**चे नोकर त्याजला खाण्यापिण्याचे जिन्नस देऊं लागले; परंतु ते तो घेईना. तेव्हां ती गोष्ट त्या सेवकांनीं **बानूस** कळविली. तिलाही ह्या गोष्टीचें अतिशय नवल वाटून अशा निरिच्छ पुरुषाची एकवेळ गांठ घ्यावी असा निश्चय करून **शहाजाद्यास** घेऊन येण्याविषयीं तिनें सेवकांस आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें सेवक **शहाजाद्यास** घेऊन **बानू**कडे गेले, तेव्हां तिनें त्यास "कोठून आलां? जायचें कोठें? व ही निरिच्छता कां धारण केली आहे?" असे प्रश्न केले, त्यावर **शहाजादा** ह-

णाला:—हे कीर्तिमान् स्त्रीये, तुझी औदार्याची कीर्ती ऐकून एक वेळ भेट घ्यावी, या इराद्यानें **खाराझिम** शहराहून मी येथें आलों आहे. मला अपेक्षित असें कांहींच नाहीं; कारण **खाराझिम** शहराचा मी राजपुत्र असल्यामुळें मला सर्व गोष्टींची अनुकूलता आहे. फक्त इच्छा काय ती हीच आहे कीं, तुझ्या सारख्या सौंदर्यवान् व जगविख्यात स्त्री बरोबर विवाह करून आपल्या जन्माचें सार्थक करून घ्यावें. हें त्याचें भाषण ऐकून **बानू** सचिंत होऊन ह्मणाली:—हे **शहाजाद्या** तूं जी मनांत इच्छा धरली आहेस ती व्यर्थ आहे. कारण विवाह करण्याच्या संबंधानें माझे नियम फारच कडकडीत आहेत. आतां जर तूं त्याप्रमाणें वागून पणादाखल जे माझे सात प्रश्न आहेत त्यांचा उलगडा करशील तर तुझी इच्छा पूर्ण होईल. **शहाजाद्यानें** प्रश्न ऐकण्याची आपली इच्छा दर्शविल्यावरून **बानू** ह्मणाली; माझा पहिला प्रश्न—"**एकवेळ पाहिलें आहे, पण पुन्हां पहाण्याची हौस आहे.**" असा शब्द करणारा एक मनुष्य आहे, तर त्याजवळ जाऊन तो कोठें रहातो व त्यानें काय पाहिलें आहे याची कच्चि हकीगत आणणें; असा आहे. जर तूं ह्याचा उलगडा करून मला सांगशील तर मी पुढचा प्रश्न तुला सांगेन, आणि ह्या प्रमाणें सातही प्रश्नांचा निकाल झाला ह्मणजे तुझ्या इच्छेप्रमाणें विवाह रज्जूनें बद्ध होऊन कालक्रमण करीन. **बानूचें** हें भाषण ऐकून **शहाजादा** फारच गोंधळून गेला. परंतु प्रारब्धाची परिक्षा पहावी अशा हेतूनें त्यानें त्या मनुष्याच्या शोधास जाण्याचा निश्चय केला. नंतर तो दिवस त्यानें **बानूचे** घरींच सुखदुःखाच्या गोष्टी बोलण्यांत घालविला; आणि दुसरे दिवशीं पाहिल्या प्रश्नाचें उत्तर एक वर्षाच्या आंत घेऊन येतों; तों पर्यंत तूं माझी वाट पहावी असें सांगून तो **शहाबाद** शहर सोडून निघाला.

**मुनीरशाहा, बानूची** तसबीर बरोबर घेऊन **शहाबादेहून** निघाला तो कोठें जावें? काय करावें? असा मनामध्यें विचार करीत करीत **यमन** शहरानजीकच्या एका घोर जंगलांत येऊन दाखल झाला. त्या वेळीं तो फारच दमला होता ह्मणून विश्रांति

घेण्याच्या इराद्यानें एका वृक्ष-छायेखालीं विचार करीत बसला. परंतु विचारशक्तीच्या पर्यवसानास जागा न मिळाल्या मुळें तो अतिशय दु:खी होऊन मोठमोठ्यानें रडूं लागला. त्याच वेळेस **यमन** शहराचा राजा **हातीम** शिकार करण्याच्या इराद्यानें त्याच जंगलांत आला होता; व तो ज्या ठिकाणीं **मुनीरशाहा** रडत बसला होता त्याचेच आसपास त्यावेळीं होता. त्यानें जेव्हां हें **शहाजाद्या**चें रडणें ऐकलें तेव्हां ताबडतोब आपल्या एका सेवकास शोध करण्या करितां पाठविलें. आज्ञ प्रमाणें चाकरानें जाऊन अशी खबर आणली कीं, एक मनुष्य येथून नजीकच एका झाडाखालीं बसून रडत आहे. आह्मी त्याला रडण्याचें कारण विचारलें. परंतु त्या मनुष्यानें नुस्ते डोळे उघडून मुद्दां माझ्याकडे पाहिलें नाहीं, मग बोलण्याची तर गोष्टच नको. सेवकाचें हें भाषण ऐकतांच **हातीम** ताबडतोब उठून ज्या ठिकाणीं **मुनीरशहा** बसला होता तेथें आला; आणि लांबूनच **मुनीरशहा**कडे पाहूं लागला. तो **शहाजादा** ओक्साबोक्शांनीं रडून हातानें कपाळ पिटून घेत होता. हें त्याचें कृत्य पाहतांच **हातिमास** अतिशय वाईट वाटून तो मनांत ह्मणाला:—ह्या सुंदर व तरुण पुरुषानें परमेश्वराचा असा कोणता अपराध केला आहे कीं, त्या योगानें आज हा त्याजवर अनावर दु:खद प्रसंग येऊन पडला आहे. असा विचार **हातिमा**चे मनांत येऊन त्याच्या डोळ्यावाटें अश्रू वाहूं लागले. नंतर तो आपल्या घोड्यावरून ताबडतोब उतरून **मुनीरशहा**जवळ जाऊन ह्मणाला:—हे सुंदर व तरुण पुरुषा, तुझ्या चेहऱ्याकडे पाहिलें असतां तुझें जनन मोठ्या कुळांत झालेलें असावें असें वाटतें. परंतु तूं जो हा फकीरी वेष धारण करून व प्रवासीपणा पतकरून ह्या घोर जंगलांत रडत बसला आहेस ह्याचें कारण काय आहे; तेवढें मला मेहेरबानी करून सांग. **हातिमा**चें हें बोलणें ऐकतांच **मुनीरशहा**नें डोळे उघडून पाहिलें तों आपणापुढें हास्यमुखी, सुंदर पोषाख करून त्यावर चिलखत घातलेला व आपल्या कामांत दक्ष असा एक पुरुष उभा असून तो आपणास दु:खाचें कारण विचारीत आहे. असें पाहून तो ह्मणाला:—हे उदार पुरुषा, मला

जें दुःख होत आहे तें तुला सांगण्यानें कांहीं कमी व्हावयाचें नाहीं. कारण मला द्रव्याची किंवा अन्नवस्त्राची बिलकुल गरज नाहीं. फक्त हृद्रोगाचेच योगानें मला अतिशय दुःख झालें आहे. हें ऐकतांच **हातीम** ह्मणालाः—कांहीं हरकत नाहीं. तुझें जें दुःख असेल तें मला सांग. ह्मणजे परमेश्वरावर भरवसा ठेवून माझ्यानें होईल तितका प्रयत्न मी करीन. हें त्याचें भाषण ऐकतांच **शहाजाद्यास** आतिशय आनंद होऊन त्यानें **बानूचें** चित्र **हातीमा** पुढें टाकून सर्व हकीगत त्यास सांगितली. ती ऐकून **हातीम** कांहीं वेळ स्तब्ध राहून ह्मणालाः—तूं कोणत्याही रीतीची काळजी न करितां स्वस्थ रहा. मी **बानूच्या** सातही प्रश्नांचा जबाब परमेश्वरकृपेनें देऊन ती तुला प्राप्त करून देईन.

इतकें बोलणें झाल्यावर **हातिमानें मुनीरशहास इमन** शहरास नेलें. नंतर दोन तीन दिवसांनीं **हातिमानें** आपल्या राजाची सर्व व्यवस्था केली, आणि **मुनीरशहास** बरोबर घेऊन तो **शहाबादेस** येण्याकरितां निघाला. मजले मजलेनें कांहीं दिवसांनीं **शहाबादेस** येऊन पोहोंचल्यावर ते दोघेही **हस्नबानूकडे** गेले. तेव्हां **बानूनें** त्यांचा उत्तम रीतीचा सन्मान करून येण्याचें कारण विचारलें. तेव्हां **हातीम** ह्मणालाः—हे स्त्रिये, तुझ्या स्वरूपाची व गुणांची कीर्ति ऐकून मी तुझी भेट घेण्याच्या इराद्यानें आलों आहें. येण्याचा हेतू इतकाच आहे कीं, ह्या माझ्या भावाच्या मनांत तुजबरोबर लग्न करावें; अशी इच्छा त्यास प्राप्त झाल्यावरून तो तुजकडेस आला आणि त्यानें आपला हेतू तुला कळविला. परंतु जो मनुष्य तुझ्या सात प्रश्नांचा जबाब देईल त्याजबरोबरच लग्न करावयाचें असा तुझा पण असल्यामुळें त्याची ती इच्छा अतृप्तच रहाणार. तथापि तुझ्या प्रश्नाचीं उत्तरें जर मी दिलीं तर तूं माझ्या भावाबरोबर विवाह करशील कीं नाहीं हें मला सांग. **हातीमाचें** हें भाषण ऐकतांच **बानू** ह्मणालीः—हे परोपकारी **राजपुत्रा**, परोपकारा करितां जर तूं अश्रांत श्रम करून माझ्या प्रश्नाचीं उत्तरें देण्यास तयार आहेस तर मीही ज्या प्रमाणें तूं सांगशील त्या प्रमाणें वागण्यास तत्पर आहें त्यावर **हातीम**

ह्मणालाः—ही गोष्ट तुला जर खरोखरी मान्य असेल तर दोन साक्षीं समक्ष करारनामा लिहून माझे स्वाधीन कर. ह्मणजे मी दुर्घट प्रयत्न करण्यास सिद्ध होऊन तुझ्या सर्व प्रश्नाचा उलगडा करितों हें त्याचें भाषण ऐकतांच **बानूनें** दोन साक्षीं समक्ष करारनामा लिहून ताबडतोब **हातिमा**च्या स्वाधीन केला.

कांहीं वेळ झाल्यावर जेव्हां **हातीम** व **मुनीरशहा** हे जाऊं लागले तेव्हां **बानूनें** त्यांस अतिशय आग्रह करून राहवून घेतलें. त्या दिवशीं **बानूनें** त्या दोघांस उत्तम प्रकारची मेजवानी दिली. नंतर दुसरे दिवशीं जेव्हां **हातीम** पहिल्या प्रश्नाच्या शोधास जावूं लागला तेव्हां **बानू**स ह्मणालाः—मी परत येई पर्यंत हा माझा भाऊ तुझ्याच शहरांत राहाणार असल्यामुळें तूं त्याची उत्तम प्रकारची व्यवस्था ठेव. **बानूनें** ती गोष्ट ताबडतोब मान्य करून **मुनीरशहास** एक मोठा बंगला रहावयास देऊन त्याची उत्तम प्रकारची व्यवस्था ठेवण्याचा आपल्या कारभाऱ्यांस हुकूम केला. नंतर **हातीम बानू**स पहिला प्रश्न विचारून **मुनीरशहाची** रजा घेऊन **शहाबादे**हून निघाला.

---

# प्रश्न १ ला.

## "एक वेळ पाहिलें आहे, पण पुनः पहाण्याची हौस आहे."

पहिल्या प्रश्नाचें उत्तर आणण्याच्या इराद्यानें **हातीम शहाबादे**हून निघाला तो दरकूच दरमजल करीत करीत जात असतां मनांत विचार करूं लागला कीं, आतां मी कोठें जाऊं? आणि काय करूं? मला तर ह्या प्रश्नाविषयीं कोणत्याही प्रकारची माहिती नसतां परमेश्वरावर हवाला ठेवून केवळ परोपकारा करितां हा प्रवासीपणा पतकरला आहे. असो, जें काय होईल तें होईल. असा विचार करीत तो चालला असतां एक लांडगा एका हरिणीच्या पाठीस लागला असून तो तिला धरण्याच्या अगदीं बेतांत

आला आहे असें त्यानें पाहिलें. तेव्हां त्याचे पोटांत दया उत्पन्न होऊन तो ओरडून ह्मणाला:—अरे भुकेलेल्या प्राण्या, उभा रहा; त्या हरिणीला मारूं नकोस. कारण ती पाडशी असून पुत्रप्रेमानें उत्सुक झाल्यामुळें तिच्या स्तनांतून दूध गळत आहे. **हातिमाचें** हें भाषण ऐकतांच लांडगा उभा राहून ह्मणाला:—हे परोपकारी **पुरुषा,** ज्या अर्थीं त्या हरिणीची तुला दया आली त्या अर्थीं तूं **हातीम** असावास असें मला वाटतें. **हातिमानें** विचारलें मी **हातिमच** आहें असें तुला कसें समजलें? लांडगा ह्मणाला:—या पृथ्वीवर परदुःख निवारक व सर्व प्राणीमात्रांची दया करणारा एका **हातिमा**वांचून दुसरा कोणीही मनुष्य सांपडणार नाहीं; अशी जिकडे तिकडे ख्याति झालेली असल्यामुळें मी हें अनुमान केलें. आतां मला अतिशय क्षुधा लागल्यामुळें मी ह्या हरिणीस मारून खाण्याच्या बेतांत होतों इतक्यांत तूं मला प्रतिबंध केलास तरी क्षुधा शांत होण्यास मला कांहीं तरी खावयास दे. **हातिमानें** तुला काय खावयास पाहिजे असें त्यास विचारल्यावरून तो ह्मणाला:—मी मांसाशिवाय दुसरें कांहींच खात नाहीं; तरी तुझ्या शरीरापैकीं सर्वांत उंची असें मांडीवरचें मांस तें मला खावयास दे. हें त्याचें भाषण ऐकतांच **हातिमानें** ताबडतोब आपल्या कंबरेची कट्यार काढून मांडीवरच्या मांसाचे कांहीं तुकडे त्यास खावयास दिले. ते खाऊन लांडगा संतुष्ट होऊन ह्मणाला:—हे परोपकारी **हातिमा,** तूं आपली **राजधानी** सोडून या निर्मनुष्य जंगलांत व्यर्थ कां भटकतोस तें मला सांग? तेव्हां **हातीम** ह्मणाला:—**शहाबाद** नांवाच्या प्रख्यात शहरीं **हस्नबानू** या नांवाची एक दानशूर स्त्री आहे; तिच्या गुणांवर व सौंदर्यावर **मुनीरशाहा** या नांवाचा एक राजपुत्र अतिशय मोहित झाला आहे, परंतु त्या **हस्नबानू**जवळ जे सात प्रश्न आहेत त्यांची जो उत्तरें देईल त्याजबरोबरच विवाह करावयाचा असा तिचा निश्चय आहे. त्या सात प्रश्नांचा जबाब देण्यास **मुनीरशाहा** असमर्थ असल्यामुळें केवळ परोपकारार्थ परमेश्वरावर भरंवसा ठेवून त्या प्रश्नांचा जबाब देण्याचें मी मनांत आणलें आहे. प्रस्तूत तिचा पहिला प्रश्न "**मी**

एक वेळ पाहिलें आहे पण पुन्हां पाहण्याची हौस आहे" असा शब्द करण्याऱ्या मनुष्याची खबर आणणें ह्या तिच्या प्रश्नाचा तपास करण्याकरितां मी निघालों आहें. परंतु तो मनुष्य कोठें रहातो ह्याची मला मुळींच माहिती नाहीं. त्यावर लांडगा ह्मणालाः—मलाही त्या मनुष्याचें राहण्याचें ठिकाण माहिती नाहीं, तथापि मी अशी बातमी ऐकली आहे कीं, तो मनुष्य हौद्राचे अरण्यांत राहतो. तें अरण्य येथून बरेंच लांब गेल्यावर दोन रस्ते लागले ह्मणजे डाव्या हाताचा रस्ता सोडून उजव्या हाताच्या रस्त्यानें गेलें असतां लागतें. इतकें बोलणें झाल्यावर लांडगा व हरिणी आपली कृतज्ञता दर्शवून निघून गेलीं.

मांडीवरचें मांस गेल्यामुळें ती निःशक्त होऊन अतिशय वेदना होऊं लागल्या. त्यामुळें हातिमाच्यानें एक पाऊल सुद्धां पुढें टाकवेनासें होऊन तो तेथेंच एका वृक्षा खालीं निचेष्ट पडला. संध्याकाळच्या सुमारास त्या वृक्षाच्या आश्रयानें राहणारें एक कोल्हाकोल्हीचें जोडपें भक्ष्य मिळवून आपल्या राहण्याच्या ठिकाणीं आलें; तों त्यांच्या दृष्टीस हातीम निजलेला पडला. तेव्हां कोल्ही ह्मणाली, हें ठिकाण आपणांला सोडलें पाहिजे. कारण येथें मनुष्यें येऊं लागल्यामुळें आपण येथें राहतों हें जर त्यांस समजलें तर ते आपले प्राण घेतल्याशिवाय कधीं ही रहाणार नाहींत; कोल्हा ह्मणालाः—या मनुष्यापासून आपणांला कोणत्याही रीतीची पिडा होणार नाहीं; कारण, हा इमन देशाचा राजा असून दुसऱ्याचें दुःख निवारण करण्यास व प्राणीमात्रांवर दया करण्यास नेहमीं तत्पर असतो. याला हातीम असें ह्मणतातः—कोल्ही ह्मणाली, हें तुह्मांस कसें समजलें. कोल्हा ह्मणाला, मला माझ्या गुरूनें अमुक दिवसांनीं तुझ्या रहाण्याच्या ठिकाणाजवळ 'हातीम' या नांवाचा एक परोपकारी मनुष्य येईल तो मांडीवरचें मांस गेल्यामुळें दुःखानें व्याप्त होऊन पडेल; तरी त्यास तूं औषधोपचार कर असें ह्मणून त्यानें तें औषधही मला सांगून ठेवलें आहे. कोल्हीनें हातीमाच्या मांडीवरचें मांस जाण्याचें कारण व त्याला लावावयाचें औषध काय आहे? असें

विचारल्यावरून कोल्हा ह्मणालाः—**शहाबाद** शहराची मालकीण जी **हुस्नबानू** तिच्या स्वरूपास पाहून **मुनीरशहा** नांवाचा एक राजपुत्र अतिशय मोहित झाला आहे. परंतु तिच्याजवळ पणादाखल जे सात प्रश्न आहेत त्यांची उत्तरें देणारा बरोबरच लग्न करावयाचें असा तिचा निश्चय आहे. त्या प्रश्नांचे जबाब देण्याचें सामर्थ्य **मुनीरशहा**च्या आंगीं नाहीं ह्मणून हा परोपकारी मनुष्य त्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याकरितां निघाला आहे. आज सकाळीं एका हरिणीस भक्षण करण्याच्या इराद्यानें एक लांडगा तिच्या पाठीस लागला होता. हें **हातिमा**च्या नजरेस पडतांच त्यानें त्या हरिणीस लांडग्याच्या भयापासून मुक्त केलें. परंतु लांडग्यास अतिशय भूक लागली होती ह्मणून त्यानें आपल्या मांडीवरचें मांस त्यास भक्षण करण्यास दिलें. त्यामुळें हा वेदनेनें त्रस्त होऊन ह्या ठिकाणीं पडला आहे. आतां ह्या दुःखापासून मुक्त होण्याचा उपाय येवढाच आहे कीं, '**माझनद्राना**' नांवाच्या अरण्यामध्यें मोराच्या आकाराचा एक **परो** नामक पक्षी आहे; त्याचा मेंदू ह्या जखमेवर लाविला असतां एका तासाच्या आंत मांडी भरून येऊन वेदनाही अगदीं नाहींशा होतील. परंतु तें औषध मिळणें महा कठीण आहे. तथापि गुरूच्या आज्ञेप्रमाणें मी तर त्या औषधाच्या प्राप्ती करितां जातोंच. परंतु मी येई पर्यंत तूं मात्र ह्या ठिकाणीं राहून तुझ्यानें होईल तितकी ह्या परोपकारी मनुष्याची शुश्रूषा राख. मला तें औषध घेऊन येण्यास आजपासून बरोबर सात दिवस लागतील. कोल्हीनें ती गोष्ट ताबडतोब मान्य केली. नंतर स्त्रीस **हातिमा**जवळ ठेवून कोल्हा औषध आणण्याकरितां निघून गेला. **हातीम** त्या वेळीं ह्या दोघांचें भाषण ऐकतच होता; परंतु त्याजला उठण्याची किंवा दोन शब्द बोलण्याची मुळींच शक्ति नसल्यामुळें तो स्वस्थ पडूनच होता.

इकडे तो कोल्हा जो निघाला तो कांहीं दिवसांनीं **माझनद्रानास** येऊन पोहोंचला. तेव्हां त्याचें इच्छित जें जनावर तें एका झाडाखालीं स्वस्थ निजलेलें कोल्ह्यानें पाहिलें. नंतर कोल्हा लपत छपत त्या जनावराजवळ गेला आणि एकदम त्याचें डोकें तोंडांत

धरून त्यानें जोरानें हिसका मारिला. त्या सरसें तें डोकें धडापासून निराळें झालें. तें घेऊन तेथून कोल्हा निघाला तो मुदतीच्या आंतच आपल्या मकाणावर येऊन दाखल झाला. कोल्हा गेल्यापासून कोल्हीनें एक घटकाभरसुद्धां विश्रांती घेतली नव्हती. रात्रंदिवस हातिमाच्या सभोंवतीं फिरून तिनें पहाराच केला होता. हातीम हें सर्व पहात होता; परंतु उठण्याची किंवा बोलण्याची बिलकुल शक्ती नसल्यामुळें तो स्वस्थ पडून राहिला होता. कोल्हा येतांच त्यानें तें परो जनावराचें डोकें आपल्या स्त्रीच्यापुढें टाकलें, तेव्हां तिनें ताबडतोब तें आपल्या दातानीं फोडून आंतील मेंदू हातीमाच्या जखमेवर लाविला. ह्या गोष्टीस सुमार एक कलाक झाला नाहीं तोंच हातीम वेदनारहित होऊन उठून उभा राहिला आणि ह्मणालाः—तुह्मी श्वापदें असूनही मजवर दया केलीत त्यामुळें मी तुमचा ऋणी आहे; परंतु तुह्मी दुसरे जनावराचा प्राण घेतलात ही गोष्ट मात्र चांगली केली नाहीं. कोल्हा ह्मणाला, ह्या अपराधाबद्दल मी परमेश्वराजवळ क्षमा मागेन; परंतु तूं सुखी अस ह्मणजे झालें. तेव्हां हातीम त्या कोल्ह्यांस ह्मणालाः—मी तुह्मांस प्रसन्न झालों आहे, तरी जें अपेक्षित असेल तें मागा. कोल्ही ह्मणाली, मागावयाचें तर दुसरें काहीं नाहीं. परंतु येथून थोड्या अंतरावर एक तरसाचें जोडपें रहातें. तें आह्मांला पोरें झालीं ह्मणजे खाऊन टाकतें हा त्याचा तेवढा त्रास कमी करा ह्मणजे आह्मी मोठ्या आनंदानें येथें काल—क्रमणा करूं. हातिमानें मोठ्या आनंदानें ती गोष्ट ताबडतोब मान्य केली, आणि तो कोल्ह्यास तरसाची जागा दाखविण्याकरितां घेऊन गेला. परंतु त्या वेळीं तें तरसाचें जोडपें आपल्या घरांत नव्हतें, ह्मणून कोल्ह्यास जावयास सांगून हातीम तेथेंच राहिला. संध्याकाळच्या सुमारास तें तरसाचें जोडपें आपल्या राहावयाच्या ठिकाणीं आलें आणि पहातें तों आपल्या घराजवळ कोणी मनुष्य बसला आहे. असें पाहून त्या तरसास राग आला, आणि तो आपल्या भाषेत दांत ओंठ खाऊन हातिमास ह्मणालाः—तूं मुकाट्यानें आमच्या घराजवळून निघून जा नाहींतर आह्मी तुला फाडून खाऊन टाकूं. त्या

जनावराचें हें भाषण ऐकतांच **हातीम** ह्मणाला; हे ईश्वराचे प्राण्यांनो, तुमचे जीव जसे तुह्मांस प्रिय आहेत तसेच सर्व प्राण्यांसही आपापले जीव प्रिय आहेत. मी तुह्मांला त्रास देण्याकरितां कांहीं ह्या ठिकाणीं आलों नाहीं. माझा येण्याचा हेतू इतकाच आहे कीं, तुह्मीं ज्या गरीब कोल्ह्यांचीं पोरें खातां व त्यांना त्रास देतां तो न द्यावा एतदर्थ मी तुह्मांस उपदेश करण्यास आलों आहे. तरस ह्मणालाः—तूं जरी आह्मांस उपदेश करण्यास आलास तरी आह्मीं आपला क्रम कधींही सोडणार नाहीं. तरसाचें हें उर्मटपणाचें भाषण ऐकतांच **हातिमास** राग येऊन तो त्याच्या आंगावर धांवून गेला आणि त्याचे हातपाय बांधून कमरेची कट्यार काढून दोन पंजे व दांत कापून त्यास सोडून दिलें. तेव्हां तो तरस, **हातिमाचे** पायांवर गडबडा लोळून ह्मणालाः—आतां आह्मांस उदरनिर्वाहास भक्ष्य कसा मिळेल. **हातीम** बोलला, प्राणिमात्रांस उत्पन्न करणारा परमेश्वर कोणालाही उपाशीं ठेवणार नाहीं. असें तो बोलत आहे इतक्यांत तें कोल्ह्याचें जोडपें येऊन ह्मणालें आमच्या जिवांत जों पर्यंत प्राण आहे तों पर्यंत आह्मी या तरसाची खाण्यापिण्याची व्यवस्था ठेवूं. तुह्मी कांहीं काळजी करूं नका.

इतकें त्या उभयतांचें बोलणें झाल्यावर **हातीम** मार्ग—क्रमण करूं लागला. तेव्हां हौदाचे अरण्यापर्यंत पोंचविण्यास येण्याचा कोल्ह्यानें फारच आग्रह धरिला. परंतु **हातिमाचे** मनांत त्यास विनाकारण त्रास द्यावा असें नव्हतें, ह्मणून त्यानें न येण्याविषयीं कोल्ह्यास पुष्कळ प्रकारें सांगितलें. त्यामुळें निरुपाय होऊन शेवटीं कोल्हा ह्मणालाः—जर तूं मला बरोबर नेत नाहींस तर हौदाचे अरण्यांत जाण्याचे दोन रस्ते आहेत; पैकीं एक लांबचा असून जरासा अवघड आहे. व दुसरा रस्ता अगदीं जवळचा आहे, परंतु त्या वाटेनें गेलें असतां क्रूर श्वापदांचें अतिशय भय आहे. तरी तुझ्या मनांतून कोणत्या रस्त्यानें जावयाचें आहे? तें सांग. ह्मणजे मी तुला तो रस्ता दाखवून देतों. त्यावर **हातीम** ह्मणालाः—लांबच्या रस्त्यानें जाऊन दिवसगत लावण्या पेक्षां

जवळच्याच रस्त्यानें जाणें मला बरें वाटतें, आतां तो रस्ता जरी भयप्रद आहे तरी परमेश्वराची आपणावर कृपा असल्यावर मोठमोठ्या संकटांतूनही आपण पार पडूं. तेव्हां कोल्हा ह्मणालाः—येथून समोरच्या रस्त्यानें गेलें ह्मणजे तुला चार रस्ते लागतील; त्यांतून उजवेकडच्या मार्गानें गेलें असतां थोडक्याच दिवसांत तूं हौदाचे अरण्यांत जाऊन पोहोंचशील. **हातीमानें** ती गोष्ट मान्य केली आणि कोल्ह्यास जावयास सांगून तो मार्ग क्रमण करूं लागला.

जातां जातां सुमार एक महिन्यानें त्याला चार रस्ते लागले; तेव्हां परमेश्वर स्मरण करून तो उजव्या हाताच्या रस्त्यानें जाऊं लागला असतां एके ठिकाणीं पुष्कळ आस्वलें जमलेलीं त्याच्या नजरेस पडलीं. इतकीं आस्वलें त्या ठिकाणीं जमण्याचें कारण इतकेंच होतें कीं; त्या अरण्याचा मालक एक आस्वलराज असून त्या दिवशीं तो आपली सर्व प्रजा एके ठिकाणीं जमवून कांहीं राजकारणीं खलबत करीत होता. पुढें जेव्हां त्या आस्वलांची नजर **हातिमा**वर गेली तेव्हां त्यांनीं आपल्या राज्यांत कोणी मनुष्य आला आहे असें सांगितलें. तें ऐकतांच राजानें त्या मनुष्यास पकडून आणण्याविषयीं सांगितल्यावरून कांहीं आस्वल **हातिमा**जवळ गेले आणि त्यांनीं त्यास पकडून आणून राजा पुढें उभें केलें. तेव्हां राजानें त्यास निरखून पाहून आपले नगरास मानमरातबेनें नेण्याविषयीं सेवकांस हुकुम केला. नंतर कांहीं वेळानें तो **आस्वलराज** सभा बरखास्त करून आपल्या वाड्यांत आल्यावर सेवकांनीं **हातिमा**स आणून राजा पुढें उभें केलें. तेव्हां राजानें त्यास आपल्या शेजारीं बसावयास सांगितलें आणि ह्मणालाः—हे **इमन**देशाच्या राजा **हातिमा**, तूं आपली **राजधानी** सोडून असा वनोवनीं कां फिरतोस? याचें कारण मला सांग. **हातिमानें** मोठ्या नम्रतेनें आपल्या प्रवासाचें कारण त्यास सांगितल्यावर राजा ह्मणालाः—तूं माझे येथें आलास हा मजवर मोठा अनुग्रहच झाला असें मी समजतों. कारण माझी एक उपवर झालेली कन्या असून तिचें कोणाबरोबर पाणिग्रहण करावें? या काळजींत मी होतों. परंतु परमेश्वर—कृपेनें तुझ्या सारखा गुणवान् मनुष्य

आढळला, सबब त्या कन्येचें लग्न तुज बरोबर लावून देऊन मी तुला आपला जामात करणार. हें आस्वलराजाचें भाषण ऐकतांच **हातीम** कांहीं एक न बोलतां खालीं पाहूं लागला, हें पाहून **आस्वलराज** ह्मणालाः—माझा तुझा श्वशूरजामाताचा संबंध व्हावयास मी योग्य नाहीं काय? **हातीम** ह्मणालाः—तुह्मी श्वापदें आणि मी मनुष्य तेव्हां हा संबंध कसा जमेल. **आस्वलराज** ह्मणालाः—त्याविषयीं तूं मुळींच काळजी करूं नकोस. कारण, माझी मुलगी आमच्या जातीची नसून तुझ्याच जातीची आहे. असें ह्मणून त्यानें **हातिमास** सेवकाबरोबर महालांत जाऊन मुलीला पाहण्यास सांगितलें. नंतर **हातीम** उठून महालांत गेला, आणि पहातो तों ती मानव जातीची असून इंद्राच्या अप्सरांसही लज्जित करणारें असें तिचें रूप आहे. हें पाहून तो फारच चकित होऊन राजाजवळ आला, आणि ह्मणालाः—महाराज, आपण सार्वभौम सत्ताधीश असून मी यःकश्चित् एक मांडलीक आहें; तेव्हां तुमची आणि माझी साम्यता कधींही होणार नाहीं. त्यावर आस्वलराज ह्मणालाः—**हातिमा**, तूं **इमन** देशाचा राजा आहेस, हें मी जाणत नाहीं काय? तें ऐकून **हातीम** मनांत विचार करूं लागला कीं, मी जो स्वदेशाचा व सुखोपभोगाचा त्याग करून हा प्रवासीपणा पतकरिला आहे तो कांहीं विषयोपभोगाकरितां नाहीं, असें जर आहे तर येथें विवाहरज्जुनें बद्ध होऊन मायापाशांत गुंतून राहणें योग्य नाहीं. असा तो मनांत विचार करीत आहे तों **आस्वलराज** ह्मणालाः—**हातिमा**, मी ह्मणतों ही गोष्ट जर तूं मान्य करणार नाहींस तर मी तुला आमरणांत बंदिवासांत ठवीन. इतकें जरी तो बोलला तरी **हातिमानें** कांहीं एक जबाब दिला नाहीं, हें पाहून **आस्वलराजास** अतिशय संताप येऊन त्यानें **हातिमास** एका गुहेमध्यें कोंडून ठेवण्याविषयीं आपल्या सेवकांस आज्ञा केली.

आज्ञेप्रमाणें सेवकांनीं **हातिमास** नेऊन एका आंधाऱ्या कोठडींत कोंडून ठेविलें त्या गुहेंत **हातीम** अन्नपाण्याविरहीत दोन आठवडेपर्यंत होता. पुढें **आस्वलराजानें** त्यास गुहेंतून बाहेर का-

ढून आपल्याजवळ आणून बसविलें आणि कांहीं फळें व उत्तम पाणी आणून त्यापुढें ठेविलें. **हातिमास** दोन आठवडेपर्यंत अन्न-पाणी न मिळाल्यामुळें अतिशय क्षुधा लागलीच होती; ह्मणून त्यानें कांहींएक न बोलतां क्षुधेचें आणि तृषेचें शांतवन केलें. नंतर **आस्वलराजानें हातिमास** पुन्हां तूं माझ्या कन्येबरोबर लग्न कर-तोस किंवा नाहीं असें विचारिलें; परंतु त्याचाही जबाब जेव्हां त्यानें दिला नाहीं तेव्हां आस्वलराजास अतिशय संताप येऊन त्यानें **हातिमास** पुन्हां बंदिखान्यांत नेऊन टाकण्याविषयीं सेवकांस हुकूम केला. त्या प्रमाणें सेवकांनीं **हातिमास** नेऊन पूर्वींच्याच गु-हेमध्यें कोंडून ठेविलें. पुढें एके दिवशीं **हातीम** दुःख निद्रेच्या स्वाधीन झाला असतां त्याला स्वप्नांत एक **साधुपुरुष** दिसला; तेव्हां **हातीमानें** त्यास साष्टांग नमन केलें. नंतर तो **साधु** ह्मणालाः—हे **हातिमा,** ज्या कामाकरितां तूं सौख्याचा त्याग क-रून हा प्रवासीपणा पतकरलास तें काम करावयाचें सोडून ह्या बंदिवासांतच कां पडून राहिलास? **हातीम** ह्मणालाः—जर मी ह्या **आस्वलकन्ये**बरोबर लग्न केलें तर तो मला कार्य सिद्धचर्थ न जाऊं देतां येथेंच रहावयास सांगेल. ह्मणजे मग आपल्या हातानें पायांवर दगड घेतल्या सारखें होईल. असें समजून मी त्याची ती गोष्ट मान्य केली नाहीं. ह्मणून त्यानें मला या बंदिखान्यांत टा-किलें. त्यावर तो **साधु** ह्मणालाः—हे **हातिमा,** तूं मनांत कोण-त्याही रीतीची शंका न आणितां त्या **आस्वलकन्ये**बरोबर विवाह कर. नंतर कांहीं दिवस येथेंच राहून स्त्रीला सांगून तिच्या बापाची पर-वानगी माग, ह्मणजे तो तुला कार्य सिद्धचर्थ जाण्यास परवानगी देईल; इतकें सांगून तो सिद्ध अदृश्य झाला.

पुढें एक दोन दिवस गेल्यावर **आस्वलराजानें हातिमास** बंदि-वासांतून सोडवून आपल्या जवळ आणून बसविलें, आणि पुन्हां लग्नाची गोष्ट काढली. तेव्हां **हातिमानें** तावडतोब आपली मा-न्यता दर्शविली. ती पाहून **आस्वलराजास** अतिशय आनंद झाला. नंतर त्यानें लग्नाची सर्व सिद्धता करवून आपल्या चालीप्रमाणें उ-भयतांचाही विवाह सुमुहूर्तावर लाविला, आणि त्या दोघांस एका

सुशोभित अशा बंगल्यांत रहावयास जाण्यास सांगितलें. पुढें प्रतिदिवशीं **हातिमास** खाण्याकरितां **आस्वलराज** निरनिराळ्या जातीचीं मधूर फळें पाठवीत असे. परंतु त्यास तीं फळेंच खाऊन राहण्याचा कंटाळा आल्यामुळें त्यानें आपल्या सासऱ्यास मानवी पाकनिष्पत्तीचें कांहीं सामान आणावयास सांगितलें. त्याप्रमाणें **आस्वलराजानें** ताबडतोब आपले सेवक पाठवून कणीक, साखर, दुध वगैरे सामान व भांडीं कुंडीं आणविलीं. मग **हातीम** स्वहस्तें पाकनिष्पत्ती तयार करून स्त्री सहित भोजन करून मोठ्या आनंदानें कालक्रमण करूं लागला.

या प्रमाणें सहा महिनेपर्यंत तेथें राहिल्यावर एके दिवशीं त्यानें आपल्या स्त्रीस स्वगृहाचा त्याग करून प्रवासास निघण्याचें कारण सांगितलें; व कार्यभाग उरकल्यावर परत येण्याचें वचनही तिला देऊन जाण्याची परवानगी मागूं लागला. हें ऐकून **आस्वलकन्या** आपल्या बापाजवळ गेली आणि तिनें **हातिमाची** मनीषा त्यास कळविली. तीं ऐकून तो ह्मणाला, जर तूं त्याला जाण्याची परवानगी देत असलीस तर माझी कोणत्याही प्रकारची हरकत नाहीं. **आस्वलकन्या** ह्मणाली, आजपर्यंतच्या त्यांच्या सद्वर्तनावरून त्यांनीं जें मला वचन दिलें आहे त्या प्रमाणें कार्यभाग उरकल्यावर ते खरोखरी परत येतील असें मला वाटतें; सबब त्यांस जाण्याची आज्ञा देण्यास कोणतीही हरकत नाहीं. कन्येचें हें भाषण ऐकून **आस्वलराजानें** ही गोष्ट ताबडतोब मान्य केली आणि आपल्या कांहीं सेवकांस **हातिमास** राज्यसीमेपर्यंत पोंचविण्यास जाण्याची आज्ञा केली.

नंतर एक दोन दिवसांनीं **हातीम** सर्वांची आज्ञा घेऊन कार्यसिद्ध्यर्थ निघाला; तो मजल दरमजल करीत करीत कांहीं दिवसांनीं एका निर्मनुष्य अशा रेतीच्या मैदाना जवळ येऊन दाखल झाला. नंतर परमेश्वरस्तवन करून तो त्या वाळवंटांतून जात असतां एके दिवशीं एक विशाळदेही **अजगर, हातिमाचे** दृष्टीस पडला. परंतु प्रथमतः **हातिमास** ही एक वाळूची टेंकडी असावी असा भास झाला. त्यामुळें तो निर्धास्त रीतीनें जात असतां

जेव्हां त्या **अजगराचे** अगदीं नजीक गेला तेव्हां त्यानें आपल्या श्वासोश्वासानें **हातिमास** आकर्षण करून गिळून टाकिलें नंतर आपण **अजगराचे** पोटांत आहों असें जेव्हां **हातिमास** समजलें तेव्हां त्यानें परमेश्वराची फारच स्तुती केली, आणि धैर्य धरून तो त्या **अजगराचे** पोटांतच तीन दिवसपर्यंत स्वस्थ पडून राहिला. कारण ज्या वेळेस **हातीम** आपल्या श्वशूर गृहाहून निघाला त्या वेळेस त्याच्या स्त्रीनें एक जादूचें मोतीं त्याच्या पागोट्यांत ठेविलें होतें. त्या मोत्याचे आंगीं असा गूण होता कीं, ज्याचे जवळ तें असेल त्यास अग्नीची किंवा विषाची बाधा बिलकुल व्हावयाची नाहीं. असा त्या मोत्याचे आंगीं गूण असल्यामुळेंच **अजगराच्या** विषाची **हातीमास** बाधा न होतां तो त्याचे पोटांत जिवंत राहिला होता. परंतु त्या **अजगरानें** जो उदर भरण्याकरितां भक्ष्य मिळविला होता तो न पचल्यामुळें त्यास अतिशय त्रास होऊन तो ओकला तेव्हां **हातीम** बाहेर पडला व तो **अजगर** पळून गेला. नंतर **परमेश्वरकृपेनें** आपण सुरक्षित रीतिनें संकटमुक्त झालों असें समजून त्यानें जगन्नियंत्याची कांहींवेळ प्रार्थना केली, आणि तो पुढें मार्गक्रमण करूं लागला. पुढें जातां जातां कांहीं वेळानें तें वाळूचें मैदान सरून त्यास एक नदी लागली. तेव्हां **अजगराच्या** लाळेनें कपडे भिजले होते ह्मणून ते धुण्याकरितां **हातीम** त्या नदीवर गेला आणि कपडे धुवूं लागला. इतक्यांत एक सुंदर **मत्स्य** त्याचे दृष्टीस पडला. परंतु त्या **मत्स्याचें** वरचें अर्धें शरीर सुंदर स्त्रीच्या आकाराचें असून खालचा अर्धा भाग मात्र **मत्स्याकृति** होता. त्या **मत्स्यास** पहातांच **हातिमास** अतिशय चमत्कार वाटून ही कोणी तरी **मत्स्यकन्या** असावी असा त्यानें तर्क केला. इतक्यांत ती **मत्स्यकन्या** अगदीं किनाऱ्यावर आली आणि **हातिमाचा** हात धरून त्यास बलात्कारानें नदींत ओढून घेऊन गेली. **मत्स्यकन्येच्या** हातून सुटण्याकरितां **हातिमानें** त्यावेळीं पुष्कळ प्रयत्न केला परंतु त्याचा तो सर्व यत्न अगदीं निर्फळ झाला. पुढें त्या **मत्स्यकन्येनें हातिमास स्वस्थानास** नेल्यावर आपण एका सुंदर महालांत असून रत्न-

जडित पलंगावर बसलों आहों, आणि एकांतवासाचा कंटाळा न यावा ह्मणून ती **मत्स्यकन्या** अनेक तऱ्हेनें आपलें मनरंजन करीत आहे असें **हातिमास** वाटलें. पुढें कांहीं वेळानें त्या **मत्स्यकन्येनें** आपला अंगिकार करून सुखानें कालक्रमण करीत रहाण्याविषयीं **हातिमाची** प्रार्थना केली. तेव्हां **हातिमानें** आपल्या प्रवासाचें सर्व कारण तिला सांगितलें आणि ह्मणालाः—मी हातीं घेतलेलें काम पुरें झालें ह्मणजे तुझे हेतू पूर्ण करीन. हें **हातिमाचें** भाषण ऐकून **मत्स्यकन्यकेचें** मन जरासें हिरमुसलें.

पुढें सात दिवस पर्यंत **हातीम** त्या ठिकाणीं राहिल्यावर आपणांस पूर्ण स्थळीं नेऊन सोडण्याविषयीं तो तिची प्रार्थना करूं लागला. तेव्हां ती ह्मणालीः—आपण आज सात दिवसपर्यंत जसे येथें राहिलां तसेच आणखीं तीन दिवस रहा ह्मणजे मी तुह्मांस पूर्व स्थळीं नेऊन सोडीन. **हातिमानें** ती गोष्ट मान्य केली. नंतर तीन दिवस गेल्यावर चौथे दिवशीं त्या **मत्स्यकन्येनें** निराशेनें **हातिमास** आणून पूर्वस्थळीं सोडिलें; आणि ती अदृश्य झाली. पुढें **हातिमानें** आपले कपडे वगैरे धुऊन वाळविले आणि ते परिधान करून तो पुढें मार्ग क्रमण करूं लागला. जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एका पर्वताजवळ येऊन पोहोंचला. त्या पर्वताचीं शिखरें अति ऊंच गेलेलीं असून त्यावर निबिड वृक्षछाया होती. तीं पाहून **हातिमास** अतिशय आनंद होऊन तो त्या झाडींत शिरला. आणि पहातो तों निर्मळ पाण्याचे झरे तेथें वाहत असून हवा खाण्या करितां कांहीं बाकेंही तेथें ठेविलीं होतीं. **हातीम** त्यावेळीं अतिशय दमला होता ह्मणून तें विश्रांति स्थल पाहून तेथील एका बांकावर जरासा बसला तोंच त्याला गार झोंप लागली. इतक्यांत त्या जागेचा धनी त्या रस्त्यानें जात असतां **हातिमास** निजलेला पाहून त्याच्या शेजारीं जाऊन बसला. पुढें कांहीं वेळानें **हातीम** जागा झाला; आणि पाहातो तों आपल्या शेजारीं कोणी एक परका मनुष्य बसला आहे; असें पाहून त्यानें त्यास सलाम केला. तेव्हां त्या जागेच्या मालकानें **हातिमास** उलट सलाम करून 'कोठें जातां' असें विचारलें. त्यावर **हातीम** ह्मणालाः—मला

हौदाचे अरण्यांत जावयाचें आहे. तें ऐकून तो मनुष्य ह्मणाला:—तूं कोणी तरी वेडा मनुष्य आहेस असें मला वाटतें. कारण, आज पर्यंत जितके मनुष्य त्या अरण्यांत गेले त्या पैकीं कोणीही जिवंत परत आलेले मी पाहिले नाहींत. असें असतां तूं आपला सुखाचा जीव विनाकारण दुःखांत टाकतोस या तुझ्या वेडेपणास काय ह्मणावें! हें त्याचें भाषण ऐकून **हातिमानें** त्या अरण्यांत जाण्याचें सविस्तर कारण त्यास निवेदन केलें. तें ऐकून तो मनुष्य ह्मणाला:—यावरून तूं **हातीम** असावास असें मला वाटतें. कारण, एका **हातिमा** वांचून दुसऱ्या करितां असें जिवावरचें काम कधींही पतकरणार नाहीं. असो, आतां आपण हौदाचे अरण्यांत जाणारच तर मी जी गोष्ट सांगतों ती पक्की लक्षांत धरा. कारण, तेथें गेल्यावर तुह्मी **ऐंद्रजालिक** पाशांत बद्ध व्हाल. मग तेथें तुमचा कांहीं एक जोर चालणार नाहीं. आज पर्यंत जितके मनुष्य तेथें गेले त्यापैकीं सुखरूप असा कोणीच आला नाहीं. परंतु जे आले ते ह्या जगांतील सर्व सुखास अंतरून वेडे होऊन रानोरानीं भटकूं लागले. आतां मी तुह्मांस जी गोष्ट सांगणार ती ही कीं, त्या अरण्याचे आसपास तुह्मी गेलां ह्मणजे पुष्कळ स्त्रियांचा जमाव तुमच्या सभोंवतीं जमेल. परंतु त्यांत जी कुरुळ केशी, कंबुकंठी, चारुगात्री, अशी स्त्री असेल तिला पाहून तुमचें मन मोहव्यापी होईल, पण अशासमयीं जर तुह्मी मनोनिग्रह कराल तर तावडतोब हौदाचे अरण्यांत जाल, आणि जर तुमचें मन अनावर होईल तर आमरणांत दुःख भोगीत रहाल. इतकें त्या दोघांचें बोलणें होत आहे इतक्यांत एक मनुष्य पक्कान्नांनीं भरलेलीं दोन ताटें व उत्तम पाण्यानें भरलेले दोन तांबे घेऊन आला. नंतर त्या जागेच्या मालकानें **हातिमास** भोजन करण्याचा अतिशय आग्रह केल्यावरून त्या उभयतांनींही तेथें भोजन केलें. भोजनोत्तर बराच वेळ इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर रात्र झाली ह्मणून ते उभयतांही एका बंगल्यांत जाऊन स्वस्थ झोंपीं गेले मग उजाडल्यावर **हातीम** त्या धन्याची आज्ञा घेऊन तेथून मार्ग क्रमण करूं लागला.

पुढें जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एक **सरोवरा**जवळ येऊन पोहोंचला. त्या **सरोवरा**सभोंवतीं निबिड वृक्षछाया असून तें स्वच्छ पाण्यानें तुडुंब भरलें होतें. हें पाहून आनंदाश्चर्यानें चकित होऊन तो तेथें कांहीं वेळ उभा राहिला. इतक्यांत एक नग्न **अप्सरा** त्या **सरोवरां**तून बाहेर आली. ती **अप्सरा** जरी अतिशय सुंदर व सतेज होती तरी पूर्वीं बागेच्या धन्यानें सांगितलेली गोष्ट **हातिमा**च्या मनांत चांगलीच वागत असल्यामुळें त्यानें तिच्याकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं. इतक्यांत ती **अप्सरा, हातिमा**जवळ आली आणि त्याचा हात धरून त्यास ओढून तलावांत घेऊन गेली, प्रथमतः कांहीं वेळपर्यंत आपण खालीं जात आहों असें **हातिमास** वाटलें. परंतु जेव्हां त्याचे जमिनीला पाय लागले तेव्हां त्यानें डोळे उघडून पाहिलें तों ज्या **अप्सरेनें** आपला हात धरून आणलें ती अदृश्य झाली असून आपण एका रम्य अशा बागेंत उभें आहों असें त्यास वाटून तो फारच चकित झाला. नंतर बागेची शोभा पाहत पाहत जात असतां हजारों **अप्सरांनीं** त्याचे भोंवतीं गरका घातला, आणि प्रत्येक **अप्सरा** आपाआपल्या नेत्रकटाक्षरूप कामशरानें **हातिमाचें** मन विषयलोलुप करण्याचा प्रयत्न करूं लागल्या. परंतु हें सर्व **इंद्रजाल** आहे असें **हातिमास** पक्कें माहीत असल्यामुळें त्याणें त्यांच्या कामी चेष्टांकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं, असा प्रकार चालला आहे इतक्यांत एक नवयौवना **अप्सरा** आली आणि **हातिमा**चा हात धरून त्यास एका रत्नखचित महालांत घेऊन गेली. त्या महालांत एक रत्नजडित **सिंहासन,** दिवाण खान्याच्या मधोमध मांडलें होतें. तें पाहून तर **हातिम** अगदीं चकित होऊन गेला. नंतर त्यास त्या **सिंहासना**वर बसण्याची इच्छा झाल्यावरून तो त्या **सिंहासना**जवळ गेला आणि वर बसण्याच्या उद्देशानें त्यानें **सिंहासना**च्या पायरीवर पाय ठेवला. इतक्यांत एक मोठा गंभीर ध्वनी निघाला. तो ऐकून **हातिमास** थोडेंसें आश्चर्य व थोडी भीतीही वाटली. परंतु त्याची विशेष पर्वा न करितां तो त्याजवर जाऊन बसला. पुढें कांहीं वेळ गेल्यावर बागेच्या धन्यानें सांगितल्याप्रमाणें एक अतिशय

सौंदर्यवान, तेजस्वी व अलंकार भूषित अशी तोंडावर बुरखा घेतलेली स्त्री ज्या सिंहासनावर **हातीम** बसला होता त्याचे शेजारीं येऊन उभी राहिली. त्यावेळीं तिच्या तोंडावरचा बुरखा काढावा असें त्यास वाटलें, परंतु वेळोवेळीं पूर्वींचा सदुपदेश त्याच्या अनावर मनास आकलन करीत असे ह्मणून त्यानें तो बेत रहित केला. मग त्या महालांतील चमत्कार पहाण्याच्या उद्देशानें तो त्या **सिंहासनाव**रच तीन दिवस पर्यंत बसून राहिला. तितक्या वेळांत सदोदित त्याच्या कानीं गाण्याचा सुस्वर व मधुर शब्द पडत होता. त्या महालांत रात्रीच्या वेळीं जे **ऐंद्रजालीक** दिवे लागत असत त्याचा उजेड दिवसाच्या प्रकाशाप्रमाणें पडत होता. परंतु ते दिवे मात्र दिसत नसत. **हातिमास** खाण्याकरितां जे पदार्थ त्याजपुढें **अप्सरा** आणून ठेवीत, ते तो खात असे; परंतु त्याची क्षुधा मुळींच तृप्त होत नसे. असे हे अद्भुत चमत्कार पहातां पहातां तीन दिवस गेल्यावर चौथे दिवशीं **हातिमानें सिंहासना**जवळ जी **अप्सरा** उभी होती तिचा हात धरला. इतक्यांत **सिंहासनां**तून एक स्त्री बाहेर आली आणि तिनें **हातिमास सिंहासना**वरून ओढून एक जोराचा ठोंसा मारला. त्या सरसा **हातीम** मूर्च्छागत होऊन जमीनीवर पडला. पुढें कांहीं वेळानें सावध झाल्यावर तो डोळे उघडून पाहूं लागला तों आपण एका ओसाड जंगलांत आहों असें त्यास वाटलें. तेव्हां **हौदाचें** अरण्य ह्मणतात तें हेंच असावें असा त्यानें तर्क केला. नंतर थोडावेळ विश्रांती घेतल्यावर तो मार्ग क्रमण करूं लागला असतां " **मी एकवेळ पाहिलें आहे पण पुनः पाहण्याची हौस आहे** " असे शब्द त्यानें ऐकिले. हे शब्द ऐकतांच त्यास अतिशय आनंद होऊन तो त्या शब्दांच्या रोखावर आठ दिवस पर्यंत चालला होता; तितक्या दिवसांत फक्त हे वरील शब्द मात्र ऐकूं येत असत, परंतु हे शब्द करणारा मनुष्य त्याला मुळींच भेटला नाहीं. शेवटीं नववे दिवशीं संध्याकाळच्या सुमारास एक वृद्ध मनुष्य जमिनीवर निचेष्ट पडलेला त्याचे दृष्टीस पडला. त्यास पहातांच **हातिमानें** मोठ्या नम्रतेनें सलाम केला, तेव्हां त्या वृद्ध मनुष्यानेंही त्यास उलट सलाम केला. नंतर त्या वृद्ध मनु-

त्यानें हातिमास 'आपण येथें कोठें?' असा प्रश्न केल्यावरून हातिमानें आपल्या येण्याची सर्व हकीगत त्यास सांगितली. ती ऐकतांच तो वृद्ध मनुष्य ह्मणाला:—ज्या मनुष्याचा शोधाकरितां तुह्मी फिरत आहां तो मीच मनुष्य आहें. तुह्मी येथें बसा ह्मणजे मी सर्व हकीगत तुह्मास सांगतों. हें त्याचें भाषण ऐकतांच हातिमास अतिशय आनंद होऊन तो त्या मनुष्याच्या शेजारीं बसला. इतक्यांत पक्कान्नांनीं भरलेलीं दोन ताटें व स्वच्छ पाण्यानें भरलेले दोन तांबे त्या ठिकाणीं उत्पन्न झाले. नंतर त्या दोघांनीं यथेच्छ भोजन केल्यावर तो वृद्ध मनुष्य ह्मणाला:—एके दिवशीं मी एका सरोवराच्या कांठीं उभा होतों तों एक सुंदर स्त्री त्या तळ्यांतून बाहेर येऊन मला त्या तळ्यांत घेऊन गेली. मग मी डोळे उघडून पाहूं लागलों तेव्हां एक सुंदर बाग माझ्या नजरेस पडला. कांहीं वेळ त्या बागेची शोभा पहात होतों इतक्यांत हजारों सुंदर स्त्रियांनीं येऊन माझ्या भोंवतीं गराडा घातला. नंतर त्यांनीं मला एका रत्नखचित महालांत नेलें. तेथें एक रत्नजडित सिंहासन होतें; त्यावर बसून त्या बंगल्याची मी शोभा पहात आहें तोंच एक बुरखा घेतलेली सुंदर स्त्री सिंहासनाजवळ येऊन उभी राहिली. त्यावेळीं माझें मन अनावर होऊन मी तिच्या तोंडावरचा पडदा काढिला तेव्हां ती मोठ्यानें हंसली. त्यामुळें मला फारच आनंद होउन तिला **सिंहासनावर** बसवावें या उद्देशानें मी तिचा हात धरला इतक्यांत त्या **सिंहासनातून** एक **स्त्री** बाहेर आली आणि तिनें मला एक ठोंसा मारला. त्यामुळें मी या अरण्यांत येऊन पडलों. माझें सारें लक्ष त्या सुंदरीच्या स्वरूपाकडे वेधल्यामुळें रात्रंदिवस मी या अरण्यांत भटकत आहें. इतकी हकीगत सांगून तो वृद्ध मनुष्य मोठ्यानें रडूं लागला, आणि ह्मणाला:—"**जें मी एकवेळ पाहिलें आहे तेंच पुनः पहाण्याची हौस आहे.**" हें त्याचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणाला:—हे वृद्ध मनुष्या, जें तूं एक वेळ पाहिलें आहेस तें मी पुनः तुला दाखवितों; तरी तूं मजबरोबर चल. ही गोष्ट वृद्ध मनुष्यानें तत्काळ मान्य केली व ते उभयतांही त्याच वेळीं तेथून निघाले; ते कांहीं दिवसांनीं त्या सरोवराच्या कांठीं आले. नंतर **हातीम** त्या वृद्ध

मनुष्यास ह्मणालाः---आतां एक अप्सरा ह्या सरोवरांतून बाहेर येऊन तुला त्या महालांत घेऊन जाईल. परंतु तेथें गेल्यावर जी अप्सरा तुझ्याजवळ येऊन उभी राहिल तिचा जर तूं हात धरणार नाहींस किंवा तिच्या तोंडावरचा पदर काढणार नाहींस तर जें पहावयाची तुझी इच्छा आहे तें तुला पहावयास मिळेल पण जर कां तूं तिचा हात धरलास तर हल्लीं जें दुःख तूं भोगतो आहेस तेंच दुःख सदोदित भोगीत राहशील असें सांगून तो त्या वृद्ध मनुष्याची रजा घेऊन तेथून निघाला.

पुढें जातां जातां कांहीं दिवसांनीं तो पूर्वीच्या पहाडावर येऊन पोहोंचला. नंतर तेथील मालकाची भेट घेऊन त्यानें सर्व वर्तमान त्यास निवेदन केलें. पुढें एक दोन दिवसांनीं तो त्याची आज्ञा घेऊन निघाला तो आपल्या श्वशुरगृहीं येऊन पोहोंचला. नंतर स्वस्त्री समवेत एक महिना पर्यंत तेथें राहून सर्वांचा निरोप घेऊन तो तेथून निघाला, आणि वाटेनें पूर्वीच्या हरिणाची भेट घेऊन, कांहीं दिवसांनीं शाहाबादेस येऊन पोहोंचला. तेव्हां हस्नबानूच्या चाकरांनीं त्यास ओळखून धर्म शाळेंत नेलें. त्या ठिकाणीं शहाजादा मुनीरशहा हा होताच. त्याची आणि हातिमाची भेट होतांच उभयतांही एकमेकांस कडकडावून भेटले. नंतर हातिमानें आपल्या प्रवासाची सर्व हकीगत त्यास निवेदन केली.

दुसरे दिवशीं शहाजाद्यास बरोबर घेऊन हातीम हस्नबानूच्या महालांत गेला. त्यास पहातांच तिला अतिशय आनंद झाला. पुढें कांहींवेळ इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर हातिमानें त्या वृद्ध मनुष्याची व सरोवरांतील ऐंद्रजालिक चमत्कार करणाऱ्या अप्सरांविषयीं सर्व हकीगत बानूस सांगितली. ती ऐकून बानूस व तिच्या दासीस अतिशय आनंद होऊन त्या ह्मणाल्याः——आपण सांगतां ही सर्व हकीगत खरी आहे. कारण, हल्लीं तसा आवाज मुळींच होत नाहीं. इतकें बोलणें झाल्यावर हातीम दुसरा प्रश्न विचारूं लागला. तेव्हां बानू ह्मणाली, आपणांला पहिल्या प्रश्नाच्या संबंधानें बरेच श्रम झाले आहेत तरी चार दिवस माझे येथें विश्रांति घेऊन नंतर दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर आणण्यास जावें

त्यावर **हातीम** ह्मणालाः—ज्यावेळीं मी तुमच्या सातही प्रश्नांचा जबाब देऊन **मुनीरशहा**ची मनीशा तृप्त करीन त्याच वेळीं विश्रांति घेईन. हें त्याचें भाषण ऐकून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. नंतर **हातीम** जावयास निघाला तेव्हां **बानू** ह्मणालीः—माझा दुसरा प्रश्न असा आहे कीं, "**चांगलें करा आणि पाण्यावर टाका.**" अशीं अक्षरें एका मनुष्यानें आपल्या दारावर लिहिलीं आहेत. तरी त्या मनुष्याचा शोध करून त्यानें कोणतें सत्कृत्य केलें आहे तें मला कळवा. **बानू**चें हें भाषण ऐकून **हातीम** तिची व **मुनीरशहा**ची आज्ञा घेऊन दुसऱ्या प्रश्नाच्या शोधाकरितां **शहाबादे**हून निघाला.

## पहिला प्रश्न समाप्त.

---

# प्रश्न दुसरा.

## "चांगलें करा व पाण्यावर टाका."



**हस्नबानू**स दुसरा प्रश्न विचारून ज्यावेळेस **हातीम शहाबादे**हून निघाला त्यावेळेस त्यानें तो मनुष्य कोठें रहातो असें तीस विचारलें. तेव्हां ती ह्मणालीः—ज्या मनुष्यानें आपल्या दरवाज्यावर माझा प्रश्न लिहिला आहे तो उत्तर दिशेकडे जें **मार्दम** नांवाचें शहर आहे तेथें रहातो. परंतु तें शहर कोणाच्या प्रांतांत आहे हें मला मुळींच माहीत नाहीं. **बानू**चें हें भाषण ऐकतांच **हातीम** तावडतोब उत्तर दिशेचा मार्ग क्रमूं लागला. जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एका घोर अरण्यांतून जात असतां संध्याकाळ झाली ह्मणून वस्ती करण्याच्या उद्देशानें तो एका झाडा खालीं बसला असतां आसपास कोणी मनुष्य रडतें आहे असें त्यानें ऐकलें. तेव्हां **हातीमा**स अतिशय वाईट वाटून त्या रडणाऱ्या मनुष्याचा शोध करून रडण्याचें कारण त्यास विचारावें असें वाटून तो तेथून उठला; आणि ज्या दिशेकडून तो आवाज येत

होता तिकडे जावूं लागला. कांहीं वेळ चालल्यावर एक मनुष्य मोठ्यानें रडत भूमिवर पडला असून 'मी कोठें जावूं? आणि दुःख परिहार होण्यास कोणता उपाय करूं? मला तर कांहीं सुचत नाहीं. कारण, पंचशरानें माझें अंतःकरण अगदीं विद्ध करून सोडलें आहे.' असा विलाप करीत असलेला **हातिमाच्या** नजरेस पडला. हे त्याचे दुःखित शब्द ऐकून **हातीम** धांवत धांवत त्या मनुष्याजवळ गेला आणि ह्मणालाः—मित्रा ज्या अनावर दुःखाच्या योगानें तुझें मन विचारशून्य होऊन दुःखसमुद्रांत गटंगळ्या खात आहे, तें दुःखाचें कारण मला मेहरबानी करून सांग. दुःखी मनुष्य ह्मणालाः—महाराज मला जें दुःख झालें आहे तें आपणांस सांगून काय फळ? कारण, त्यापासून कांहीं एक फायदा न होतां उलट पुनरावृत्ति केल्यानें तें दुःख मात्र जास्त दुणावेल. हें ऐकून **हातिमानें** दुःखाचें कारण सांगावें ह्मणून त्या मनुष्याची अतिशय प्रार्थना केल्यावरून तो दुःखी मनुष्य ह्मणालाः—महाराज, मी एक व्यापारी आहें आणि व्यापारानिमित्त येथून दोन कोशांवर जें एक शहर आहे तेथें मी जात असें त्याच शहरांत '**हारिथ**' या नांवाचा एक व्यापारी असून त्यास इंद्राच्या अप्सरांसही लज्जित करणारी अशी एक सौंदर्यवान कन्या आहे. एके दिवशीं मी त्या शहरास कांहीं कामाकरितां गेलों असतां ज्या रस्त्यावर त्या व्यापाऱ्याचें घर होतें त्या रस्त्यावरून चाललों होतों. त्यावेळेस ती **चंद्रवदना** कन्या आपल्या घराच्या खिडकींत उभी होती. तिची व माझी अकस्मात् दृष्टादृष्ट होतांच पंचशरानें माझें मन विद्ध होऊन मी अगदीं वेड्यासारखा झालों. पुढें त्या घराच्या मालका विषयीं व त्या कन्येविषयीं तपास करितां ती **हारीथ**नामक एका व्यापाऱ्याची कन्या असून अविवाहित आहे, आणि तिच्याजवळ जे तीन '**प्रश्न**' आहेत त्यांचीं जो उत्तरें देईल त्याच्याच बरोबर तिचा विवाह होणार असें मी ऐकिलें. मला त्या सुंदरीचा चटकाच लागून गेलेला असल्यामुळें मी **हारीथ** व्यापाराच्या घरीं गेलों आणि त्यास आपला मनोदय कळविला. तेव्हां तो ह्मणालाः—तुझी ह्मणतां ही गोष्ट माझ्या

कडून व्हावयाची नाहीं. कारण, तिचे जे तीन प्रश्न आहेत त्यांचीं जो उत्तरें देईल त्यासच ती वरणार असल्यामुळें तुह्मी तिजकडेस जाऊन आपला हेतू कळवा. हें त्याचें भाषण ऐकून मी ताबडतोब **हारिथ** कन्येच्या महालीं गेलों आणि येण्याचा उद्देश दासीहस्तें तिला कळविला. तेव्हां तिनें आपल्या चाकरांकडून एका सुंदर दिवाणखान्यांत नेऊन बसविलें पुढें कांहीं वेळानें ती **चंद्रवदना सावकारकन्या** ज्या दिवाणखान्यांत मी बसलों होतों तेथें आली आणि ह्मणालीः—मी ज्या अटी सांगेन त्या जर आपण मान्य कराल तरच मी तुमच्या जवळ बोलेन, नाहींतर एकशब्द सुद्धां तुह्मांजवळ बोलणार नाहीं. ह्या तिच्या भाषणास मी आपली ताबडतोब संमती दिल्यावरून ती ह्मणालीः—आपली इच्छा जर मजबरोबर लग्न करावयाची असेल तर मी जे तीन प्रश्न सांगतें त्याचीं उत्तरें आणून द्या; ह्मणजे मग मी तुमचा मनोदय पूर्ण करीन, आणि एकवेळ उत्तरें देतों असें ह्मणून जर त्याप्रमाणें वर्तलां नाहीं तर मी आपली सर्व संपत्ती व मालमत्ता पणादाखल हिरावून घेईन. **मित्रा,** त्यावेळीं माझी स्थिति अनंगाच्या प्रतापानें मोहव्यापी झाली होती ह्मणून मी तिचें ह्मणणें तत्काळ कबूल केलें, आणि तुझे कोणचे प्रश्न आहेत ते मला सांग; ह्मणजे मी त्यांचीं उत्तरें आणून देतों असें ह्मणालों. त्यावरून ती ह्मणालीः—माझा पहिला प्रश्न असा आहे कीं, "**ह्या शहराच्या नजीक एक गुहा आहे, ती किती लांब आहे व तिच्या आंत काय आहे याचा शोध करणें;**" व दुसरा **प्रश्न** असा आहे कीं प्रति गुरुवारीं रात्रीं अरण्यामध्यें एक मनुष्य असें ह्मणतो कीं; "**आज मला उपयोगी पडेल असें मी कांहीं केलें नाहीं.**" तरी ह्या मनुष्य कोण आहे व तो असे शब्द कां बोलतो याचा तपास करा, आणि तिसरा **प्रश्न** असा आहे कीं, "**महापरी या नांवाच्या एका गंधर्वकन्येजवळ शहामोरा या नांवाचा हिरा आहे तो मला आणून द्या.**"

**मित्रा,** हे तिचे तिन्ही **प्रश्न** ऐकतांच मी ताबडतोब आपल्या घरीं आलों, आणि आपली सर्व मालमत्ता तिच्या घरीं पोंचती

करून तें शहर सोडून या अरण्यांत आलों परंतु आतां कोठें जावें आणि काय करावें हें मला बिलकुल सुचत नाहीं त्यामुळेंच मी हा असा शोक करीत पडलों आहें.

हें त्याचें भाषण ऐकतांच **हातीम** त्यास ह्मणाला:---**मित्रा,** तूं कांहींएक काळजी न करितां स्वस्थ ऐस. फक्त मला त्या शहरास घेऊन चल ह्मणजे ती स्त्री मी तुला प्राप्त करून देतों. **हातिमाचें** हें भाषण ऐकतांच त्या दुःखी मनुष्यास अतिशय आनंद होऊन ते उभयतांही तत्काळ तेथून निघाले आणि कांहीं दिवसांनीं त्या शहरास येऊन दाखल झाले. तेव्हां **हातिमानें** त्या दुःखी मनुष्यास एका धर्मशाळेंत बसावयास सांगितलें आणि आपण तेथून निघून **हारीथ** सावकाराच्या **कन्येच्या** महालीं गेला. नंतर त्यानें एका चाकराबरोबर **हारीथ** सावकाराच्या **कन्येस** असा निरोप पाठविला कीं, कोणी एक गृहस्थ तुजकडे येऊन विवाहसंबंधीं कांहीं गोष्ट आपणाबरोबर बोलावयास इच्छितो आहे तरी एक वेळ बाहेर येऊन त्याचे हेतू पूर्ण करावे. चाकरानें हा निरोप आपल्या धनीनीस कळवितांच तिनें **हातीमास** दिवाणखान्यांत बोलाविलें. नंतर **हातीम** तेथें गेल्यावर ती ह्मणाली:—जर तुमच्या मनांतून माझ्या तीन प्रश्नांची उत्तरें द्यावयाचीं असलीं तरच लग्नसंबंधाच्या गोष्टी मजजवळ बोला, नाहींतर जसे आलेत तसेच परत जा. हें तिचें बोलणें ऐकून **हातीम** ह्मणाला:—जर तुझा बाप मी सांगेन त्याप्रमाणें लिहून देईल तर मी तुझ्या तिन्ही प्रश्नांचीं उत्तरें आणून देईन. आतां लिहून द्यावयाचें तें इतकेंच कीं, तुझ्या तिन्हीं प्रश्नांचीं उत्तरें दिल्यावर मी ज्या गृहस्था बरोबर तुझें लग्न लावावयास सांगेन त्याजबरोबर तें लावलें पाहिजे. हें **हातिमाचें** भाषण ऐकून सावकार **कन्येनें** ताबडतोब आपली संमति दर्शविली, आणि आपल्या बापास बोलावून आणून त्याजकडून **हातिमाच्या** ह्मणण्याप्रमाणें त्यास करार लिहून देवविला. नंतर ती ह्मणाली:—जर तुह्मी माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं नाहीं तर मी तुमचें काय करावें? **हातीम** ह्मणाला:—मजजवळ पणादाखल द्यावयास द्रव्य तर नाहींच. परंतु जर मी आपल्या प्रश्नांचीं उत्तरें

दिलीं नाहींत तर हें माझें शीर तुमच्याच हातांत आहे, याचें पाहिजे तें तुह्मी करा. हें भाषण ऐकून सावकारस्त्रीस अतिशय आनंद झाला आणि तिनें आपला पहिला प्रश्न **हातिमास** सांगितला. तो ऐकून **हातीम** सर्वांची रजा घेऊन तेथून निघाला आणि धर्मशाळेंत येउन मित्राची भेट घेऊन त्यास सर्व वर्तमान निवेदन केलें. नंतर त्यास तेथेंच रहावयास सांगून आपण त्या गुहेचा शोध करण्या करितां तेथून निघाला.

ज्यावेळेस **हातीम** सावकारकन्येच्या घराहून गुहेचा शोध करण्याकरितां निघाला त्यावेळेस तिनें गुहा दाखविण्यास व **हातीम** त्या गुहेंतून शोधकरून परत येईपर्यंत तेथें रहाण्यास आपले चाकर बरोबर दिले होतें. त्या चाकरांनीं **हातिमास** ती गुहा दाखवितांच तो तींत शिरला व एकसारखा जाऊं लागला. पुढें जातां जातां कांहीं दिवसांनीं त्यास थोडासा उजेड दिसला. त्यावरून आपण गुहेच्या शेवटापर्यंत आलों असें त्यास वाटलें. परंतु सावकारकन्येस सांगण्या सारखा कांहींच चमत्कार त्याचे नजरेस न पडल्यामुळें आणखी पुढें जावें असें वाटून तो तसाच पुढें जाऊं लागला. जातां जातां कांहीं वेळानें त्यास एक मोठें अरण्य लागलें. त्यांत स्वच्छ पाण्याचे सुंदर प्रवाह वाहत होते. ते पाहून **हातिमानें** आपल्या बरोबर बदामाच्या ज्या दोन पिशव्या आणल्या होत्या त्यांतील कांहीं बदाम खाऊन व त्या झऱ्यांचें पाणी पिऊन त्यानें आपल्या क्षुधेचें व तृषेचें निवारण केलें.

या प्रमाणें कांहीं दिवस चालल्यावर **हातिमाच्या** नजरेस एक मोठा मजबूत तट पडल्यावरून त्यानें त्याच्या आसपास फिरून तपास केला तों आंत एक मोठें शहर असलेलें त्याच्या नजरेस पडलें. त्यावरून तो आंत जावूं लागला असतां कित्येक राक्षस **हातिमास**भोंवतीं जमले व त्यास फाडून खाण्याचा विचार करूं लागले. परंतु इतक्यांत त्या राक्षसांपैकीं एकजण ह्मणालाः—सर्व प्राण्यांच्या मांसांत नरमांस फारच स्वादिष्ट व मधुर आहे. यास्तव या मनुष्याला आपण आपल्या राजाजवळ घेऊन जावें हें बरें. कारण जर आपण ह्यास मारून खाल्लें व ही गोष्ट राजास समजली

तर तो आपणा सर्वांचे प्राण घेतल्याशिवाय कधींही रहाणार नाहीं; यास्तव या मनुष्याच्या वाटेस बिलकुल जावूं नका. हें त्याचें ह्मणणें त्या बाकीच्या राक्षसांस मान्य होऊन ते तेथून निघून गेले, व **हातीम** पुढें मार्ग क्रमूं लागला. या गोष्टीस कांहीं वेळ गेला नाहीं तोंच दुसऱ्या एका राक्षस टोळीनें येऊन **हातिमास** वेढलें. त्यावेळीं त्याची प्राणांतिकच अवस्था व्हावयाची, परंतु त्यांतील एकजण ह्मणालाः—मित्रांनों, या मनुष्यास तुह्मीं मारूं नका. कारण, आपल्या राजाची एकुलती एक कन्या फारच आजारी असून तिला मानवी औषधोपचारानेंच गूण यावयाचा आहे, आणि यास्तव त्यानें हजारों मनुष्यांस आणून त्यांजकडून औषधोपचार करविले; परंतु गूण न आल्यामुळें त्यानें त्या सर्वांस बंदिखान्यांत टाकलें आहे. शिवाय आपले राजेसाहेबांसही अलिकडे पोटशुळाची व्यथा झाली आहे, आणि त्यामुळें त्यांच्या जिवास घटकाभरही चैन पडत नाहीं. अशी त्या दोघांची स्थिती असल्यामुळें आपण जर यास फाडून खाल्लें आणि ही गोष्ट राजास कळली तर आपणा सर्वांची फारच कठिण दशा होईल यास्तव आपण ह्यास सोडून द्यावा हें बरें.

हें त्या राक्षसाचें भाषण बाकीच्या मंडळीस मान्य होऊन ते तेथून निघून गेले, आणि **हातीम** तें शहर सोडून मजले मजलेनें दुसऱ्या एका शहरास येऊन दाखल झाला. इतक्यांत दुसऱ्या एका राक्षस टोळीनें येऊन **हातिमास** आपल्या सरदाराजवळ पकडून नेलें. त्या सरदाराचे स्त्रीच्या नेत्रांस एका प्रकारचा रोग झाला होता व त्यांतून नेहमीं पाणी वहात असे; या दुःखविवंचनेंत त्यावेळीं तो सरदार बसला होता. **हातिमास** राक्षसांनीं त्या सरदाराजवळ नेतांच तो त्रासून ह्मणालाः—या मनुष्यास तुह्मी मजकडेस कां आणलेंत! याला मर्जीस वाटेल तिकडे जावूंद्या. हें त्याचें त्रासदायक भाषण ऐकून **हातिमाच्या** मनांत त्याच्या दुःखाचें कारण विचारावें असें येऊन तो ह्मणालाः—महाराज, आपणांस असें कोणतें दुःख झालें आहे कीं, त्या दुःखाच्या योगानें आपली मानसीक स्वस्थता नष्ट होऊन काळजी करावी लागत आहे; याचें

कारण मला कळवा. सरदार ह्मणाला; मला जें अनावर दुःख झालें आहे तें तुह्मांस सांगून काय फळ? असो, ज्या आर्थी तूं विचारतोसच त्या अर्थी मी सांगतों कीं, माझ्या पत्नीस नेत्रसंबंधीं कांहीं एक दुःख झाल्यामुळें नेहमीं तिच्या डोळ्यांतून पाणी वाहतें, व त्यामुळें तिला एक क्षणभरसुद्धां चैन पडत नाहीं. सरदाराचें हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—जर तुह्मी तिला माझ्याजवळ आणाल तर परमेश्वरकृपेनें मी तिच्या दुःखाचें निवारण करीन.

**हातिमाचें** हें भाषण ऐकतांच सरदारास अतिशय आनंद झाला व तो **हातिमास** घेऊन ताबडतोब आपल्या स्त्रीच्या खोलींत गेला. नंतर **हातीम** ह्मणालाः—जर तुह्मी मला आपल्या राजाकडे नेण्याचें वचन द्याल तर मी ह्या स्त्रीचे डोळे बरे करितों. हें ऐकून सरदारानें **हातिमास** राजाकडे नेण्याची आपल्या **पैगंबराच्या** नांवाची शपथ घेतली. तेव्हां **हातिमानें** एका भांड्यांत स्वच्छ पाणी आणावयास सांगितलें. त्याप्रमाणें पाणी आणल्यावर **आस्वलकन्येनें** दिलेलें अनेकप्रकारचें गुणकारक मोतीं त्यानें पाण्यांत टाकिलें, आणि कांहीं वेळानें तें पाणी त्यानें सरदारस्त्रीच्या डोळ्यांस लाविलें. प्रथमतः त्या औषधापासून कांहींवेळ सरदार स्त्रीस पूर्वीं पेक्षांही जास्त दुःख वाटलें; परंतु तें पाणी दोन तीन वेळ डोळ्यांस लावतांच डोळ्यांची सूज निखालस उतरून व पाणी वहावयाचें बंद होऊन साफ दिसूं लागलें. हें पाहून सरदारास अतिशय आनंद होऊन त्यानें **हातिमाचे** फारच उपकार मानून त्यास कांहीं दिवस आपल्या येथें राहून घेतलें. व त्याचा जेवढा सत्कार करवला तितका केला. नंतर एके दिवशीं तो **हातिमास** बरोबर घेऊन आपल्या राजाकडे गेला, आणि **हातिमास** दुसरीकडे बसावयास सांगून आपण राजापुढें जाऊन हात जोडून ह्मणालाः—**राजाधिराज**, आपल्या राज्यांत महापरोपकारी, हुषार व वैद्यक्रियेमध्यें निष्णात असा एक मनुष्य आला असून त्यानें माझ्या स्त्रीस डोळ्यांच्या दुःखापासून एका दिवसांत बरें केलें; इतकी त्याची हुषारी आहे. सरदाराचें हें भाषण ऐकून राजा ह्म-

णाला:—असा जो गुणवान मनुष्य आहे त्यास लवकर मजकडे घेऊन या. हें ऐकून सरदारानें **हातिमास** ताबडतोब आणून राजापुढें उभें केलें. तेव्हां राजानें त्याचा मोठा सत्कार केला व त्यास ह्मणाला; हे मनुष्या, कांहीं दिवसांपासून मला पोटशुळाची व्यथा झाली आहे व तिच्या निरसनार्थ मी पुष्कळ औषधोपचारही केले परंतु गूण ह्मणून मुळींच आला नाहीं, तरी यास कांहीं उपाय कर. हें ऐकून **हातीम** ह्मणाला:—राजा ज्यावेळेस तुह्मी जेवावयास बसतां त्यावेळेस तुमचीं चाकर माणसें जवळ असतात काय? राजा ह्मणाला:—होय असतात. तेव्हां **हातीम** ह्मणाला:—आतां ज्यावेळेस तुह्मी जेवायास बसाल त्यावेळेस मला तेथें येण्याची परवानगी द्या. राजानें ती गोष्ट ताबडतोब मान्य केली. नंतर जेव्हां भोजनाची वेळ झाली तेव्हां **हातीम** व **राजा** असे दोघे पाकशाळेंत गेले, आणि सिद्ध केलेल्या पात्रावर राजा भोजनास बसला. इतक्यांत **हातिमानें** राजाच्या पात्रावरील एक पदार्थ उचलून सर्वांस दाखवून तो एका चाकराजवळ दिला आणि त्यास तो पदार्थ झांकून ठेवावयास सांगितला. पुढें सुमार अर्धा तासानें राजाचें भोजन वगैरे आटोपल्यावर **हातिमानें** तो झांकून ठेवलेला पदार्थ चाकरास आणावयास सांगितला. चाकरानें तो पदार्थ आणल्यावर **हातिमानें** त्या पदार्थांत उत्पन्न झालेले किडे सर्वांस दाखविले आणि राजास ह्मणाला:—महाराज, आपण जें दुःख भोगितां त्याचें मूळ कारण हेंच आहे. कारण, ज्या वेळेस आपण जेवावयास बसतां त्यावेळेस सभोंवतीं असलेल्या चाकर मनुष्यांची नजर आपल्या पानावर असल्यामुळें जे सुग्रास पदार्थ आपण खातां त्यावर त्यांची दृष्ट पडते; ह्या मुळेंच आपणांस ही पोटशुळाची व्यथा जडली आहे. तरी आजपासून तुह्मी एकांत स्थळीं भोजनास बसून खाण्यापिण्याच्या संबंधानें चाकरांचीही सुव्यवस्था ठेवीत जा. ह्मणजे थोडक्याच दिवसांत तुह्मी निखालस बरे व्हाल.

**हातिमाचें** हें भाषण ऐकून राजास फारच समाधान वाटलें व **हातिमानें** जसें वागावयास सांगितलें होतें त्याप्रमाणें वागल्यामुळें थोडक्याच दिवसांत त्याची प्रकृति पूर्ववत् झाली. नंतर राजानें

**हातिमा**चा अतिशय सत्कार करून त्यास इच्छित वस्तु मागण्यास सांगितलें. तेव्हां **हातीम** ह्मणालाः—**राजाधिराज**, या दासाची इच्छा जर आपण पूर्ण करणारच तर आजपर्यंत जितके मनुष्य बंदिखान्यांत टाकले असाल त्या सर्वांस मुक्त करा. **हातिमाचें** हें भाषण ऐकतांच राजानें आपल्या चाकरांकडून सर्व बंदिवान आपल्या समोर आणविले, आणि त्या सर्वांस वस्त्रालंकारांनीं भूषित करून व प्रवासापुर्ती वाटखर्ची देवून त्यानें बहुमानानें त्यांची रवानगी केली. नंतर राजा ह्मणालाः—माझ्या मनांतून तुझ्या जवळ एक गोष्ट बोलावयाची आहे; जर ऐकशील तर सांगतों. **हातीम** ह्मणालाः—**महाराज**, आपण जें सांगाल तें ऐकण्यास मी अगदीं तत्पर आहें. जी काय आज्ञा असेल ती करावी. राजा ह्मणालाः—आज पुष्कळ दिवसांपासून माझी कन्या आजारी आहे. पुष्कळ औषधोपचार केले तरी थोडासुद्धां गुण येत नाहीं. यास्तव जर तूं मेहेरबानी करून तिच्या महालापर्यंत येऊन कांहीं औषधोपचार करशील तर माझ्यावर तुझे अतिशय उपकार होतील. राजाचें हें भाषण ऐकून **हातीम** ताबडतोब जाण्यास तयार झाला. नंतर राजा व तो असे दोघे कन्येच्या महालीं गेले. तेव्हां **हातिमानें** तिचें तोंड पाहिलें, तों तें अगदीं फिक्कट झालेलें दिसलें. मग त्यानें थोडी साखर व थोडें पाणी आणवून त्यांचें मिश्रण केलें, आणि त्यांत **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं कांहीं वेळ टाकून तें तीस प्यावयास दिलें. त्यामुळें थोडीशी झोंप लागून ती बरीच हुषार झाली पुढें याप्रमाणें तीन दिवस केल्यावर तिचा रोग अगदीं बरा झाला. हें पाहून राजास अतिशय आनंद होऊन त्यानें **हातिमाचे** फारच उपकार मानले. नंतर एक दोन दिवस गेल्यावर **हातिमानें** आपल्या कार्यासाठीं जाण्याची राजाजवळ परवानगी मागितली. तेव्हां राजानें कांहीं अमोल्य जवाहीर व बावन कसी सोनें आणलें व तें घेण्याविषयीं **हातिमाची** प्रार्थना केली. **हातीम** पहिल्यानें तें घेईना, परंतु राजाचा अतिशय आग्रह पडल्यामुळें त्यानें त्याचा अंगिकार केला. नंतर आपले कांहीं राक्षस गुहेच्या तोंडापर्यंत पोंचवावयास देवून त्यानें **हातिमाची** रवानगी केली. ज्या गुहेंतून

**राक्षसीराजाच्या** घरापर्यंत येण्यास **हातिमास** पूर्वीं सहा महिने लागले होते त्याच गुहेच्या तोंडापर्यंत त्या **राक्षसांनीं हातिमास** तीन दिवसांत आणलें. गुहेच्या तोंडाजवळ येतांच ते **राक्षस** आपल्या जवळील द्रव्याचीं ओझीं तेथें ठेवून **हातिमाची** आज्ञा घेऊन ते चालते झाले. नंतर **हातिमानें** तीं द्रव्याचीं ओझीं **सावकारकन्येच्या** चाकरांस ध्यावयास सांगून ते सर्वजण परत शहरांत आले. तेव्हां **हातीम** पहिल्या प्रथम तो तरुण पुरुष ज्या धर्मशाळेंत होता तेथें गेला, आणि त्यास सर्व वर्तमान कळवून त्यानें तें सर्व द्रव्य त्यास बक्षीस दिलें. नंतर **हातीम** तेथून निघून **हारीथसावकारकन्येच्या** महालीं आला, आणि त्या गुहेसंबंधीं साकल्यवर्तमान निवेदन करून दुसरा **प्रश्न** विचारूं लागला. तेव्हां ती ह्मणालीः—प्रत्येक गुरुवारीं रात्रीं अरण्यामध्यें एक मनुष्य असें ह्मणतो कीं, “ **जें मला आज उपयोगीं पडेल असें मी कांहीं केलें नाहीं.** ” तरी तो मनुष्य कोण आहे व तो असे शब्द कां बोलतो याचा तपास करा.

**सावकारकन्येचें** हें भाषण ऐकतांच **हातीम** तिला विचारून तेथून निघाला, तो धर्मशाळेंत आला, आणि एक दोन दिवस तेथें राहून आपल्या मित्राची आज्ञा घेऊन मार्ग क्रमण करूं लागला. जातां जातां एके दिवशीं रात्रीं तो एका वृक्षाखालीं बसून ईश्वरस्तवन करीत आहे इतक्यांत “ **जें मला आज उपयोगीं पडेल असें कांहीं मी केलें नाहीं** ” असे शब्द त्याच्या कानीं आले. तेव्हां ज्या दिशेकडून हे शब्द आले त्या दिशेचा रोंख धरून **हातीम** उजाडेपर्यंत एक सारखा चालला. शेवटीं थकून तो एका वृक्षाखालीं विश्रांति घेत बसला इतक्यांत त्याचे दृष्टीस एक गांव पडला. नंतर तो उठून त्या गांवांत गेला आणि पुढील गुरुवार येईपर्यंत तेथेंच रहाण्याचा त्यानें निश्चय केला. मग जेव्हां गुरुवार आला तेव्हां त्यानें ते पूर्वींचे शब्द ऐकिले. त्या बरोबर तो त्या शब्दाच्या रोंखावर मार्ग क्रमण करूं लागला. जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एका खेडे गावांत येऊन पोंचला. परंतु पहातो तों त्या खेड्यांतले सर्व लोक एके ठिकाणीं बसून शोक करीत आहेत. हें पाहून

**हातिमास** त्यांची अतिशय दया येऊन तो एका मनुष्या जवळ गेला आणि शोकाचें कारण विचारूं लागला. तेव्हां तो मनुष्य ह्मणाला. दर बुधवारीं आमच्या या गांवांत एक **ब्रह्मराक्षस** येत असतो आणि तो आमच्यातील एकेक मनुष्य पाळीपाळीनें खातो. आह्मी जर त्याला तसें करण्यास प्रतिबंध करूं लागलों तर तो, मी तुह्मां सर्वांचा नाश करीन असें ह्मणतो. ती **नरबळीची** पाळी येते गुरुवारीं आमच्या **पाटला**च्या मुलावर आली आहे. परंतु **पाटलास** तो एकुलता एक मुलगा असल्यामुळें व त्याचे गुण अति उत्तम असल्यामुळें त्या करितां आह्मी सर्वजण रडत आहों. हें त्याचें भाषण ऐकून **हातिमानें** त्या मनुष्याला **पाटलास** व त्याचे मुलास बोलावून आणण्यास सांगितलें. त्याप्रमाणें **पाटील** व त्याचा **मुलगा** हे आल्यावर **हातीम** त्यांस ह्मणालाः—तुह्मीं बिलकुल घाबरूं नका. तुमच्या बद्दल येते गुरुवारीं मींच त्या **राक्षसा**च्या भक्ष्यस्थानीं पडतों. **हातिमाचें** हें भाषण ऐकून **पाटील** ह्मणालाः—हे उदार पुरुषा, ईश्वर तुझें कल्याण करो. त्यावर **हातीम** ह्मणालाः—तें ठीक आहे; परंतु त्या **राक्षसाचा** आकार कसा आहे, हें जर तुह्मांस माहीत असेल तर मला सांगा. हें त्याचें भाषण ऐकून **पाटलानें** त्या **राक्षसाची** आकृति जमिनीवर काढून दाखविली. त्यारून **हातिमानें** तर्क केला कीं, ज्या **राक्षसावर** शस्त्रही चालावयाचें नाहीं असा हा '**हुलुका**' नामक **राक्षस** असावा. नंतर **हातीम** त्यास ह्मणालाः—मी सांगतों ह्याप्रमाणें जर तुह्मी कराल तर तुह्मां सर्वांवरचें अरिष्ट मी टाळतों. **पाटलानें** ती गोष्ट कबूल केल्यावर **हातिमानें** विचारलें, तुमच्या या गांवात कांचेचें काम करणारे कोणी आहेत काय? **पाटील** ह्मणालाः—होय, दोन तीन दुकानदार आहेत. हें त्याचें भाषण ऐकून **हातीम** व **पाटील** असे दोघे त्या कांचवाल्याच्या दुकानीं गेले. नंतर **हातीम** त्या दुकानदारांपैकीं एकास ह्मणालाः—दोनशें फूट लांब व शंभर फूट रुंद असा एखादा आरसा चार दिवसांत तुह्मी तयार करून द्याल काय? दुकानदार बोलला, होय. जर तुह्मी त्या आरशास लागणारा खर्च द्याल तर तीन दिवसांत तुम-

च्या सांगीप्रमाणें आरसा तयार करून देतों. दुकानदाराचें हें भाषण ऐकतांच **पाटील** ह्मणाला, तुह्मी आरसा तयार करण्यास लागा. त्याला खर्च लागेल तो मी देतों. असें सांगून ते उभयतांहीं घरीं आले. नंतर **पाटलानें** आरशास लागणारा खर्च ताबडतोब आपल्या चाकरा बरोबर पाठवून दिला. इकडे त्या कांचेचें काम करणाऱ्या दुकानदारानेंही **हातिमा**च्या सांगीप्रमाणें तीन दिवसांत आरसा तयार करून तो **पाटला**कडे रवाना केला.

आपणास जसा आरसा पाहिजे होता तसा तो तयार झालेला पाहून **हातिमास** अतिशय आनंद झाला. नंतर त्यानें गांवातले कांहीं लोक बोलावून त्यांजकडून तो आरसा **राक्षस** येण्याच्या वाटेवर उभा करविला; आणि त्याजवर एक मोठी चादर त्यांजकडून घालविली इतकें कृत्य झाल्यावर **हातीम** ह्मणालाः—आतां तुह्मी न घाबरतां स्वस्थ असा. परंतु मी कोणत्या रीतीनें त्या भव्य **राक्षसा**चा वध करणार आहें हें जर कोणाला पहावयाचीं इच्छा असेल तर त्यानें मात्र माझ्या बरोबर यावें आणि बाकीच्यानीं आपल्या घरोघर निर्धास्त असावें. **हातिमा**चें हें भाषण ऐकून पाटलाचा मुलगा ह्मणालाः—**महाराज,** मी आपणा बरोबर येतों. तेव्हां **पाटील** आपल्या मुलाला ह्मणालाः—तुझा जीव वांचावा याकारितांच हा इतका खटाटोप चालला असून हा परोपकारी मनुष्यही तुझ्याच करितां आपला जीव धोक्यांत घालित आहे. असें असतां तूं हा वेडेपणाचा हट्ट कां करितोस ? **पाटला**चें हें भाषण ऐकून **हातिम** ह्मणालाः—**पाटील**बावा तुह्मी बिलकूल भिऊं नका. तुमच्या मुलाच्या नुसत्या केंसासही धक्का लागावयाचा नाहीं, आणि जर कांहीं जडजोखमाचा प्रसंग तुमच्या मुलावर गुदरला तर तुह्मी मला पाहिजे ती शिक्षा करा. **हातिमा**चें हें भाषण संपतांच तो **पाटला**चा मुलगा मोठ्या आवेशानें ह्मणालाः—पूर्वीं तुह्मीं सर्वांनीं आज मला **राक्षसास** बळी देण्याचा निश्चय केला होता. परंतु ह्या परोपकारी मनुष्यानें माझ्याबद्दल आपण स्वतःच बळी जाण्याचा निश्चय केला; इतकेंच नाहीं तर आजपासून तुह्मांला त्या **राक्षसा**पासून कोणत्याही प्रकारचा

उपद्रव न व्हावा एतदर्थ त्यानें उपाय चालविले आहेत. असें असतां ह्या मनुष्यास एकटें जाऊं देणें हें तुह्मांस शोभत नाहीं. आतां तुह्मां सर्वांस जर ह्या मनुष्याबरोबर जाण्यास भीति वाटत असेल तर तुह्मी येऊं नका. परंतु मी ह्या माझ्या प्राणरक्षका बरोबर जाणारच.

**पाटला**च्या मुलाचें हें आवेशाचें भाषण ऐकून ती सर्व मंडळी **हातिमा** बरोबर निघण्यास कबूल झाली. नंतर जेव्हां रात्र झाली तेव्हां ती सर्व मंडळी **राक्षस** येण्याच्या वाटेवर कांहीं अंतरावर जाऊन उभी राहिली. पुढें कांहीं वेळानें **राक्षसा**ची येण्याची वेळ होतांच मोठमोठ्या भयंकर किंकाळया ऐकूं येऊं लागल्या. त्या ऐकतांच ती सर्व मंडळी अगदीं घाबरून गेली. तेव्हां **हातीम** त्यांस ह्मणाला;—तुह्मी अगदीं भिऊं नका. मी आहें तोंपर्यंत तुमच्या केंसासही धक्का लागावयाचा नाहीं. इतकें त्याचें बोलणें होत आहे तोंच तो **राक्षस** अगदीं जवळ येऊन ठेपला. त्याचें शरीर पर्वतासारखें मोठें असून त्याला हात पाय मुळींच नव्हते. शरीराच्या मध्यभागीं एक अतिशय मोठें असें पोट असून त्याचें डोकें अगदींच लहान होतें, तोंड विक्राळ असून त्यांतून विस्तवासारख्या ज्वाळा निघत होत्या. असा तो भयानक **राक्षस** जेव्हां अगदीं जवळ आला तेव्हां त्याचें तें स्वरूप पाहून सर्व लोक अगदीं घाबरून पळावयास लागले. परंतु **हातिमानें** त्या सर्वांस धीर दिल्यामुळें ते भीत भीत उभे राहिले. नंतर जेव्हां तो **राक्षस** अगदीं जवळ आला त्याबरोबर **हातिमानें** त्या पूर्वीं ठेवलेल्या आरशावरची चादर काढली. तेव्हां त्या **राक्षसानें** आपली प्रतिमा आरशांत पाहिली. ती पहातांच आपल्या सारखाच दुसरा कोणी राक्षस येथें आला असावा असें त्यास वाटून भीतीनें त्याचा श्वासोश्वास अगदीं बंद झाला. श्वासोश्वास बंद होतांच इसाब नीतींतील बेडकीप्रमाणें त्याचें तें अजस्त्र पोट फुटून मेघ गर्जनाप्रमाणें मोठा आवाज होऊन फुटलें. त्यावेळीं जो भयंकर आवाज झाला त्या योगानें सर्व मंडळीची कानठळी बसून ते अगदीं गर्भगलित झाले. तेव्हां **हातीम** त्यास ह्मणालाः—आतां भिण्याचें

कांहींच कारण उरलें नाहीं. कारण, ज्या **राक्षसाची** तुह्मांस भीती वाटत होती तो तर गतप्राण होऊन पडला आहे. हें **हातिमाचें** भाषण ऐकतांच त्या सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटून ते ह्मणालेः—एवढा मोठा शक्तिमान व भव्य **राक्षस** विशेष प्रयत्न न करितां आपोआप कसा मरण पावला ? हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—आज त्या **राक्षसाचें** आयुष्य संपलें ह्मणूनच तो मरण पावला. कारण त्याचें मरण शस्त्रापासून नव्हतें. परंतु त्यानें आपलें प्रतिबिंब आरशांत पाहिलें ह्मणून भीतीनें श्वासावरोध होऊन तो मरण पावला, दुसरें कांहीं नाहीं.

इतकें बोलणें झाल्यावर ती सर्व मंडळी आपापल्या घरीं गेली. नंतर दुसरे दिवशीं सकाळीं त्या गावांतील सर्व लोक आपापल्या शक्ती प्रमाणें कोणी सोनें, कोणी रुपें, कोणी जवाहीर, असें आणून **हातिमास** देवूं लागले; परंतु त्यानें तें घेण्याचें नाकारलें. नंतर तो त्या सर्व लोकांस ह्मणालाः—मी उपकार केला असें तुह्मी समजतां; परंतु तो उपकार नसून फक्त परमेश्वराची सेवा आहे. हें त्याचें भाषण ऐकून ते सर्व लोक ह्मणालेः—हे परोपकारी मनुष्या तुझें या गांवीं कोणत्या कामाकरितां येणें झालें तें आह्मांस सांगावें. तेव्हां **हातीम** ह्मणालाः—प्रत्येक गुरुवारीं रात्रीं अरण्यामध्यें **“ जें मला आज उपयोगीं पडेल असें कांहीं मी केलें नाहीं ”** असा शब्द होतो. त्याचा शोध करण्याकरितां मी फिरत आहें. तेव्हां पाटील ह्मणालाः—आह्मीही असे शब्द नेहमीं ऐकतों. परंतु तो शब्द कोठून होतो हें आह्मांस माहीत नाहीं. इतकें बोलणें झाल्यावर ती सर्व मंडळी आपापल्या घरोघर गेली आणि **हातीम पाटलाबरोबर** त्याच्या घरीं गेला. नंतर तो दिवस गुरुवारचा होता ह्मणून संध्याकाळ होतांच **हातीम** तो शब्द होण्याची वाट पहात बसला. पुढें मध्यरात्रीचा समय होतांच **हातिमानें** आपले इच्छित शब्द ऐकिले तेव्हां तो **पाटलाची** आज्ञा घेऊन त्या शब्दाच्या रोखावर मार्ग क्रमूं लागला. अशा रीतीनें जातां जातां सुमार दोन महिन्यांनीं त्यास एक साधारण उंचीची टेंकडी लागली. तेव्हां तो त्याजवर चढून

आस पास पाहूं लागला तों थोड्या अंतरावर बरीच मंडळी उभी आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें तेव्हां हे इतके लोक एके ठिकाणीं कां जमले असावे याचा शोध करावा असें त्यास वाटून तो तेथून त्या मंडळीकडे गेला, आणि पहातो तों ती मंडळी नसून संगमरवरी दगडाचे पुतळे आहेत असें त्यास वाटलें. तेव्हां हीं कोणा तरी कुलीन मनुष्यांचीं थडगीं असावीं असा त्यानें तर्क केला.

तो दिवस गुरुवारचा होता ह्मणून हातीम तेथेंच विश्रांती घेत बसून रात्रीं होणाऱ्या शब्दाची मार्गप्रतिक्षा करूं लागला. नंतर जेव्हां मध्यरात्रीचा समय झाला तेव्हां एक मोठा आवाज होऊन ते पुतळे मनुष्यरूपी झाले आणि सुंदर पोषाक करून आपापल्या सिंहासनावर आरुढ झाले. परंतु त्या सर्व मंडळींतील एक मनुष्य आपल्या आंगास माती व राख फांसून विलाप करीत जमीनीवर बसला आहे असें त्यानें पाहिलें. नंतर कांहीं वेळानें त्या सिंहासनारूढ झालेल्या सर्व मनुष्यांनीं अमृत प्राशन केलें पण त्या दुःखी मनुष्यास त्यांनीं एक थेंबही दिला नाहीं. तेव्हां तो फार दुःखी होऊन ह्मणालाः—" **जें मला आज उपयोगी पडेल असें मी कांहीं केलें नाहीं.** " हे त्याचे शब्द ऐकतांच आपला कार्यभाग झाला असें समजून हातिमास अतिशय आनंद झाला. पुढें कांहीं वेळ गेल्यावर उत्तमप्रकारच्या पक्वान्नांनीं भरलेलीं अशीं ताटें तेथें अकस्मात् उत्पन्न झालीं. तेव्हां ती सर्व मंडळी आपापल्या पात्रावर बसली. परंतु एक ताट शिल्लक उरलेलें पाहून त्यांतील एक मनुष्य ह्मणालाः—हें जें एक ताट उरलें आहे त्यावर तो पलिकडच्या बाजूस जो मुशाफर उभा आहे त्यास आणून बसवा. हें त्याचें भाषण ऐकतांच एक मनुष्य उठून हातिमाजवळ गेला आणि त्यास हातीं धरून त्यानें त्या ताटावर आणून बसविलें. नंतर सर्व मंडळी भोजन करूं लागली. परंतु जो दुःखी मनुष्य तेथें रडत बसला होता त्याजकडे हातिमाचें एक सारखें लक्ष लागलें होतें. इकडे बाकीची सर्व मंडळी मिटक्या देत देत भोजन करीत होती. पण तो दुःखी मनुष्य त्याजपुढें वाढलेलें अन्न मोठ्या

कष्टानें व दुःखानें खात होता. कारण, त्याच्या पुढें जें ताट मांडलें होतें त्यांत सारे नासके, कडू व निःसत्वी असे पदार्थ होते; ते पाहून **हातिमास** अतिशय वाईट वाटलें. पुढें सर्व मंडळीचीं जेवणें झाल्यावर **हातीम** त्या मंडळींतील एका मनुष्यास ह्मणालाः— तुह्मीं सर्व असामी चैनींत व विलासांत निमग्न असून तो पलीकडे बसलेला मनुष्य एकसारखा रडतो आहे याचें कारण काय ? तें मेहेरबानी करून मला सांगा. **हातिमाचें** हें भाषण ऐकून तो मनुष्य ह्मणालाः—त्याला जें दुःख होत आहे त्याचें कारण तूंच जाऊन त्यास विचार. हें ऐकतांच **हातीम** उठून त्या मनुष्याजवळ गेला आणि त्यास ह्मणालाः—हे दुःखी मनुष्या, तूं जे शब्द बोलतोस त्याचें आणि तुझ्या दुःखाचें कारण मला मेहेरबानी करून सांग. **हातिमाचें** हें भाषण ऐकून तो दुःखी मनुष्य ह्मणालाः—**मित्रा,** ही जी येथें मंडळी जमली आहे त्या सर्वांचा मी मालक असून माझें नांव ‘ **यूसफ** ’ असें आहे. मी व्यापाराकरितां एके वेळीं **कारझिम** शहरास जात होतों. परंतु मी मूळचाच अति कृपण असें. कोणालाही एक पैसा अथवा मूठभर अन्न किंवा एखादी फाटकी चिंधी अशी मी दिली नाहीं, आणि हे माझे चाकर गरिबांस अन्न, वस्त्र व पैसारुका देऊन संतुष्ट करीत असत. **मित्रा,** माझा स्वभाव कृपणपणाचा असल्यामुळें माझे चाकर जो दानधर्म करीत, तो माझ्यानें पहावत नसे इतकेंच नव्हे तर त्यांनीं तसें करूं नये ह्मणून मी त्यांस धमकावीतही असें. परंतु ते धर्मनिष्ठ चाकर मला ह्मणत कीं, ‘दानधर्म केल्यानें मनुष्यप्राण्यास मुक्ति मिळते’ असें शास्त्र असल्यामुळें आह्मी तो केल्या शिवाय कधींही राहाणार नाहीं. हें त्यांचें भाषण ऐकून मला अतिशय संताप येई व मी रागाच्या आवेशांत त्यांस कधीं कधीं मारीतही असें. तथापि ते माझें न ऐकतां उलट दानधर्म करण्याविषयीं मलाच ते उपदेश करीत असत. परंतु मी त्यांचें मुळींच ऐकलें नाहीं. पुढें आह्मी **कारझिम** शहरास जात असतां वाटेंत आह्मांस चोरांनीं गांठून आमची सर्व संपत्ति हरण केली, आणि सर्वांस ठार मारून त्यांनीं येथें पुरून

टाकले. वास्तविक त्यांचा पूर्वींचा बेत आम्हांस मारून आमचे तुकडे तुकडे करावयाचा होता परंतु त्या चोरांतील एक मनुष्य म्हणाला कीं, आपण जर यांच्या शरीराचे तुकडे केले तर परमेश्वर आपल्या पातकाची कधींही क्षमा करणार नाहीं. हें त्याचें भाषण ऐकून ते चोर आम्हांस ह्या ठिकाणीं पुरून चालते झाले. प्रस्तुतः आम्ही जरी जिवंतपणाच्या सर्व क्रिया करात आहों तरी आम्ही मेलेलेच आहों. मित्रा, मी जर पूर्वीं कृपणपणा केला नसता आणि चाकरांच्या सांगण्याप्रमाणें वागलों असतों तर आज जें हें मी दुःख भोगीत आहें, तें भोगण्याचा प्रसंग आला नसता. माझे चाकर पहा बरें, कसे निरनिराळे उंची पोषाख आंगावर घालून सिंहासनावर बसून मिष्टान्न सेवन करीत आहेत आणि मी पहा कसा आंगाला माती व राख लावून जमिनीवर पडलों आहें. कोण ही माझी स्थिति!!!

हें त्या दुःखी मनुष्याचें भाषण ऐकून हातीम म्हणालाः—हे दुःखी मनुष्या, तुला जें हें दुःख भोगावें लागत आहे त्यांतून मुक्त होण्याचा एखादा उपाय असल्यास तो मला सांग, म्हणजे तो करून तुला ह्या दुःखसागरांतून मी मुक्त करीन. हातिमाचें हें भाषण ऐकतांच तो दुःखी मनुष्य थोडासा आनंदित होऊन म्हणालाः—हे परोपकारी पुरुषा माझें दुःख पाहून तुझ्या अंतर्यामीं कळवळा आला तरी माझ्या मुक्ततेचा उपाय हाच आहे कीं, माझें घर चीनदेशामध्यें आहे. त्या घराच्या ज्या खोलींत मी निजत असें त्या खोलींत अतोनात द्रव्य पुरून ठेविलें आहे. ही गोष्ट दुसरे कोणासही माहीत नाहीं. त्या घरांत हल्लीं माझे नातू रहात आहेत; परंतु ते दरिद्रानें अगदीं गांजलेले असून उदरनिर्वाहाकरितां त्यांस भीक मागावी लागत आहे. आतां तुम्ही त्या ठिकाणीं जाऊन माझ्या घराचा शोध करून तें मी पुरून ठेविलेलें द्रव्य बाहेर काढावें आणि त्याचे सारखे चार वांटे करून एक वांटा माझ्या नातवांस द्यावा, व बाकीचे तिन वांटे गरीबांस द्रव्य, भुकेलेल्यास अन्न व तृषितांस पाणी देण्यांत खर्च करावे. म्हणजे माझ्या कृपणपणाच्या पातकाचा क्षय होऊन मला

सुखद स्थिति प्राप्त होईल. हें त्यांचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—तुझ्या सांगण्याप्रमाणें मी **चीन** देशास जाऊन दानधर्म करीन; ह्याविषयीं तूं बिलकुल काळजी करूं नकोस. इतकें त्या उभयतांचें बोलणें होत आहे तोंच उजाडल्यामुळें ती सर्व मंडळी जागच्याजागीं पुतळे होऊन पडली. नंतर **हातीम**—**चीन**देशास जाण्याच्या उद्देशानें मार्ग क्रमण करूं लागला.

जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एका विहिरीजवळ येऊन पोंहचला. त्यावेळीं विहिरीवर एक मनुष्य पाणी काढीत होता, त्याजवळ जाऊन **हातीम** पिण्याकरितां पाणी मागूं लागला. इतक्यांत त्या विहिरींतून एक **सर्प** बाहेर आला आणि त्या पाणी काढणाऱ्या मनुष्याच्या कंबरेला विळखा मारून त्यास आंत घेऊन गेला. हें त्या **सर्पा**चें कृत्य पाहून **हातिमास** अतिशय वाईट वाटून तो आपल्या मनांत ह्मणालाः—त्या दुष्ट **सर्पानें** नेलेल्या मनुष्याचा शोध करून जर आपण त्यास सोडवलें नाहीं तर आपल्या ब्रिदास बट्टा लागून परमेश्वराचाही आपणांवर कोप होईल. यास्तव त्या मनुष्याचा शोध अवश्य केला पाहिजे. असा विचार करून **हातिमानें** त्या विहिरींत उडी टाकली. नंतर तो जेव्हां अगदीं तळाशीं गेला. तेव्हां त्यानें डोळे उघडून पाहिलें तों, विहिर वगैरे कांहींएक नसून एका सुंदरबागेमध्यें आपण उभे आहों असें त्यास वाटलें. नंतर तो त्या बागेची शोभा पाहत पाहत जात असतां त्याच्या दृष्टीस एक रत्नखचित महाल पडला. तेव्हां त्या मनुष्याचा शोध करण्याकरितां तो त्या महालांत शिरला. आंत गेल्यावर प्रथमच त्यास जो दिवाणखाना लागला त्या दिवाणखाण्याच्या मध्यभागीं एका रत्नजडित पलंगावर मानवरूपधारी **ब्रम्हराक्षस** निजलेला **हातिमानें** पाहिला. तेव्हां त्या **ब्रम्हराक्षसास** जागें करून **सर्पा**चा व त्यानें आणलेल्या मनुष्याचा तपास करावा असें वाटून तो त्याजवळ गेला. इतक्यांत दिवाणखान्याच्या एका कोंपऱ्यास बसलेला तो **सर्प**, **हातिमा**च्या नजरेस पडला. उभयतांचीही नजरा नजर होतांच तो **सर्प** मोठ्या आवेशानें **हातिमा**च्या आंगावर धांवत आला. हें त्यानें पाहून रागानें

त्या **सर्पाचें** तोंड गच्च आंवळून धरलें तेव्हां **सर्पानेंहीं हातिमाच्या** हातून सुटण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला. परंतु जेव्हां निरुपाय झाला तेव्हां त्यानें मोठ्यानें आरोळी ठोकली. ती ऐकतांच तो **ब्रम्हराक्षस** जागा होऊन **हातिमास** ह्मणालाः—अरे मनुष्या त्या माझ्या चाकराला तूं सोडून दे. त्यावर **हातीम** ह्मणालाः—मघांशीं ज्या माझ्या मित्रास ह्यानें येथें आणिलें आहे त्याची मुक्तता झाल्याशिवाय मी यास कधींही सोडणार नाहीं. **हातिमाचें** हें धिटाईचें भाषण ऐकून **ब्रह्मराक्षस** त्या **सर्पास** ह्मणालाः—ज्यानें तुला धरलें आहे तो मोठा बलाढ्य मनुष्य आहे यास्तव संभाळून रहा; नाहींतर तुझ्या तोंडांत जो मार्ग आहे त्यांतून तो आंत शिरेल. **ब्रह्मराक्षसाचें** हें भाषण ऐकून **हातीम** त्या **सर्पाचें** तोंड वासून आंत शिरला व **सर्पानेंही** त्याला ताबडतोब गिळून टाकला. नंतर **हातीम** जेव्हां त्या **सर्पाच्या** पोटांत गेला तेव्हां त्यास आपण एका आंधाऱ्या कोठडींत आहों असें वाटलें. इतक्यांत "अरे **हातिमा**, या आंधार कोठडींत जें तुझ्या हातीं लागेल तें जर तूं आपल्या कट्यारिनें कापून टाकणार नाहींस तर तुझी तेथून सुटका न होतां आजन्मपर्यंत तुला येथेंच रहावें लागेल," असे शब्द **हातिमाच्या** कानीं आले. त्यावरून तो आसपास चाचपूं लागला तों काळजासारखा एक पदार्थ त्याच्या हाताला लागला; तेव्हां एका क्षणाचाही विलंब न करितां **हातिमानें** आपल्या कट्यारीनें त्याचे दोन तुकडे केले. इतक्यांत प्रळयकाळासारखा मोठा गडगडाट होऊन सर्व प्रदेश जलमय झाला. पुढें कांहीं वेळानें **हातीम** डोळे उघडून पहातो तों पूर्वीचा सर्व भास नष्ट होऊन आपण एका सपाट मैदानावर उभे आहों आणि आपल्या सभोंवतीं हजारों मनुष्यें दुःखानें व्याप्त होऊन पडलीं आहेत असें त्यानें पाहिलें. नंतर **हातीम** त्या सर्व मनुष्यांजवळ गेला आणि त्यांस तुह्मीं येथें कसे आलां ह्मणून विचारूं लागला. तेव्हां त्या सर्व मनुष्यांनीं आह्मांस एका **सर्पानें** येथें आणलें असें सांगितलें. तें ऐकून **हातिमानें** घडलेली सर्व हकिगत त्यांस निवेदन केली आणि ह्मणालाः—तुमच्या शत्रुचा आतां नाश झाला आहे यास्तव तुह्मीं आपापल्या

घरोवर जा. हें **हातिमाचें** भाषण ऐकून सर्वांस अतिशय आनंद होऊन ते त्याचे फारफार आभार मानून मार्गस्थ झाले. व **हातिमही चीनदेशास** जाण्याच्या उद्देशानें मार्ग क्रमूं लागला. जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एका शहरीं गेला. त्या वेळीं शहराच्या दरवाज्यावर जे रखवालदार होते त्यांनीं **हातिमास** विचारिलें कीं, तूं कोठें जातोस? व कोठून आलास? आह्मी तुला आपल्या राजाकडे नेल्याशिवाय जाऊं देणार नाहीं. **हातीम** ह्मणालाः—प्रवासी लोकांना छळावें असा तुमच्या देशाचा कायदा आहे कीं काय? पहारेकरी ह्मणाले; आह्मी तुला जें धरलें आहे त्याचें कारण हेंच कीं, या शहरीं जे प्रवासी येतात त्यांना आमची **राजकन्या** तीन **प्रश्न** विचारिते आणि त्यांचीं योग्य उत्तरें जो कोणी देईल त्यासच ती पुढें जाऊं देते; नाहीं पेक्षां ठार मारविते. असा तिचा पण असल्या मुळें आह्मीं तुला आपल्या राजाकडे नेणार. पहारेकऱ्यांचें हें भाषण ऐकून **हातीम, राजाकडे** जावयास निघाला. पुढें कांहीं वेळानें ते राजदरबारीं जाऊन पोहोंचल्यावर **राजा** ह्मणालाः—हे प्रवाशी मनुष्या, तूं कोठून आलास व तुझें नांव काय? **हातीम** ह्मणालाः—मी **इमन** देशाहून आलों आहें. आतां तुह्मी माझें नांव विचारितां तर तें मी सांगणार नाहीं. कारण, परदेशी प्रवाशांस विनाकारण छळावें हा राजधर्म नाहीं. आतां आपल्या राज्यांत जे प्रवासी येतील त्यांजबरोबर प्रीतीनें वागून जर परमेश्वराच्या सेवेंत निमग्न राहिलां तर सर्व लोकांचें कल्याण होऊन आपली कीर्तीही दिगांतरीं वृद्धिंगत होईल. **हातिमाचें** हें भाषण ऐकून **राजा** ह्मणालाः—तूं सांगतोस ही सर्व गोष्ट खरी, परंतु काय करूं माझा नाइलाज आहे. कारण ह्या माझ्या शहरास जें पूर्वीं '**आदालताबाद**' ह्मणजे न्यायी शहर असें नांव होतें तें माझ्या कन्येच्या विलक्षण स्वभावावरून रद्द होऊन आतां त्यास '**बेदादाबाद**' असें नांव पडलें आहे. असें ह्मणून त्यानें **हातिमास** सर्व हकीगत निवेदन केली, ती ऐकून **हातीम** ह्मणालाः—अशी जी दुष्ट **कन्या** तिला तुह्मी मारून कां टाकीत नाहीं. **राजा** ह्मणालाः—पोटच्या गोळ्याला कोणाच्यानें तरी मारून

टाकवेल काय ? आणि तशांतून ती माझी एकुलती एक **कन्या** असल्यामुळें माझ्यानें तिला मारवल नाहीं. **राजाचें** हें भाषण ऐकून **हातिमास** थोडेसें वाईट वाटलें. नंतर कांहीं वेळानें **राजा, हातिमास** बरोबर घेऊन आपल्या **कन्येच्या** महालीं गेला आणि **हातिमाविषयींचें** सर्व वर्तमान तिला सांगून तो निघून गेला, पुढें कांहीं वेळानें **राजकन्या** त्याठिकाणीं आली, आणि **हातिमास** पाहून आपल्या दाईस ह्मणाली:—ह्या सुंदर व तरुण मनुष्यास पाहिल्याबरोबर माझें मन कामानलानें अगदीं व्यथित झालें आहे; व तो कोणी तरी खानदानीचा मनुष्य असावा असें वाटतें. परंतु काय करूं ? जर त्यानें माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं नाहींत तर तो व्यर्थ मारला जाणार ह्मणून वाईट वाटतें. हें त्या दोघींचें भाषण झाल्यावर **हातीम** ह्मणाला:—तुमच्या शहरांत जे प्रवासी येतात त्यांना ही **राजकन्या** कोणकोणते प्रश्न विचारते ? व त्यांनीं जर त्या प्रश्नांचीं उत्तरें न दिलीं तर त्यांजला तुह्मी कां ठार मारतां ? आणि तुमच्या शहरास '**बेदादाबाद**' असें नांव कां पडलें आहे याचें कारण मला सांगा. **हातिमाचें** हें भाषण ऐकून दाई ह्मणाली:—ह्या **राजकन्येस** दररोज रात्रीं पिशाच्चबाधा होते व त्यामुळें ती भलभलतें बरळूं लागते. नंतर ह्या शहरांत जो प्रवासी आला असेल त्यास ती तीन प्रश्न विचारते. त्या तिच्या प्रश्नांचीं उत्तरें जर त्या प्रवाशानें न दिलीं तर ती त्यास मारवून टाकते. **राजकन्येला** पिशाच्चबाधा झाली ह्मणजे चाकर माणसेंसुद्धां आपणावर एखादें संकट येईल असें समजून तिच्याजवळ राहत नाहींत. दासीचें हें भाषण ऐकून **हातीम** आपल्या मनांत ह्मणाला:—आपलें आयुष्य जर बळकट आहे तर कोणाच्यानेंही कांहीं व्हावयाचें नाहीं. असें जर आहे तर आज ह्या गोष्टींचा आपण अनुभव पाहूं. असा तो विचार करीत आहे इतक्यांत सुवासिक पक्वान्नांनीं भरलेलें ताट दासीनें आणून **हातिमापुढें** ठेविलें. तें पाहून तो बोलला, तुमच्या प्रश्नांचीं उत्तरें दिल्याशिवाय मी कधींहीं अन्न भक्षण करणार नाहीं. कारण, जो मनुष्य आपलें काम एकीकडे ठेऊन उत्तम अन्नें भक्षण करण्यांत गुंततो त्याचे हातून को-

णतेंही काम शेवटास जात नाहीं; असें सूज्ञ लोकांचें मत असून तें खरेंही आहे. हातिमाचें हें भाषण ऐकून दायी ह्मणाली:—परमेश्वरकृपेनें राजकन्येच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास आपणास सुचो, ह्मणजे आह्मी कृतकृत्य होऊं.

मग जेव्हां रात्र पडूं लागली तेव्हां सर्व चाकरमाणसें हातिमास व राजकन्येस महालांत ठेवून निघून गेलीं. पुढें रात्रीची पाहिली गस्त गेल्यावर राजकन्या वेड्या सारखी झाली, आणि मनास वाटेल तसें बरळूं लागली. नंतर ती हातिमास ह्मणाली; हे पुरुषा तूं कोण आहेस? व तुझें येथें येण्याचें कारण काय? मी जे प्रश्न विचारीन त्यांचीं यथायोग्य उत्तरें दे; नाहीं तर व्यर्थ मारला जाशील. हें ऐकून हातीम ह्मणाला:—तुझे काय काय प्रश्न आहेत? ते मला सांग ह्मणजे मी त्यांचीं उत्तरें देतों. तें ऐकून राजकन्या ह्मणाली:—'समुद्राच्या पाण्यामध्यें असा कोणता गूण आहे कीं, त्या पासून प्राण्यांची उत्पत्ती होते.' हा प्रश्न ऐकून हातीम ह्मणाला:—ज्याप्रमाणें मनुष्याच्या रेतापासून प्राण्यांची उत्पत्ति होते तसाच गूण समुद्राच्या पाण्यामध्यें असल्यामुळें त्यापासून प्राण्यांची उत्पत्ति होते. नंतर तिनें दुसरा प्रश्न विचारिला तो असा कीं, 'सर्व फळांत उत्तम फळ कोणतें. हातीम ह्मणाला:—सर्व फळांत उत्तम असें पुत्रफळ आहे. कारण कीं, तें मनुष्यांस, पक्ष्यांस राक्षसांस व पशूंसही आवडतें. नंतर तिनें तिसरा प्रश्न विचारला तो असा कीं, "जें कोणीही प्राणी इच्छित नसतां त्यांस प्राप्त होतें असें काय आहे. " हातीम ह्मणाला, मृत्यु. कारण त्याचा सर्व प्राणी जरी तिरस्कार करितात तरी त्यानें कोणालाही सोडलें नाहीं.

ह्याप्रमाणें राजकन्येच्या तिन्ही प्रश्नांची यथायोग्य उत्तरं मिळाल्यावर ती कांहीं वेळपर्यंत अगदीं स्तब्ध राहिली. नंतर थोडा वेळ गेल्यावर जास्त धुमायला लागून ज्या पलंगावर ती बसली होती त्या पलंगावरून धाडकन खालीं पडली. इतक्यांत एक भयंकर तांबड्या वर्णाचा सर्प तिच्या नाकांतून बाहेर निघून हातिमाच्या आंगावर धांवला. तेव्हां हातिमानें त्या सर्पास मारण्याकरितां

आपली कट्यार बाहेर काढली. परंतु त्याच्या मनांत त्या **सर्पास** मारून टाकणें अप्रशस्त आहे असें वाटून **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं त्यानें त्या **सर्पा**पुढें टाकलें. तें पहातांच तो **सर्प** अगदीं लीन झाला. नंतर **हातिमानें** तेथील एक भांडें घेऊन त्यांत त्या **सर्पास** घातलें आणि वाड्या बाहेर जाऊन एक मोठा खाडा खणून त्यांत त्या सर्पास त्यानें पुरून टाकलें; व पूर्वस्थळीं येऊन बसला.

पुढें कांहीं वेळ गेल्यावर **राजकन्या** चांगली सावध झाली आणि **हातिमास** पाहून लज्जित होऊन ह्मणालीः—हे परक्या पुरुषा तूं येथें कां आला आहेस? **राजकन्येचें** हें विस्मृतिचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—तुझ्या चाकरांनीं ज्या प्रवाशास काल रोजीं धरून येथें आणिलें तोच मी आहें. **हातिमाचें** हें बोलणें ऐकून **राजकन्येनें** आपल्या दाईस हांक मारली आणि ह्मणालीः—हा परका मनुष्य येथें आला कसा? व तो जिवंत राहिला कसा? दाई ह्मणालीः—हा एक प्रवासी मनुष्य असून काल रोजीं आपल्या शहरीं आला; तेव्हां मामुल वहीवाटी प्रमाणें **राजानें** तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याकरितां त्यास येथें पाठविलें. परंतु ह्या मनुष्यावर परमेश्वराची पूर्ण कृपा असल्यामुळें त्यानें त्याचें रक्षण केलें. नाहीं तर आजपर्यंत आलेले प्रवासी जसे मृत्युमुखीं पडले त्याचप्रमाणें ह्याची अवस्था व्हावयाची; ती न होतां तुझ्याही जिवाला रोजच्यापेक्षां थोडेसें समाधानत्व आलें आहे. हें पाहून त्या जगन्नियन्त्याची आपणावरही थोडीशी कृपादृष्टी झाली आहे असें मला वाटतें. असो, आतां ही आनंदकारक बातमी उजाडल्याबरोर ताबडतोब **राजेसाहेबांस** कळविली पाहिजे. असें ह्मणून त्या दाईनें **हातिमास** दुसऱ्या एका दिवाणखान्यांत तेथेंच एका पलंगावर निजावयास सांगितलें, आणि **राजकन्येस** बरोबर घेऊन निद्रासुखाचा अनुभव घेण्याकरितां दुसऱ्या एका दिवाणखान्यांत निघून गेली.

नित्य नियमाप्रमाणें दुसरे दिवशीं उजाडल्याबरोबर **राजा** कन्येच्या महालीं आला. तेव्हां **हातिमास** पाहून त्यास अतिशय आनंद झाला. नंतर तो ह्मणालाः—हे **शूरपुरुषा,** आजपर्यंत

जितके प्रवासी येथें आले त्यांपैकीं जिवंत असा एकही मी पाहिला नाहीं. असें असतां आपण जिवंत कसे राहिलां हें मला कृपा करून सांगावें. राजाचें हें भाषण ऐकतांच **हातिमानें** रात्रीं घडलेली सर्व हकीगत त्यास कळविली. ती ऐकून तर अतिशयच आनंद होऊन तो ह्मणालाः—हे शूरा, जो प्रवासी ह्या माझ्या कन्येच्या प्रश्नांचीं यथायोग्य उत्तरें देऊन दुसऱ्या दिवसापर्यंत जिवंत राहील त्याजबरोबर हिचें पाणिग्रहण करावयाचें असा माझा पूर्वींचा कृतसंकल्प आहे, आणि त्याप्रमाणें तुह्मीं हिच्या प्रश्नांचीं उत्तरेंहीं देऊन ज्या दुष्ट **सर्पा**च्या योगानें आजपर्यंत शेंकडो प्रवाशांची प्राणाहुती झाली त्याचाही नाश केलात. तरी आपण कृपाळू होऊन माझा जो हेतू आहे तो सिद्धीस न्यावा. **राजाचें** हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—तुह्मी ह्मणतां ही गोष्ट खरी; परंतु अद्याप मला पुष्कळ प्रवास करून ज्याच्या वचनपाशांस मी बद्ध झालों आहें त्याची कामगिरी बजवावयाची आहे, सबब तुह्मी ह्मणतां ही **गोष्ट** घडणें अशक्य आहे. आतां जर तुह्मी मला इच्छेस वाटेल तेव्हां जाण्यास हरकत करणार नाहीं तर मी तुमचें हें ह्मणणें मान्य करितों. **राजानें** ती गोष्ट तावडतोब मान्य केली; व तेथील चालीरीतीप्रमाणें त्याच दिवशीं **राजकन्येबरोबर हातिमाचें** लग्न लागलें. नंतर तीन महिने पर्यंत तेथें राहिल्यावर एके दिवशीं **हातिमानें राजास** बोलावून आणून सांगितलें कीं, पूर्वींच्या ठरावाप्रमाणें मी तर आतां आपल्या कार्यसिद्धीकरितां जाणार. परंतु प्रस्तुत आपली **कन्या** गरोदर असल्यामुळें जर तिला मुलगा झाला व तो चांगला शहाणा व शूर निपजला आणि त्यास माझ्या भेटीची इच्छा झाली तर आरबस्थानांत जो **इमन** ह्मणून देश आहे तेथें त्यास रवाना करावें. आणि जर **कन्या** झाली तर एखादा चांगला शूर मनुष्य पाहून त्याजबरोबर तिचें पाणिग्रहण करावें. आतां परमेश्वराची इच्छा जर तुमची व माझी पुनः भेट व्हावी अशी असली तर एक वेळ मी येथें येऊन तुमची भेट घेऊन जाईन.

**हातिमाचें** हें भाषण ऐकून राजानें नाइलाजास्तव त्यास जा-

ण्यास परवानगी दिली. नंतर एक दोन दिवस गेल्यावर तो सर्वांची आज्ञा घेऊन **चीनदेशास** जाण्याच्या उद्देशानें तेथून निघाला. पुढें जातां जातां कांहीं दिवसांनीं **चीनदेशास** पोंचल्यावर त्यानें **यूसफाच्या** घराचा तपास करून त्याच्या नातवांची भेट घेतली व त्यांस सर्व मजकूर विदीत केला. तो ऐकतांच त्या नातवांस व शेजाऱ्यांस अतिशय आश्चर्य वाटून ते ह्मणाले:—अरे वेड्या मनुष्या, **यूसफाला** मेल्याला सुमारें शंभर वर्षें झालीं असून त्यानें तुझी भेट घेऊन आह्मांस सांगण्यास निरोप सांगितला हें झालें तरी कसें ? **हातीम** ह्मणाला:—**यूसफ** मला भेटला नाहीं असें जर तुह्मी समजतां तर मग त्याचें घर **चीनदेशांत** सागाच्या वखारीनजीक असून येथें तुह्मी राहतां हें मला समजलें कसें ? इतकेंच नव्हे तर दुसरा जो निरोप त्यानें तुह्मांस सांगण्यास सांगितला आहे त्यावरून त्याची व माझी भेट झाली होती हें सिद्ध होईल. **हातिमाचें** हें भाषण ऐकून ते लोक ह्मणाले:–ठीक आहे, **यूसफानें** जो निरोप सांगितला आहे तो आह्मांस सांग. तेव्हां **हातीम** ह्मणाला:—**यूसफानें** आपल्या नातवांस असें सांगितलें आहे कीं, 'मी ज्या खोलींत निजत होतों त्या खोलीमध्यें अगणित द्रव्य व जवाहीर पुरलेलें आहे; तें काढून त्याचे सारखे चार विभाग करावे आणि एक भाग माझ्या नातवांनीं ठेवून बाकीचे तीन भाग दान धर्म करण्यांत खर्च करावे.' असें ह्मणून **हातिमानें** आपली सर्व हकीगत त्यांस सांगितली. ती ऐकतांच ते ह्मणाले:—तुह्मी ह्मणतां ही सर्व गोष्ट खरी असेल, परंतु हें वर्तमान आमच्या **राजास** कळविल्याशिवाय आह्मांस कांहींच करतां येणार नाहीं. असें बोलून ते **हातिमास** बरोबर घेऊन **राजाकडे** गेले आणि त्यांनीं तें सर्व वर्तमान **राजास** निवेदन केलें. तें ऐकून **राजासही** अतिशय आश्चर्य वाटून तो ह्मणाला:—**यूसफाला** मेल्याला आज सुमारें शंभर वर्षें झालीं असून तो भेटल्याची गोष्ट जेव्हां हा मनुष्य सांगतो तेव्हां हा खचीतच वेडा आहे यांत संशय नाहीं. कारण मेलेला मनुष्य पुनः जिवंत झालेला आमच्या पाहण्यांत किंवा ऐकण्यांत सुद्धां नाहीं, असें असतां हा वेडा पीर

असंभवनीय गोष्ट सांगतो, यास्तव यास शहरा बाहेर हांकून लावा. **राजाचें** हें भाषण ऐकतांच **हातीम** हात जोडून ह्मणाला:—हे **राजाधिराज**, ईश्वराची लीला अगाध असून ती मनुष्यमात्रास समजणें परम कठीण आहे. आतां मनुष्य प्राणी जेव्हां मरण पावतो तेव्हां त्याचें शरीरमात्र हालनचलनाविरहित होतें. परंतु त्याच्या शरीरांत जो प्राण असतो तो मात्र अमर राहतो. **यूसफ** ज्यावेळीं या अविनाशी जगांत नांदत होता त्यावेळीं तो फारच कृपणपणा करीत असे; ह्मणूनच सध्यां तो विपत्तीमध्यें पडला आहे. त्या विपत्तींतून त्याची मुक्तता व्हावी ह्मणून त्यानें हें काम मला सांगितलें आहे. आतां मी जर आपल्या समजुतीप्रमाणें वेडा असतों तर **यूसफ** हा **चीन**देशांत राहत होता व त्यानें आपल्या निजावयाच्या खोलीमध्यें अगणित द्रव्य पुरून ठेविलें आहे, हें मला समजलें नसतें. **हातिमाचें** हें भाषण ऐकून **राजा** ह्मणाला:—हे विचित्र प्राण्या, तूं कोण आहेस ? व **यूसफाची** व तुझी गांठ केव्हां व कोठें पडली हें मला सांग. **राजाचें** हें भाषण ऐकून **हातिमानें** सर्व हकीगत त्यास निवेदन केली. तेव्हां **राजानें**, **यूसफाचे** घरीं जाऊन त्यानें सांगितलेल्या ठिकाणीं आपल्या समक्ष खणून पहाण्याचा निश्चय केला व त्या प्रमाणें तो **हातिमास** व **यूसफाच्या** नातवांस बरोबर घेऊन त्यांच्या घरीं गेला. नंतर त्यानें यूसफाच्या निजावयाच्या खोलींत खणावयास सांगितलें. त्याप्रमाणें खणल्यावर **हातिमाच्या** सांगण्याप्रमाणें तेथें असंख्य द्रव्य सांपडलें. तें पाहून राजास परम आश्चर्य वाटून त्यानें त्या द्रव्याचे सारखे चार भाग केले; आणि त्या पैकीं एक भाग **यूसफाच्या** नातवांस देऊन बाकीचे तीन भाग दानधर्म करण्याकरितां **हातिमाच्या** स्वाधीन केले. नंतर **हातिमानें** आपल्या इच्छेप्रमाणें थोडक्याच दिवसांत तें सर्व द्रव्य गोरगरीबांस वाटलें, आणि तेथील **राजाची** आज्ञा घेऊन तो तेथून निघून परत **आदालताबादेमध्यें** येऊन पोहोंचला. तेव्हां त्याच्या पूर्वीच्या इष्टमित्रांस व **राजास** अतिशय आनंद झाला. पुढें कांहीं दिवसांनीं **हातिमाची** स्त्री **पुत्ररत्न** प्रसवली. तें पाहून त्यास अतिशय आनंद

होऊन त्यानें त्याचें 'सालीम' असें नांव ठेवलें. नंतर कांहीं दिवसांनी तो सर्वांची आज्ञा घेऊन तेथून निघाला; आणि मजल दरमजल करीत करीत देवदूतांच्या टेंकडीजवळ येऊन पोहोंचला; व गुरुवारची वाट पहात तेथेंच राहिला. नंतर एक दोन दिवसांनी गुरुवार येतांच त्यादिवशीं रात्रीं पूर्वींप्रमाणें ते सर्व संगमरवरी दगडाचे पुतळे उत्तम पोषाख केलेले देवदूत बनून आपआपल्या **सिंहासनावर** बसून मिष्टान्न भोजन करूं लागले. **यूसफ** हीं आपलें पूर्व स्वरूप टाकून सर्वांबरोबर मोठ्या आनंदानें वर्तत होता. हें पाहून **हातिमास** अतिशय आनंद होऊन तो त्याजवळ गेला; आणि ह्मणाला:—कां **महाराज,** हल्लीं आपली स्थिति कशी आहे? **हातिमाचें** हें भाषण ऐकून **यूसफ** ह्मणाला:—हे उदार पुरुषा, तुझ्या दीर्घप्रयत्नामुळें माझी स्थिति पालटून हल्लीं माझा उद्धार झाला आहे. आतां या सर्वांपेक्षां माझा पोषाख व मान थोडासा कमी आहे इतकेंच कायतें मला दुःख आहे. तथापि त्याजबद्दल मला फारसें वाईट वाटत नाहीं कारण, ह्यांनीं पूर्वीपासूनच पुण्यसंचय केला होता ह्मणून ह्यांस पूर्ण सुखाचा अनुभव घेण्यास मिळतो आहे, आणि मी हल्लींच प्रायश्चित्त घेऊन यांच्यांत मिसळलों आहें. तेव्हां यांच्याप्रमाणें सर्व सुखें मला एकदम कशीं मिळतील? तथापि **परमेश्वरानें** आपणास सुबुद्धि देऊन माझा आपणाकडून उद्धार करविला इतक्यानेंच मी सुखी होऊन आपलें सर्व प्रकारें कल्याण इच्छितों; असें ह्मणून त्यानें **हातिमास** जेवावयाचा अतिशय आग्रह केला. नंतर सर्वांचीं जेवणें वगैरे झाल्यावर जेव्हां उजाडलें तेव्हां ते सर्व **देवदूत** पुतळे झाले व **हातीम** मार्ग क्रमूं लागला.

जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एका अरण्यांतून चालला असतां एक **वृद्ध स्त्री** रस्त्याच्या एका बाजूस चिंताग्रस्त बसलेली त्यानें पाहिली. तेव्हां तो तिजजवळ गेला आणि तेथें बसण्याचें कारण तीस विचारूं लागला. तेव्हां त्या **वृद्ध स्त्रीनें** 'आपण फारच गरीब स्थितींत असून रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्यांजवळ उदरभरणार्थ कांहीं तरी मागावें या हेतूनें बसलें आहें' असें **हातिमास**

सांगितलें. तें तिचें भाषण ऐकून त्यास फारच वाईट वाटून त्यानें त्या ह्यातारीस आपल्या बोटांतील एक हिऱ्याची आंगठी काढून दिली व तो मार्गस्थ झाला. इतक्यांत ती वृद्धस्त्री आपली सांकेतिक खुण करून "अरे परमेश्वरा, माझ्या साह्यार्थ कोणी तरी पाठीव." असें बोलली; तोंच त्या अरण्यांतून सात तरुण पुरुष बाहेर आले. हे सातही असामी त्या ह्यातारीचे लेंक होते व त्यांचा धंदा जाणाऱ्या येणाऱ्या वाटसरूंना लुटण्याचा होता. पुढें जेव्हां हे सात असामी त्या वृद्धस्त्रीच्या जवळ आले तेव्हां तिनें हातिमानें दिलेली हिऱ्याची आंगठी त्यांस दाखविली आणि ह्मणाली:—ज्या मनुष्यानें मला ही आंगठी दिली आहे तो मनुष्य अतिशय श्रीमान् असून आतांच ह्या रस्त्यानें निघून गेला आहे. हें त्या वृद्धस्त्रीचें भाषण ऐकून ते सातही असामी तेथून निघाले व थोडक्याच वेळांत त्यांनीं हातिमास गांठलें. नंतर इकडच्या तिकडच्या गप्पा—गोष्टी ते त्या जवळ बोलून त्यास लुबाडण्याचा समय पाहूं लागले, परंतु कांहींच इलाज चालेना. तेव्हां ते हातिमास ह्मणाले:—जर तुह्मी कृपा करून आह्मांस बरोबर नेऊन कोठें तरी धंदा रोजगार लावून द्याल तर आह्मांवर तुमचे अतिशय उपकार होतील. कारण हल्लीं आह्मी निरूद्योगी असल्यामुळें या रानांत उगाच भटकत असतों.

हें त्या चोरांचें भाषण ऐकून हातिमास त्यांच्या मनांतलें कृत्रीम न समजून तो भोळेपणानें ह्मणाला:—चला, मी तुह्मांस कोठेंतरी धंदा लावून देईन. हें त्याचें भाषण ऐकून चोरांस अतिशय आनंद झाला. नंतर ते सर्व इसम जातां जातां जेव्हां घोर अरण्यांत आले, तेव्हां त्या चोरांपैकीं एकानें हातिमाच्या पाठीमागें उभें राहून त्याच्या आंगावर जाळें टाकून जमीनीवर उताणें पाडलें. नंतर बाकीच्यानीं त्यास तेथून उचलून जवळच एक खोल खळगा होता तेथें नेलें; आणि त्या जवळचा सर्व ऐवज लुटून घेऊन तलवारीनें जागजागीं जखमा करून त्यास त्या खाड्यांत टाकून देऊन ते चोर चालते झाले. पुढें तीन दिवसपर्यंत बेशुद्ध स्थितीनें पडून राहिल्यावर चौथे दिवशीं जेव्हां तो सावध झाला तेव्हां प्रथमतः

आस्वलकन्येनें दिलेलें मोतीं तो शोधूं लागला. ईश्वरसत्तेनें तें त्या चोरांच्या हातीं न लागतां त्याच्या पागोट्यांत जसेंच्या तसेंच राहिलें होतें ह्मणून थोडक्याच वेळांत त्यास तें सांपडलें. तेव्हां त्यानें तें मोतीं आपल्या जखमांस लाविलें. त्यामुळें थोडक्याच वेळांत सर्व जखमा निखालस बऱ्या होऊन तो अगदीं हुशार झाला.

**हातीम** हा स्वभावतः जरी सहनशील होता तरी त्या चोरांच्या ह्या कृत्याचा त्यास थोडासा राग आला. परंतु थोडक्याच वेळानें तो अगदीं नाहींसा होऊन त्यानें विचार केला कीं, जर ते चोर पुनः भेटतील तर त्यांची इच्छा तृप्त होईपर्यंत द्रव्य देऊन पुनः असें दुष्ट कृत्य करण्याच्या भरीस पडूं नये असा त्यांस उपदेश करावा. ह्याप्रमाणें विचार करून तो स्वस्थ पडला असतां थोड्या वेळानें त्यास झोंप लागली. इतक्यांत त्याच्या स्वप्नांत एक **सिद्धपुरूष** येऊन ह्मणालाः—अरे **हातिमा**, तूं दुःखी होऊं नको. कारण परमेश्वरानें एका मोठ्या महत्वाच्या कामा करितां तुला येथें आणलें आहे; तें काम हें कीं, ह्या खाड्यामध्यें सर्व शक्तिमान् परमेश्वरानें असंख्य द्रव्य ठेविलें आहे, तें घेऊन मनास वाटेल त्याप्रमाणें तूं त्याचा दानधर्म करण्यांत व्यय करावा अशी त्याची इच्छा आहे. तर तूं ऊठ आणि दुःखाचा त्याग करून परमेश्वरइच्छेप्रमाणें वाग. कारण, जो मनुष्य दुःखी असतो त्याचे हातून ईश्वरसेवा यथासांग होत नाहीं. सिद्धाचें हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—परमेश्वराची इच्छा जर माझ्या हातून होणारी सेवा मान्य करून घ्यावयाची असेल तर ती करण्यांत मी बिलकुल आळस करणार नाहीं. कारण, हा देह परोपकारार्थ व ईश्वरसेवेप्रीत्यर्थ झिजवावा असा माझा कृतसंकल्प आहे. आतां तुझी सांगितलेली आज्ञा मला शिरसा मान्य आहे, परंतु ह्या खाड्यांतून निघण्यास व ईश्वरदत्त असंख्य द्रव्य उकरून काढण्यास मी असमर्थ आहें त्याची वाट काय ? **हातिमाचें** हें बोलणें ऐकून **सिद्ध** ह्मणाला, उदईक ह्या रस्त्यानें; जाणारे दोन मनुष्य येथें येऊन तुला ह्या खाड्यांतून बाहेर काढतील व येथील द्रव्य काढण्यासही ते मदत करतील. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—हा

खाडा अतिशय खोल व अवघड असल्यामुळें दोघां मनुष्यांच्यानें मला बाहेर काढवणार नाहीं. मग द्रव्य काढण्याची तर गोष्टच नको. सिद्ध ह्मणाला; त्या गोष्टीची काळजी तुला नको. कारण सर्व शक्तिमान परमेश्वराची लीला अगाध आहे ! ! इतकें बोलून तो सिद्ध गुप्त झाला.

नंतर त्या दिवसाची रात्र सरून उजाडल्यावर सिद्धाच्या सांगण्याप्रमाणें दोन मनुष्य त्या खाड्या जवळ आले, आणि ह्मणाले:—हे हातिमा, तूं अजून जिवंत आहेस काय? हातिमानें आंतूनच उत्तर केलें कीं, ज्या जगन्नियंत्यानें मला उत्पन्न केलें त्यानें ह्या खाड्यांतील दुःख भोगण्यास मला अद्यापपर्यंत जिवंत ठेविलें आहे. हातिमाचें हें भाषण ऐकून त्या दोघां मनुष्यांनीं वरूनच आपले हात त्या खाड्यांत घातले, व तो खाडा जरी अतिशय खोल होता तरी ईश्वरीमायेच्या योगानें खाड्याच्या तळाशीं जेथें हातीम पडला होता तेथपर्यंत ते जाऊन पोंहोंचले. हें पाहून हातिमास अत्याश्चर्य वाटलें. नंतर त्या दोघांनीं आपल्या हातांनीं हातिमास धरून बाहेर काढलें. आपण फारसे आयास न करितां खाड्याच्या बाहेर आलों हें पाहून हातिमास अतिशय आनंद होऊन तो ह्मणाला, ह्या खाड्यामध्यें जें असंख्य द्रव्य पुरलेलें आहे तें जर तुह्मी बाहेर काढाल तर परमेश्वरइच्छेप्रमाणें मी त्याचा दान धर्म करण्यांत व्यय करीन. हें हातिमाचें भाषण ऐकून त्या दोन मनुष्यांपैकीं एकजण त्या खाड्यांत उतरला आणि त्यानें एका तासाच्या आंत सर्व द्रव्य उकरून काढलें व तें आपल्या दुसऱ्या सोबत्याजवळ देऊन तो वर आला. नंतर त्या असंख्य द्रव्याचें लहान मुलालाही सहज उचलतां येईल असें एक गाठोडें बांधून तें हातिमाच्या स्वाधीन करून व त्याची रजा घेऊन ते दोघे मार्गस्थ झाले. ते गेल्यावर हातिमानें मनांत विचार केला कीं, ज्या मनुष्यांनीं द्रव्य लोभास्तव मला ह्या खाड्यांत टाकलें, त्यांजला जर हें द्रव्य दिलें तर त्यांचा लोभ नाहींसा होऊन ते कोणाही प्रवाशाच्या वाटेस जाणार नाहींत, आणि असें झालें ह्मणजे लोकांचें संकट दूर केल्या सारखें होईल. असा विचार क-

रून त्यानें तें गाठोडें उचललें आणि ज्या म्हातारीनें प्रथमतः **हातिमा**जवळ उदरपोषणार्थ कांहीं द्रव्य मागितलें होतें तिच्या शोधार्थ तो निघाला.

जातां जातां कांहीं वेळानें ती म्हातारी पूर्वीप्रमाणेंच रस्त्याच्या एका बाजूस चिंतित मुद्रेनें बसलेली **हातिमा**नें पाहिली. तेव्हां त्यानें तिजजवळ जाऊन एक हिरा तिला दिला. इतक्यांत ती म्हातरी पूर्वींप्रमाणें सांकेतिक खूण करून म्हणाली:—हे " **परमेश्वरा**, माझ्या साह्यार्थ कोणीतरी पाठीव. " हे त्या म्हातारीचे शब्द ऐकतांच तिचे सातही पुत्र तेथें आले आणि **हातिमा** भोंवतीं जमून, कोठून आलेत व जातां कोठें ? असें त्यास विचारूं लागले. तें एकून **हातीम** त्यांस म्हणाला:—मी जी गोष्ट सांगतों ती जर तुह्मी ऐकाल तर मजवर मोठे उपकार होतील. चोर म्हणाले:—तुह्माला जी गोष्ट बोलणें असेल ती खुशाल बोला; आह्मी ऐकण्यास अगदीं तत्पर आहों. हें त्या चोराचें मानभावी बोलणें ऐकून **हातीम** त्यांस म्हणाला, तुह्मी द्रव्यलोभानें या रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्या लोकांस गांठून त्यांजजवळचें सर्व द्रव्य हरण करून त्यांस मारून टाकतां तरी आज पासून जर तुह्मीं हा दुष्ट व पातकी उद्योग सोडून देऊन धर्म न्यायानें वागण्याचें मला वचन द्याल तर मी तुह्मांस असंख्य द्रव्य देतों; असें बोलून त्यानें आपल्या जवळचें द्रव्याचें गाठोडें त्यांस दाखविलें, तें पहातांच ते चोर चकित होऊन म्हणाले:—हें द्रव्य जर तुह्मी आह्मांस देत असाल, तर **परमेश्वरा**स व सर्व लोकांस न आवडणारा असा हा रस्तेलूटीचा धंदा आह्मीं सोडून देतों. व ह्या गोष्टीच्या खरेपणादाखल तुह्मीं सांगाल तशी शपथही घेतों. चोरांचें हें भाषण ऐकून **हातिमास** फारच आनंद होऊन तो म्हणाला:—मी सांगतों अशी शपथ ध्या. ती ही कीं, " जगन्नियंत्या **परमेश्वराला** स्मरून आह्मी अशी शपथ घेतों कीं, ह्या अरण्यांतून जे प्रवासी जातील त्यांस इतःपर आह्मी कधींही दुःख देणार नाहीं, आणि जर दिलें तर त्या अपराधाबद्दल **परमेश्वरा**नें आह्मांस क्षमा न करितां यथायोग्य शिक्षा करावी. " येणें प्रमाणें सर्वांनीं

शपथा घेतल्यावर हातिमानें तें सर्व द्रव्य त्यांचें स्वाधीन केलें. आणि त्यांस पुनः उपदेश करून तो तेथून निघाला.

नंतर दरकुच दरमजल करीत करीत जात असतां एक दिवशीं भरदोन प्रहरच्या सुमारास एक कुत्रा भुकेनें व तृषेनें व्याकुळ झालेला हातिमाच्या नजरेस पडला. तेव्हां त्याच्या पोटांत स्वभाविकच दया उत्पन्न होऊन तो त्याजवळ गेला. कारण उघडच आहे कीं, ज्यानें परोपकार करण्याकरितांच ह्या मायावी जगांत जन्म घेतला, त्या ईश्वरनिर्मित प्राण्यास दुःखी पाहून कां बरें दुःख वाटणार नाहीं? असो, पुढें हातीम त्या कुत्र्याजवळ जातांच तोही मोठ्या उत्कंठेनें दीन मुद्रा करून त्याजकडे पाहूं लागला. त्यावरून त्या कुत्र्यास क्षुधा व तृषा ह्यांची अतिशय पीडा झाली आहे अशी त्यानें कल्पना केली; आणि त्या कुत्र्यास उचलून तो अन्नपाण्याचा शोध करीत तेथून निघाला. पुढें जातां जातां थोडक्याच वेळानें त्यास एक खेडें दिसलें; तें पाहून हातिमास अतिशय आनंद होऊन मोठ्या उत्कंठेनें तो त्या खेड्यांत गेला व कुत्र्यास खाण्याकरितां तेथील लोकांजवळ अन्न मागूं लागला. नंतर त्या खेडे गांवातील लोकांनीं दोन भाकऱ्या व थोडेसें दहीं हातिमास दिलें. तें घेऊन त्यानें कुत्र्यास खावूं घातलें. दहीं भाकरी खाल्यावर थोडक्याच वेळानें तो कुत्रा चांगला हुषार होऊन ममतेनें हातिमाचे हातपाय चाटूं लागला. कुत्र्याचें हें लडिवाळपणाचें कृत्य पाहून हातिमास फारच आनंद झाला. नंतर जगन्नियंत्या परमेश्वरानें आपल्या अगाध लीलेनें ह्या सृष्टीमध्यें जे प्राणी उत्पन्न केले आहेत त्यांच्या गुणधर्माविषयीं त्यानें थोडा वेळ विचार करून त्याचे फारच आभार मानले; व त्या कुत्र्यास उचलून घेऊन तो गोंजारूं लागला. इतक्यांत त्या कुत्र्याच्या डोक्यामध्यें शिंगा सारखा कांहीं कठीण भाग लागला ह्मणून तो मोठ्या आश्चर्यानें नीट न्याहाळून पाहूं लागला तों त्याच्या डोक्यांत लोखंडाचा एक भक्कम खिळा मारलेला हातिमाच्या नजरेस पडल्यावरून त्यानें तो उपटून काढला. तेव्हां कुत्र्यानें तें श्वानरूप बदलून तो एक अती सुंदर तरुण पुरुष बनला. हा

अद्भुत चमत्कार पाहून **हातीम** ह्मणालाः—हे सुंदर व तरुण पुरुषा, तुझें पूर्वीचें श्वानरूप असून मस्तकांतील खिळा काढल्या बरोबर ताबडतोब तुझी ती काया पालटून तूं मनुष्य रूप बनलास हें झालें तरी कसें ? **हातिमाचे** हे आश्चर्ययुक्त शब्द ऐकतांच तो तरुण मनुष्य त्याचे पायांवर गडबडां लोळून व श्वानयोनींतून मुक्तता केल्याबद्दल **हातिमाचे** फारच उपकार मानून तो ह्मणालाः—मी मूळचा मनुष्य असून मला श्वानयोनी कशी प्राप्त झाली हें ऐकण्याची जर आपली इच्छा असेल तर मी सांगतों इकडे लक्ष असावें. त्या तरुणाचें हें भाषण ऐकून **हातिमानें** मोठ्या उत्सुकतेनें त्यास सांगण्यास सांगितल्यावरून तो ह्मणालाः—**महाराज,** मी एका व्यापाऱ्याचा मुलगा असून माझा बाप व्यापारा निमित्त **चीन** देशास गेला होता. तेथें त्यानें मोठा व्यापार करून अतिशय संपत्ति मिळविली. नंतर जेव्हां तो तेथून परत आपल्या गांवीं येऊं लागला तेव्हां त्यानें त्या देशांतील बरेच मौल्यवान जिन्नस खरेदी केले; व वाटेनें त्यानें **खेटा** नामक एका व्यापारा विषयीं प्रसिद्ध अशा शहरीं ते सर्व जिन्नस विकून टाकले. त्या योगानें तर माझ्या बापास अतोनात द्रव्य मिळालें. नंतर आपल्या गांवीं परत आल्यावर मी त्याचा एकुलता एक पुत्र असल्यामुळें तो मला ह्मणालाः—तूं आतां मोठा झाला आहेस सबब लग्न करून संसारसुखाचा अनुभव घ्यावास असें मला वाटतें. माझ्या बापाची ही इच्छा पाहून मी एका सुंदर स्त्री बरोबर लग्न केलें. पुढें कांहीं वर्षांनीं माझा बाप वारल्यावर त्यानें मोठ्या कष्टानें संपादन केलेली मिळकत मी ख्यालीखुषालीमध्यें उडवूं लागलों. पुढें थोडक्याच दिवसांत जेव्हां ती संपत आली तेव्हां बापाप्रमाणें **चीन** देशांत जाऊन कांहीं व्यापार धंदा करण्याचा मी निश्चय केला व त्याप्रमाणें थोडक्याच दिवसांनीं मी आपला गांव सोडून **चीन** देशास निघून गेलों.

इकडे मी गेल्याला बरेच दिवस झाले असें पाहून माझी स्त्री आपल्या एका हबशी चाकरावर फिदा झाली व तुह्मी जो खिळा आतां माझ्या डोक्यांतून काढलात तो तिनें एका मांत्रिकाजवळून

मिळविला होता. पुढें कांहीं दिवसांनीं मी व्यापार करून परत घरीं आलों, तेव्हां एकेदिवशीं मी निजलों आहें असें पाहून त्या व्यभिचारी स्त्रीनें तो जादुगारापासून मिळविलेला मांत्रिक खिळा माझ्या डोक्यांत मारला. त्याबरोबर मी **कुत्रा** झालों. नंतर तिनें मोठ्या रागानें मला लाथ मारून घरांतून घालवून दिलें. तेव्हां निरुपायास्तव मी तेथून निघालों आणि वनोपवनें हिंडत क्षुधेनें व तृषेनें व्याकुळ होऊन पडलों असतां परमेश्वराच्या मनांत माझी त्या दुष्ट स्थितींतून मुक्तता करण्याचें येऊन त्यानें आपणास पाठविलें; तेणेंकरून माझी श्वानयोनींतून मुक्तता झाली.

त्या तरुण मनुष्याची ही चमत्कारिक हकीगत ऐकून **हातीम** अतिशय आश्चर्य भरित होऊन ह्मणालाः—हे **तरुणा,** तूं कोणत्या ठिकाणीं राहतोस? तरुण ह्मणालाः—येथून तीन दिवसांच्या रस्त्यावर '**सुरी**' नामक एक शहर आहे तेथील मी राहणारा आहें हें त्याचें भाषण ऐकतांच **हातीम** ह्मणालाः—तें शहर माझ्या ओळखीचें आहे. कारण त्या शहरांत **हारिथ** नामक एक व्यापारी आहे; त्याच्या कन्येचा असा पण आहे कीं, तिला वरण्याची जो इच्छा धरील त्यानें तिच्या तीन प्रश्नांचीं उत्तरें द्यावी, ह्या तिच्या पणाप्रमाणें एक मनुष्य तिजवर फिदा झाला आहे. परंतु त्याच्या आंगीं त्या सावकारकन्येच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें केवळ परोपकारार्थ मी त्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें पतकरून प्रस्तुत तिच्या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर तिजला सांगावयास जात आहें. **हातिमाचें** हें भाषण ऐकून तो तरुण मनुष्य ह्मणालाः—तुह्मी ज्या **हारिथ** व्यापाराच्या **कन्येची** हकीगत सांगितलीत ती अगदीं अक्षरशः खरी असून मीही त्याच गांवचा राहाणारा आहें. असो, चला आतां आपण तिकडे जावूं. असें ह्मणून ते दोघेही मार्ग क्रमूं लागले.

वाटेनें जात असतां **हातीम** त्या तरुण मनुष्यास ह्मणालाः—मित्रा, हा तुझ्या मस्तकांत मारलेला खिळा नीट जपून ठेव. आणि जसा तुझ्या विषयांध स्त्रीनें तुझ्या डोक्यांत मारला, तसाच तूंही तिच्या डोक्यांत मार; ह्मणजे तीही तुझ्याप्रमाणेंच **कुत्री**

होईल. **हातिमाचें** हें बोलणें त्या तरुण पुरुषानें मान्य केलें. नंतर तिसरे दिवशीं जेव्हां ते '**सुरी**' शहरांत येऊन त्या तरुण मनुष्याच्या घराजवळ आले तेव्हां त्याचे चाकर आपला धनी फार दिवसांनीं आला असें पाहून मोठ्या आनंदानें त्यास सलामी करून कुशल विचारूं लागले. परंतु त्या तरुणानें त्या सर्वांस गप्पचिप्प बसावयास सांगून एका चाकराच्या हातांतील तरवार घेतली आणि तो गुप्त रीतीनें आपल्या घरांत शिरला. घरांत गेल्यावर पूर्वीं जसे त्याचे चाकर आनंदित झाले होते तशाच त्याच्या दासीही आपल्या धन्याला पाहून हर्षभरित झाल्या. परंतु त्या तरुणानें त्यांस दाबून परस्त्रीधनावर दरोडा घालणाऱ्या **हावशाची** चौकशी केली. तेव्हां त्या म्हणाल्याः—**महाराज,** तो दुष्ट हावशी व बाईसाहेब दिवाणखान्यांत निर्धास्त होत्सातीं पलंगावर निजलीं आहेत. दासींचें हें भाषण ऐकून त्या तरुणास अतिशय क्रोध येऊन तो तसाच त्वेषानें आपल्या दिवाणखान्यांत गेला आणि तरवारीच्या एका घावानें त्यानें त्या नराधम चाकराचें धड व शीर वेगळें केलें. नंतर **हातिमानें** सांगितल्याप्रमाणें त्यानें तो जादूनें भारलेला खिळा स्त्रीच्या डोक्यांत मारला; त्या बरोबर तिचें मानवी स्वरूप नष्ट होऊन ती **कुत्री** बनली. इतकें कृत्य झाल्यावर तो तरुण मनुष्य दिवाणखान्या बाहेर आला आणि **हातिमास** बरोबर घेऊन पुनः दिवाणखान्यांत परत आला. नंतर त्या **कुत्रीच्या** गळ्यांत साखळदंड बांधून तो **हातिमास** म्हणालाः—ही माझी शहाणी बायको आणि हा परस्त्रीलंपट नराधम **हावशी;** असें म्हणून त्यानें **हावशाचें** प्रेत त्यास दाखविलें. प्रेत पहातांच **हातिमास** अतिशय वाईट वाटून तो म्हणालाः—या **हावशास** तूं मारावयाचें नव्हतेंस. तरुण म्हणालाः—मित्रा, यास मी देहांत प्रायःचित्त दिलें हें एका अर्थी बरेंच केलें. कारण, जर मी यास मारलें नसतें तर यानें ह्याहीपेक्षां जास्त पातकें केलीं असतीं. हें त्याचें भाषण ऐकून **हातीम** निरुत्तर होऊन स्तब्ध राहिला. नंतर तो दिवस त्यांनीं तेथेंच आनंदांत घालविल्यावर दुसरे दिवशीं सकाळीं **हातीम** त्या तरुण

मनुष्याची रजा घेऊन निघाला, आणि ज्या धर्मशाळेंत त्याचा **'नाईम'** ह्या नांवाचा मित्र होता तेथें जाऊन त्यास भेटला. **हातिमास** पहातांच **नाईमास** अतिशय आनंद होऊन तो त्याच्या पायांवर लोळूं लागला. परंतु **हातिमानें** त्यास ताबडतोब उठवून कांहीं कुशल प्रश्न विचारले. त्याचीं उत्तरें दिल्यावर तो ह्मणाला:—सांप्रत रानामध्यें आपण ज्या शब्दाच्या शोधार्थ गेलां होतां तो शब्द होत नाहीं. त्यावरून **हारिथकन्या** आपण विजयी झालां असें समजून आपल्या येण्याची मार्ग—प्रतिक्षा करीत आहे. **नाईमाचें** हें भाषण ऐकून **हातीम** ताबडतोब तेथून निघून **हारिथ** व्यापाऱ्याच्या घरीं गेला, आणि आपण आल्याची वर्दी त्यानें दासीहस्तें **सावकारकन्येस** कळविली. ती ऐकतांच **सावकारकन्येस** अतिशय आनंद होऊन तिनें त्यास आपल्या महालांत बोलावून आणून दुसऱ्या प्रश्नाची हकीगत विचारली. तेव्हां **हातिमानें** आरंभापासून सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून **सावकारकन्या** ह्मणाली:—तुह्मी सांगतां ही गोष्ट खरी आहे. कारण, हल्लीं तसा आवाज बिलकुल होत नाहीं. त्यावरून तुह्मी माझ्या प्रश्नाचें उत्तर आणलेंत खरें! असो, आतां माझा एकच प्रश्न आहे त्याचें उत्तर आणा ह्मणजे झालें. **हातिमानें** तो कोणता प्रश्न असें विचारल्यावरून **सावकारकन्या** ह्मणाली, "**महापरी नामक एक गंधर्वकन्या आहे,** तिचा शोध करून तिजजवळ जो **शहामोरा** नांवाचा हिरा आहे तो मजकारितां घेऊन या." **सावकारकन्येनें** सांतितलेला हा प्रश्न ऐकून **हातीम** तिची रजा घेऊन तेथून निघून परत धर्मशाळेंत आला. आणि **नाईमास** सर्व हकीगत सांगून एक दोन दिवस विश्रांतिकारितां तेथें राहून त्याची आज्ञा घेऊन तिसऱ्या प्रश्नांच्या उत्तरा करितां निघाला. मात्र जातांना त्यानें **नाईमास** 'थोडक्याच दिवसांनीं तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर आणून ती **सावकारकन्या** तुला प्राप्त करून देईन' असें अभिवचन दिलें होतें. नंतर थोडासा मार्ग क्रमिल्यावर तो एका झाडाखालीं स्वस्थ बसून आतां कोठें जावें, व आपणास **महापरी** नामक **गंधर्वकन्या** कोठें राहते हें कोण सांगेल? असा विचार करीत

बसला असतां **फारोक्याश** राजाकडे जाऊन **महापरीचा** वृत्तांत विचारावा अशी त्याचे मनांत कल्पनाआली. व त्या प्रमाणें तो त्या विवरद्वारानें मार्ग—क्रमूं लागला. पुढें जातां जातां आठ दिवसानीं जेव्हां तो **फारोक्याश** राजाच्या राज्यांत आला, तेव्हां तेथील संभावित राक्षसांनीं त्यास ओळखून आपआपल्या घरीं नेऊन मेजवान्या दिल्या.

याप्रमाणें जागजागीं तो मेजवान्या घेत असतां आपल्या राज्यांत **हातीम** आला आहे अशी बातमी **फारोक्याश** राजास कळली, त्यावरून त्यानें **हातिमास** मोठ्या सन्मानानें बोलावून आणविलें. आणि त्यास **सिंहासनावर** बसवून येण्याचें कारण विचारलें. तेव्हां **हातीम** ह्मणालाः—हे **राजा महापरी** ' या नांवाची एक गंधर्वकन्या असून तिच्याजवळ **शाहामोरा** ' या नांवाचा एक हिरा आहे. तो हिरा तिजजवळून प्राप्त करून घेण्याकरितां मी प्रस्तुत जात आहें. परंतु ती **गंधर्वकन्या** कोणत्या ठिकाणीं राहते हें मला बिलकुल माहीत नाहीं. तरी आपण कृपाळू होऊन तिच्या संबंधानें मला कांहीं शोध सांगून मदत कराल या हेतुनें मी आलों आहें. **हातिमाचें** हें भाषण ऐकून **राजा** ह्मणालाः—हे **हातिम,** तूं जें जें काम पतकरतोस तें मानवीशक्तीच्या पलीकडचें असतें. कारण, त्या गंधर्वकन्येच्या राज्यांत जाऊन परत येण्याची आमचीसुद्धां आज्ञा नाहीं; असें असतां तूं त्या ठिकाणीं जाऊन तिच्या जवळचा हिरा घेऊन येणार. तेव्हां तुला काय ह्मणावें? **हातीम** ह्मणालाः—ज्या परमेश्वरानें आपणासारख्यांच्या राक्षसी राज्यांतून सुखरूपतेनें परत नेलें तोच जगन्नियंता **महापरी** गंधर्वकन्येच्या राज्यांतून मला परत आणील. तरी फक्त तुह्मी मला वाट दाखविण्यापुरताच एखादा चाकर मजबरोबर द्या ह्मणजे झालें. जें काम करण्याविषयीं प्रतिज्ञा पूर्वक वचन दिलें आहे तें काम मला अर्धवट टाकतां येत नाहीं. हें **हातिमाचें** भाषण ऐकून **फारोक्याश** राजा थोडासा विचारांत पडला. कारण हातिमाच्या ह्मणण्याप्रमाणें वागणें ह्मणजे आपलें थोडेंसें नुकसान करून घेणें असें त्यास वाटत होतें. असो, पुढें ह्या गो-

ष्टीस तीन दिवस झाल्यावर चौथे दिवशीं **हातीम, फारोक्याश** राजास ह्मणालाः—आतां माझी रवानगी करा. कारण, ज्या तरुण मनुष्याचें हें काम मी पतकरलें आहे तो माझी एकसारखी वाट पहात असेल. आणि जर मी लवकर गेलों नाहीं तर तो कदाचित् प्राण त्यागही करील. मग मी ईश्वरासमोर काय जबाब देऊं ? हें ऐकून **फारोक्याश** राजानें आपल्या कित्येक चाकरांस बोलावून आणलें व त्यांस सांगितलें कीं, ह्या मनुष्याला **महापरी** गंधर्वकन्येच्या राज्यसीमेपर्यंत नेऊन सोडा व हा परत येईपर्यंत तुह्मी तेथेंच असा. ही राजाज्ञा होतांच त्या चाकरांनीं एक पवनगतीनें चालणारें विमान आणून त्यांत **हातिमास** बसविलें व तें विमान घेऊन एका महिन्यानें **महापरी**च्या राज्यसीमेवर आलें. नंतर ते **हातिमास** ह्मणालेः—हा जो समोर पर्वत दिसतो आहे त्याला '**काफपर्वत**' असें ह्मणतात. हा पर्वत **महापरी**च्या राज्याची हद्द आहे. आतां ह्याच्या पलीकडे आमच्यानें येववत नाहीं कारण जर आलों तर तेथें जे गंधर्व आहेत ते आह्मांस मारून टाकतील.

चाकरांचें हें भाषण ऐकून **हातीम** ताबडतोब **सिंहासनां**तून उतरला आणि त्या राक्षसांस तेथेंच राहावयास सांगून आपण मार्ग—क्रमूं लागला. जसजसा तो **काफ** पर्वताच्या जवळजवळ जाऊं लागला तसतसा तो पर्वत अतिशय उंच दिसूं लागला, हें पाहून **हातीम** थोडासा चकित झाला. नंतर जेव्हां तो त्या पर्वताच्या तळाशीं आला तेव्हां त्यास पाहून तेथें जे पहारेकरी गंधर्व होते ते आपापल्यांत ह्मणालेः—हा पहा, एक मनुष्य आपल्या राज्यांत येत आहे. त्याला येथपर्यंत येण्यास भीति तरी कशी वाटली नाहीं. चला आपण जाऊन त्यास धरून मारून टाकूं. हें त्या गंधर्वांचें भाषण ऐकतांच बाकीचे सर्व गंधर्व मोठ्या उत्सुकतेनें धांवत गेले आणि त्यांनीं **हातिमास** पकडून त्याचे हात पाय बांधून वर घेऊन गेले. नंतर त्यास तूं कोठून आलास व तुझें येथें काम काय आहे असें ते विचारूं लागले, तेव्हां **हातीम** ह्मणालाः—ज्या जगनियंत्यानें हें सर्व जग उत्पन्न केलें त्यानेंच

मला 'सुरी' नामक शहराहून येथें आणलें. हें ऐकतांच एक गंधर्व ह्मणालाः—तुला हारिथव्यापाऱ्याच्या कन्येनें येथें पाठविलें काय? गंधर्वाचें हें भाषण ऐकतांच हातीम आपल्या मनांत ह्मणालाः—मी शहामोरा हिरा नेण्यास आलों आहें असें जर स्वमुखानेंच ह्यांना सांगितलें तर हे मला ठार मारून टाकतील. बरें जर दुसरें कांहीं सांगावें तर खोटें बोलण्याचा दोष पदरीं येतो. तरी आतां कांहीं एक न बोलतां स्वस्थ असावें; असा विचार करून तो स्वस्थ राहिला.

नंतर त्या गंधर्वपहारेकऱ्यांनीं मनांत विचार केला कीं, ज्या अर्थीं हा बोलत नाहीं त्या अर्थीं महापरीजवळ शहामोरा नांवाचा हिरा आहे तो नेण्याकरितां हा आला आहे; तरी यास जिवंत ठेवून उपयोग नाहीं. असा विचार करून त्यांनीं कांहीं लांकडें जमा केलीं व मोठा अग्नी प्रदीप्त केला आणि त्यांत हातिमास टाकलें. गंधर्व आपणांस अग्नींत टाकणार असें जेव्हां हातिमास समजलें तेव्हां त्यानें आस्वलकन्येनें दिलेलें मोतीं आपल्या तोंडांत धरिलें. त्यामुळें त्यास आगीच्या ज्वाळांपासून कांहींएक बाधा न होतां तीन दिवसपर्यंत तो तसाच त्या होमकुंडांत पडून होता. नंतर तिसरे दिवशीं जेव्हां तो अग्नी साफ विझाला तेव्हां हातीम तेथून निघून पुढें मार्ग—क्रमूं लागला. परंतु तो कांहींसा पुढें गेला नाहीं इतक्यांत ज्या गंधर्वांनीं त्यास अग्नींत टाकलें होतें त्याच गंधर्वांच्या तो पुनः दृष्टीस पडला. तेव्हां ते गंधर्व चकित होऊन हातिमास ह्मणाले, आज पांच दिवसांपूर्वीं तुझ्यासारखा एक मनुष्य आह्मांस भेटला होता व त्यास आह्मी जाळून टाकिलें होतें तोच तूं नव्हे काय? गंधर्वांचें हें भाषण ऐकून हातीम रागाऊन ह्मणाला;—हे निर्दयानों, ज्याला तुह्मी जाळून टाकिलें त तोच मी मनुष्य. परमेश्वरानें हा जो नरदेह दिला आहे त्याची तुह्मी अशी रक्षा करितां काय? या तुमच्या मूर्खपणास काय ह्मणावें? हें हातिमाचें भाषण ऐकून गंधर्वास मोठा राग आला व त्यांनीं पुनः अग्नी प्रदीप्त करून त्यांत हातिमास टाकलें. परंतु त्यांतूनही तो सुरक्षितरीतीनें बाहेर पडल्यामुळें त्यांनीं तिसऱ्यानें अग्नी पेट-

वून त्यांत **हातिमास** टाकलें. तरी त्यांतूनही जेव्हां तो सुरक्षित-रीतीनें बाहेर पडला तेव्हां त्या सर्वांनीं त्यास पाण्यांत बुडविण्याचा विचार करून त्याप्रमाणें त्यांनीं त्यास समद्रांत नेऊन बुडविलें. इतक्यांत एका अतिशय मोठ्या मत्स्यानें त्यास तावडतोब गिळलें. पुढें कांहीं वेळानें जेव्हां **हातीम** शुद्धीवर आला तेव्हां **मत्स्याच्या** पोटांतच तो इकडून तिकडे फिरूं लागला, त्यामुळें त्या **मत्स्यास** अतिशय त्रास होऊन तो किनाऱ्यावर आला आणि बलात्कारें ओकून सुक्या जाग्यावर **हातिमाची** मुक्तता करून झरदिशीं पाण्यांत निघून गेला.

**मत्स्याच्या** पोटांतून **हातिमाची** मुक्तता झाल्यावर तो इकडे तिकडे फिरूं लागला. परंतु दोन दिवसपर्यंत खाण्यापिण्यास कांहीं एक न मिळाल्यामुळें त्याचा जीव अगदीं कासावीस झाला होता; तरी त्या स्थितींतच तो मार्ग–क्रमूं लागला. जातां जातां कांहीं दिवसांनीं पुनः त्याला पुर्वीप्रमाणेंच गंधर्वपहारेकरी भेटले. तेव्हां पहारेकऱ्यांपैकीं एकजण **हातिमास** ह्मणालाः—हे मनुष्या, तूं कोठून आलास? **हातीम** ह्मणालाः—ज्या जगन्नियंत्यानें आपणा सर्वांस उत्पन्न केलें त्यानेंच मला येथें आणलें आहे. आतां तुह्मां-जवळ माझें इतकेंच मागणें आहे कीं, आज तीन चार दिवस बिलकुल खावयास न मिळाल्यामुळें मला अतिशय भूक लागली आहे तरी कृपाळू होऊन मला कांहींतरी खावयास द्या. कारण, आज पांच सहा दिवसांपूर्वीं जेव्हां मीं **काफ** पर्वताजवळ गेलों होतों तेव्हां त्या जाग्याचें संरक्षण करणारे तुमच्यासारखे कांहीं गंधर्व भेटले व त्यांनीं मला दोन तीन वेळ अग्नीमध्यें जाळण्याचाही प्रयत्न केला. परंतु परमेश्वरकृपेनें त्यांतूनही मी वांचल्यामुळें त्यांनीं मला समुद्रांत बुडविलें. इतक्यांत एका मोठ्या **मत्स्यानें** मला गिळलें. पण 'तारत्यापुढें मारत्याचें कांहीं चालत नाहीं' ह्मणतात त्या प्रमाणें परमेश्वरानें त्या **मत्स्यापासूनही** माझी सुटका केली. नंतर मी क्षुधाशमनार्थ कांहीं पदार्थ शोधण्याच्या इच्छेनें फिरत असतां दुर्दैवानें एक रेतीचें मैदान लागलें. त्या मैदानांतूनही ईश्वर सत्तेनें पार पडून एथपर्यंत आलों आहें तरी मला कांहीं खावयास द्या.

हातिमाचें हें भाषण ऐकून ते पहारेकरी ह्मणालेः—आह्मांस आमच्या राणीचा असा हुकूम आहे कीं 'आपल्या राज्यसीमेंत जर कोणी एखादा मनुष्य किंवा राक्षस येईल तर त्यास तुह्मी बेधडक मारून टाकीत जा' अशी तिची आज्ञा असल्यामुळें आमच्यानें तुला नुसता पाण्याचा एक थेंबही देववत नाहीं. कारण जर ही गोष्ट आमच्या राणीला कळली तर ती आह्मांस शासन केल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. इतक्यांत दुसरा एक गंधर्व ह्मणालाः—ह्या ठिकाणापासून आपली राणी फारच लांबीच्या पल्यावर राहते. तेव्हां आपण ह्यास जर अन्नपाणी दिलें तर ही बातमी राणीला कशी कळेल? त्यांतून हा मनुष्य आपण होऊन आला नसून परमेश्वरानेच ह्याला येथें आणलें आहे. इतकेंच नव्हे तर प्राणांत संकटें आलीं असतांही त्यांतून त्यानें ह्याची मुक्तता केली; ह्यावरून आपल्या हातूनही ह्याचें रक्षण व्हावें अशी जगन्नियंत्याची मनीषा असावी असें दिसतें. आणि त्यांतूनही मनुष्यजात ही ईश्वर निर्मित सर्व प्राण्यापेक्षां श्रेष्ठ आहे, तरी आपण सर्वजण एकमत होऊन ह्या मनुष्यास घरीं घेऊन जाऊं आणि अन्नपाणी देऊन रक्षण करूं. हें त्याचें भाषण ऐकून इतर सर्व पहारेकऱ्यांस हातिमाविषयीं दया उत्पन्न होऊन ते त्यास आपल्या घरीं घेऊन गेले आणि अन्नपाणी वगैरे देऊन त्यांनीं त्याची सुव्यवस्था केली. त्यामुळें एकदोन दिवसांत तो चांगला हुशार होऊन अनेक तऱ्हेच्या गोष्टी सांगून गंधर्वांचें मन रंजवूं लागला. सारांश थोडक्याच दिवसांत तो इतका सर्वांस प्रिय झाला कीं, ते गंधर्व त्यास आपला 'बंधु' असे मानूं लागले.

पुढें एके दिवशीं त्या गंधर्वांनीं हातिमास आपला गांव सोडून भटकत फिरण्याचें कारण विचारलें; तेव्हां त्यानें आपली सर्व हकीगत इतक्या खुबीनें सांगितली कीं, ती ऐकून सर्वांच्या मनाला खेद व्हावा व त्यांचीं अंतःकरणें कळवळावीं. अशी ती हृदयद्रावक हकीगत ऐकल्यावर गंधर्व ह्मणालेः—गोष्ट फार वाईट झाली. कारण, ही हकीगत जर आमच्या राणीस कळली तर ती आमचें सर्वांचे प्राण घेतल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. हें ऐकून

हातीम ह्मणालाः—असें जर आहे तर तुह्मी माझे हातपाय बांधा आणि मला आपल्या राणीकडे घेऊन चला. हें ऐकून एकजण ह्मणालाः—ज्या अर्थी आह्मी तुझें इतके दिवस पालन केलें त्या अर्थी आतां आमच्या हातून तुला बांधून नेववणार नाहीं. इतक्यांत दुसरा एकजण ह्मणालाः—ह्या गोष्टीस एक युक्ति आहे. ती अशी कीं, आपणांपैकीं एकानें जाऊन राणीस सांगावें कीं ‘आह्मांस एक समुद्र—किनाऱ्यावर मनुष्य सांपडला आहे तर जशी आपली मर्जी असेल त्या प्रमाणें हुकूम व्हावा’. मग राणी जसें सांगेल त्याप्रमाणें आपण करूं. ही त्या गंधर्वानें सांगितलेली युक्ति सर्वांस मान्य होऊन त्यांनीं त्या कामावर त्याचीच योजना केली. त्याप्रमाणें तो गंधर्व सात दिवसांनीं आपल्या राणीच्या दरबारीं जाऊन पोहोंचला; आणि ह्मणालाः—आपल्या राज्यांत आजपर्यंत जितके मनुष्य मारले गेले त्या सर्वांपेक्षां अतिशय देखणा असा एक मनुष्य आह्मांस समुद्र—किनाऱ्याहून येतानां सांपडला आहे. आतां जशी आपली आज्ञा होईल तसें करूं. गंधर्वाचें हें भाषण ऐकतांच **महापरी** राणी ह्मणालीः—त्या सौंदर्यवान् मनुष्यास नीट सांभाळून मजकडे घेऊन या. ह्मणजे तो आपल्या राज्यांत कोणत्या कामा करितां आला होता, याची चवकशी मी स्वतः करीन. इतकें ऐकतांच तो गंधर्व तेथून निघून आपल्या स्थानावर आला आणि घडलेली हकीगत त्यानें सर्वांस सांगितली.

आपल्या राज्यांत कोणी सौंदर्यवान् मनुष्य आला आहे अशी बातमी **महापरीं**च्या राज्यांत पसरतांच **महापरी ‘मसनापरी’** या नांवाची एक दासी होती तिच्या **‘हसनापरी’** नामक कन्येस ही बातमी समजली. त्या **हसनापरी**चा स्वभाव असा होता कीं, कोणतीही चमत्कारिक गोष्ट तिनें ऐकली कीं ती प्रत्यक्ष पाहिल्या शिवाय तिला चैन पडत नसे. अशी तिच्या मनाची स्थिति असल्यामुळें जो सुंदर पुरुष राजदरबारीं येणार आहे त्यास केव्हां पाहीन अशी तिची स्थिति होऊन ती गोष्ट तिनें आपल्या दासीस कळविली. तेव्हां दासी ह्मणाल्याः—तो सुंदर पुरुष तुमच्या नजरेस पडेल अशी तजवीज आह्मी करूं. परंतु ज्या रस्त्यानें तो रा-

दरबारीं येणार त्या रस्त्यावर आपणांस जाऊन राहिलें पाहिजे. नाहींतर तो एकदां राणीच्या ताब्यांत गेला ह्मणजे आपणांस पाहावयास सांपडणार नाहीं. दासींचें हें भाषण ऐकतांच **हसनापरी** ह्मणालीः—तुह्मी सांगतां ही गोष्ट होणें दुरापस्त आहे; कारण, नुसतें घरांतून बाहेर जावयाचें असलें ह्मणजे आईबापाची परवानगी जर घ्यावी लागते तर मग तेथें जाऊन राहण्यास काय निमित्त सांगावें? **हसनापरी**चें हें भाषण ऐकून दासी ह्मणाल्याः—तुह्मी आपल्या आईबापांची कांहीं दिवस हवाखाण्या करितां बागांत जाऊन राहण्याची परवानगी घ्या, ह्मणजे आपलें काम होईल. दासींचें हें भाषण **हसनापरीस** मान्य होऊन ती आपल्या आईबापाकडे गेली आणि बागांत जाऊन राहण्याची परवानगी मागूं लागली. तेव्हां विशेष हरकत न घेतां त्यांनीं तिला जावयास सांगितलें.

नंतर **हसनापरी** आपल्या सख्यासह बागेंत रहावयास जात असतां दासींस ह्मणालीः—सख्यानों, तो सौन्दर्यवान् मानव माझ्या केव्हां दृष्टीस पडेल असें होऊन गेलें आहे. तेव्हां दासी ह्मणाल्याः—समुद्र किनाऱ्यावरचे रखवालदार त्या मनुष्यास राजदरबारीं घेऊन येण्याच्या अगदीं तयारींत आहेत असें आमच्या ऐकण्यांत आलें आहे. हें दासींचें भाषण ऐकून **हसनापरीनें** बागेंत जाण्याचा बेत रहित केला व ती सर्व परिवारासह समुद्र किनाऱ्यास आली, आणि सुस्थळ पाहून तेथें तिनें आपला तंबू ठोकला. इतक्यांत थोडे अंतरावर कांहीं मनुष्यें उभीं असल्याचें तिच्या दृष्टीस पडल्यावरून तिनें आपल्या एका दासीस त्या मनुष्यांचा तपास करावयास पाठविलें. त्या प्रमाणें दासी जाऊन तपास करून आली आणि **हसनापरी**स ह्मणालीः—समुद्रकिनाऱ्यावरचे रखवालदार त्या सुंदर मनुष्यास राणीकडे घेऊन जाण्याकरितां निघाले आहेत. परंतु बाईसाहेब, जेव्हां मी त्या मनुष्यास पाहिला तेव्हां 'पौर्णिमेचा सर्व कलानीं परिपूर्ण असा प्रत्यक्ष चंद्रच आकाशांतून उतरला कीं काय?' असा मला भास झाला. हें दासींचें भाषण ऐकून **हसनापरीस** त्या मनुष्यास

केव्हां पाहीन असें होऊन गेलें. नंतर ती दासीस ह्मणाली:—सख्यांनो तो मनमोहक मदनपुतळा माझ्या दृष्टीस लौकर पडेल असें करा. हें तिचें भाषण ऐकून त्या सर्व दासी ह्मणाल्या:—बाई साहेब, तुह्मी कोणत्याही रीतीची काळजी न करितां स्वस्थ असा. ते पहारेकरी त्या मनुष्यास कोणत्या रस्त्यानें घेऊन जातात याची टेहळी ठेवून रात्रीच्या वेळीं मुक्कामावर ते सर्व निजले ह्मणजे आह्मी त्या मनुष्यास आपलेकडे घेऊन येऊं. इतकें बोलणें झाल्यावर त्या स्वस्थ राहिल्या.

नंतर जेव्हां पहारेकरी **हातिमास** घेऊन ज्या ठिकाणीं **हसनापरी** उतरली होती तेथें आले, तेव्हां संध्याकाळ झाली होती ह्मणून त्यांनीं तेथेंच वस्ती केली. पुढें मध्यरात्रीच्या सुमारास ते सर्व पहारेकरी निजले आहेत असें पाहून **हसनापरीच्या** दासी त्यांजवळ गेल्या आणि त्या सर्वांवर मोहनी अस्त्राचा प्रयोग चालवून **हातिमास** निजलेलाच उचलून घेऊन आल्या तेव्हां निजलेल्या स्थितींच **हातिमाचें** रूप पाहून **हसनापरी** कामज्वराच्या योगानें अगदीं व्याकुळ झाली. नंतर कांहीं वेळ गेल्यावर जेव्हां **हातीम** जागा झाला तेव्हां आपण एका सुंदर बगीच्यांत आहों असें पाहून त्यास अतिशय आश्चर्य वाटलें. इतक्यांत **हसनापरी** पुढें होऊन हात जोडून ह्मणाली:—हे ममचित्तहारका मानवा, तुझी सौंदर्याची कीर्ती माझ्या कांनीं आल्यावरून तुला केव्हां पाहीन असें मला होऊन गेलें होतें. परंतु ह्या दासींच्या साह्यानें ती माझी **मनीषा** सफल झाली. असो, आतां आपणाजवळ माझें इतकेंच मागणें आहे कीं, आपल्या दर्शनानें मला जी कामेच्छा झाली आहे ती आपण पूर्ण करावी. **हसनापरीचें** हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणाला:—तुझी इच्छा मी पूर्ण करीन. परंतु ज्या कामाकरितां मी इतका लांबीचा प्रवास केला आहे त्या कामास तूं मदत करावीस. **हातिमाचें** हें भाषण ऐकून **हसनापरी** ह्मणाली:—अशा कोणत्या कामाकरितां आपण इतक्या लांबीचा प्रवास केलात व कोणत्या कामांत माझी आपणास मदत पाहिजे तें मला कळवा. तेव्हां **हातीम** ह्मणाला:—ह्या

सर्व प्रदेशाची स्वामिनी जी **माहपरी** नामक **गंधर्वकन्या** तिजजवळ जो '**शाहामोरा**' नांवाचा हिरा आहे तो नेण्याकरितां मी आलों आहें. हें त्याचें भाषण ऐकून **हसनापरी** ह्मणाली:—हे सौंदर्यवान पुरुषा, तो हिरा प्राप्त करून ध्यावयाची जी तुमची इच्छा आहे ती तुह्मी सोडून द्या. कारण, महाप्रतापी **गंधर्वस्त्री** जी **मसनापरी** तिची जरी मी **हसनापरी** नामक कन्या आहें, तरी सुद्धां मला तो हिरा प्राप्त होणें कठीण आहे. इतकेंच नव्हे तर तो हिरा देवादिकांसही मिळणें मुष्कील आहे. यास्तव तुह्मी तो नाद सोडून मजसमागमें सुखानें वास करा. आतां जर आपल्या मानवी कल्पनेनें युक्तिप्रयुक्ती करून तो हिरा प्राप्त होण्यासारखा असला तर खुशाल ती तजवीज करून पहावी. माझा कोणत्याही गोष्टीविषयीं ना नाहीं. सारांश, असें मोहक व चातुर्यपर भाषण करून तिनें **हातिमास** आपल्याजवळ राहून घेतलें.

नंतर दुसरे दिवशीं सकाळीं **हातिमास** राजदरबारीं घेऊन जाणारे पहारेकरी जागे होऊन पहातात, तो **हातीम** कोठेंही नाहीं. हें पाहून त्यांस अतिशय वाईट वाटलें. कारण, ही गोष्ट जर त्यांच्या स्वामिनीला कळली तर 'ती त्यांस देहांत शासन दिल्याशिवाय कधींही राहती ना' हें ते जाणत होते. पुढें आसपास बऱ्याच ठिकाणीं शोध केल्यावर जेव्हां त्याचा पत्ता लागेना तेव्हां कोणीतरी गंधर्वकन्येनें त्याच्या स्वरूपास लुब्ध होऊन त्यास पळवून नेला असावा असा त्यांनीं तर्क केला. नंतर सर्वांनीं आपापसांत असा ठराव केला कीं, आणखी पुष्कळ ठिकाणीं शोध करून जर तो मानव सांपडला तर झालेली गोष्ट कोणासही नकळवितां मुकाट्यानें त्याची राजदरबारीं रवानगी करावी. परंतु पुष्कळ शोध करूनही जर त्याचा शोध लागला नाहीं तर आपल्या ठिकाणीं जाऊन स्वस्थ बसावें असा त्यांनीं निश्चय केला.

इकडे पुष्कळ दिवस झाले तरी तो मानव येत नानीं असें पाहून **महापरीराणीनें** आपला एक जासूद समुद्रकिनारीं शोध करण्याकरितां रवाना केला. त्याप्रमाणें जासूदानें समुद्रकिनारीं जाऊन

शोध करून **महापरीस** असें कळविलें कीं, 'समुद्र किनाऱ्यावर पहारेकऱ्यांनीं त्या मनुष्याची मोठ्या थाटामाटानें रवानगी केल्याला आज पुष्कळ दिवस झाले असून अजूनपर्यंत ज्या अर्थीं तो इकडे येऊन पोंहचला नाहीं त्याअर्थीं त्याची वाट काय झाली हें आह्मांस ठाऊक नाहीं. 'असें ते ह्मणतात जासुदाच्या तोंडचे शब्द ऐकतांच **महापरीस** अतिशय संताप येऊन तिनें आपल्या सेनापतीस जिकडेतिकडे त्या मानावाचा शोध करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो सेनापती ठिकाठिकाणीं तपास करीतअसतां **हातिमास** राजदरबारीं घेऊन येणारा एक पहारेकरी त्यास मिळाला. तेव्हां त्यानें त्या पहारेकऱ्याची राजदरबारीं रवानगी केली. नंतर **महापरीनें** त्या मानवाविषयींचा खरा मजकूर न सांगिल्यास देहांत शासन करीन अशी त्या पहारेकऱ्यास दहशत घातली. तेव्हां तो कांपत कांपत ह्मणालाः—राणीसरकार, जर मला जीवदान द्याल तर त्या मनुष्याच्या संबंधानें मला जी माहिती आहे ती मी आपणास सांगेन. राणीनें ती गोष्ट मान्य केल्यावर तो पहारेकरी ह्मणालाः—समुद्र—किनाऱ्यावरच्या रखवालदारांनीं त्या मनुष्यास आपणाकडे घेऊन येण्याकरितां आमच्या स्वाधीन केल्यावर मजल दरमजल करीत करीत कित्येक दिवस पर्यंत प्रवास करीत असतां एके दिवशीं एका बागेच्या आश्रयानें आह्मी वस्तीस राहिलों असतां तो मनुष्य नाहींसा झाला. आतां इतकें मात्र खरें कीं, तो मनुष्य स्वतः होऊन कधींही पळावयाचा नाहीं. कारण त्याच्या मनांतून आपली भेट घेण्याचें फार होतें. तथापि जेव्हां तो नाहींसा झाला त्यावरून कोणीतरी गंधर्वकन्येनें त्याच्या स्वरूपास लुब्ध होऊन त्यास पळविलें असावें. पुढें दुसरे दिवशीं आह्मी सर्वांनीं त्याचा पुष्कळ शोध केला; परंतु थांग लागेना; तेव्हां निराश होऊन आपल्या भीतीस्व नाहींसे झालों. हें त्या पहारेकऱ्याचें भाषण ऐकून तिनें आपल्या सेवकांस आज्ञा केली कीं, त्या मनुष्याचा शोध लागेपर्यंत ह्या मनुष्यास कैदेंत ठेवा. नंतर सेनापतीस बोलावून त्या मनुष्याचा शोध करण्यास त्यास सांगितलें.

या गोष्टीस तीन महिने लोटल्यावर समुद्र—किनाऱ्यावरचा एक

पहारेकरी ज्या बागेंत **हसनापरी** रहात होती त्या बागेंत कोणास नकळत शिरला व एका कोपऱ्यास लपून राहिला. पुढें कांहीं वेळानें ती **हसनापरी हातिमा**च्या हातांत हात घालून हिंडतांना त्यानें पाहिली. त्यावरून **हातिमास** चांगलें ओळखून तो त्याजवळ गेला आणि **हसनापरीस** ह्मणाला:—ज्या मनुष्याला स्वामिनीच्या आज्ञेवरून आह्मीं राजदरबारीं घेऊन जात होतों त्या मनुष्याच्या स्वरूपास लुब्ध होऊन त्याला गफलतीनें पळवून येथें आणून त्याजसमवेत विलासादि क्रिडा करण्यांत गुंग झालीस. हें काम तूं चांगलें केलें नाहींस. असो, आतां हा मजकूर मी आपल्या स्वामिनीस कळवितों; ह्मणजे ती तुझें यथायोग्य पारिपत्य करील. हें त्या पहारेकऱ्याचें भाषण ऐकून **हसनापरीनें** आपल्या कित्येक दासींस हांक मारून त्यांस त्या पहारेकऱ्यांस पकडून कैद करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें दासी त्या पहारेकऱ्यास धरूं लागल्या परंतु तो त्याच्या हातून मोठ्या शिताफीनें सुटून पळून गेला.

**हसनापरी**च्या बागेंतून तो पहारेकरी पळाल्यानंतर कांहीं दिवसानीं आपल्या स्वामिनीकडे गेला आणि दरबारांत जाऊन हात जोडून ह्मणालाः— **स्वामिनी,** आपल्या आज्ञेप्रमाणें समुद्र—किनाऱ्यावर सांपडलेल्या मनुष्यास आह्मी घेऊन येत असतां एका मुक्कामावर तो नाहींसा झाला. पुढें बरेच दिवस त्या मनुष्याचा आह्मीं बारकाईनें तपास केला, परंतु कांहींच पत्ता लागला नाहीं. या मुळें आपल्या भीतीस्तव आह्मी पळून गेलों होतों. परंतु आज चार दिवसांच्या मागें मी एका बागेंत सहज रित्या गेलों असतां त्या बागेंत आपली मुख्य दासी जी **मसनापरी** तिची लावण्यवतिका कन्या **हसनापरी** ही रहात असून त्या मनुष्याबरोबर सहल करतांना पाहिली. त्या वरून मी तिजजवळ जाऊन त्या मनुष्यास आपलेकडे घेऊन येण्याकरितां मागूं लागलों. तेव्हां तिला अतिशय राग आला; आणि आपल्या दासींस मला कैद करण्याविषयीं तिनें हुकूम केला. परंतु मी त्या दासींच्या हातून मोठ्या शिरस्तीनें सुटून आपल्याकडे येऊन ही घडलेली हकीगत सेवेंत सादर केली आहे.

पहारेकऱ्याचें हें भाषण ऐकतांच **महापरीनें** आपल्या सेनापतीस **मसनापरी**ला ही झालेली हकीगत कळवून चतुर्भुज करून आणण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें सेनापतीनें जाऊन तिच्या घराभोंवतीं सैन्याचा वेढा घालून तिला पकडलें व सर्व हकीगत निवेदन केली. तेव्हां ती फारच विस्मित होऊन ह्मणाली:—माझी मुलगी **हसनापरी** ही आज चार महिन्यामागें बागेंत राहण्याकरितां ह्मणून निघून गेली. परंतु तिनें आह्मांस हें कृत्रीम मुळींच कळविलें नाहीं. असो जें झालें तें झालें. असें ह्मणून ती सेनापतीस बरोबर घेऊन आपल्या बागांत गेली, तों **हसनापरी** ही **हातिमा**बरोबर एका पुष्पशय्येवर बसून गोष्टी बोलत आहे असें तिनें पाहिलें. तेव्हां तिला अतिशय क्रोध येऊन त्या क्रोधाच्या आवेशांत तिनें **हसनापरी**च्या एक श्रीमुखांत लगाविली आणि घडलेली सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून **हसनापरी**चा चेहरा अगदीं उतरून जाऊन एक शब्दही तोंडावाटे निघेनासा झाला. नंतर **मसनापरीनें हसनापरी**स व **हातिमास** सेनापतीच्या स्वाधीन केलें; आणि आपल्या कुटुंबांतील सर्व मनुष्यांस बरोबर घेऊन ती राजदरबारीं येण्यास निघाली.

पुढें एक दोन दिवसांनीं ते सर्व लटंबर राजदरबारीं आल्यावर सेनापती हात जोडून **महापरीस** ह्मणाला:—हे **स्वामिनी**, आपल्या आज्ञेप्रमाणें **मसनापरीस** व **हसनापरीस** आणि त्या मानवास पकडून आणलें आहे. आतां आपल्या मर्जीनुरूप जो हुकूम करणें असेल तो या दासास करावा. सेनापतीचें हें भाषण ऐकून **महापरीनें** त्यास **हसनापरी**च्या बापास बोलावून आणण्यास सांगितलें. त्याप्रमाणें सेनापतीनें त्याजला आणून दरबारांत हजर केला. नंतर **महापरी, मसनापरी**स व तिच्या नवऱ्यास ह्मणाली:—तुह्मांला ह्या गोष्टीच्या संबंधानें जी खरी हकीगत माहीत असेल ती सांगा. तेव्हां तीं उभयतां ह्मणालीं;—हे **स्वामिनी**, आमची कन्या **हसनापरी** ही आज सुमार चार महिन्याच्यामागें आमच्या परवानगीनें बागेंत राहण्याकरितां मात्र गेली होती, एवढेंच कायतें आह्मांला ठाऊक आहे. ह्या शिवाय आपल्या पायांची शपथ आह्मांस

कांहींएक ठाऊक नाहीं. हें त्यांचें भाषण ऐकून **महापरी** ह्मणाली:—तुह्मी जी खरी हकीगत सांगितलीत त्यावरून तुह्मीं निर्दोषी आहांत अशी माझी खात्री झाली. परंतु हें सर्व खटलें उपस्थित होण्यास मुख्य कारण जो मानव त्याजला माझ्या समोर आणून उभें करा. हें तिचें भाषण ऐकतांच सेवकांनीं **हातिमास** आणून तिच्या पुढें उभें केलें. तेव्हां त्याचें सुस्वरूप पाहून **महापरीला** आलेला सर्व राग विरघळून गेला व तिनें त्याला आपल्या शेजारीं एका **सिंहासनावर** बसावयास सांगितलें. नंतर ती ह्मणाली:—हे मानवा, तूं आपला देश सोडून ह्या आमच्या राज्यांत महत्संकटें सोसून कां आलास तें मला सांग. **महापरीचें** हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणाला:—राक्षसाचा राजा जो '**फारोक्याश**' त्याच्या मुखानें आपली कीर्ति ऐकली ह्मणून कांहीं दिवसपर्यंत आपल्या सेवेंत काळक्रमणा करावी, या उद्देशानें मी येथें आलों आहें. हें ऐकून **महापरी** ह्मणाली:—हे मानवा, आमच्या राज्यांत येण्याचा रस्ता तुला कोणी दाखविला? **हातीम** ह्मणाला:—मी आपल्या राज्यांत येण्याची इच्छा जेव्हां त्याला दर्शविली, तेव्हां त्यानें आपले कांहीं लोक मला पोंचविण्या करितां दिले. नंतर **महापरीनें** '**फारोक्याश**' राजाची व तुमची इतकी मैत्री कोणत्या कारणावरून झाली' असें विचारल्यावरून **हातिमानें** तेथें केलेल्या वैद्यकीविषयीचें सर्व वर्तमान तिला निवेदन केलें. तें ऐकतांच **महापरी** हर्षित होऊन ह्मणाली:— तुह्मीं सांगितलेल्या एकंदर हकीगतीवरून माझें जें महत्वाचें काम आहे तें आपल्या हातून सिद्धिस जाईल असें वाटतें. कारण मनुष्यजात ही सर्व प्राण्यांपेक्षां बुद्धिमान व चतुर असून **पैगंबराप्रमाणें** राक्षस व गंधर्व यां पेक्षां ही श्रेष्ठ आहे. तस्मात् आपल्या हातून माझा कार्यभाग होईल असें मला खचित वाटतें.

**महापरीचें** हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणाला:—असें तुझें महत्वाचें काम काय आहे, तें मला सांग. तेव्हां **महापरी** दुःखाचा सुस्कारा टाकून ह्मणाली:—हे मानवा, माझा मुलगा सर्व गुणसंपन्न असून पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें सतेज व मदनासारखा सौंदर्यवान्

आहे. परंतु प्रस्तुत त्याच्या डोळ्यांस एका प्रकारचा रोग झाल्यावरून त्यांतून नेहमी पाणी गळतें व वेदना होतात त्यामुळें तो आपल्या जिवाला अगदीं त्रासून गेला असून आंथरुणाला खिळला आहे. तरी कृपा करून जर काहीं औषधोपचार करून त्याचे डोळे बरे करशील तर तूं जें मागशील तें देईन. **महापरीचें** हें भाषण ऐकून **हातिमानें** तिच्या पुत्राचे डोळे बरे करण्याविषयीं तिला वचन दिलें. परंतु इतक्यांत रात्र झाली ह्मणून **महापरी** सर्व दरबार बरखास्त करून **हातिमास** बरोबर घेऊन आपल्या महालांत गेली. नंतर तिनें कांहीं सेवक त्याच्या तैनातीस देऊन त्यांस जेवणाखाण्याची वगैरे व्यवस्था उत्तम प्रकारची ठेवण्या विषयीं सांगितलें.

पुढें दुसरे दिवशीं सकाळीं **महापरी, हातिमास** बरोबर घेऊन आपल्या पुत्राच्या खोलींत गेली, तों तो निस्तेज होऊन अगदीं अंथरुणावर पडला होता. हें पाहून **हातिमानें अस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं पाण्यांत उगाळून तें पाणी त्याच्या डोळ्यांस लाविलें. तेव्हां काहीं वेळानें डोळ्यांस होणाऱ्या वेदना बंद होऊन पाणी गळेनासें झालें. परंतु त्यास मुळींच दिसेना हें पाहून **महापरी** ह्मणालीः—सर्व इंद्रियांत नेत्र श्रेष्ठ आहेत. व जगिक सर्व क्रिया त्याच्याच साह्यानें होतात. सबब त्यांच्या विषयीं काळजी घेणें विशेष अगत्याचें आहे. आतां आपल्या औषधानें वेदना व पाणी वहावयाचें बंद झालें; परंतु दिसत नाहीं. यास्तव कांहींतरी उपाय करावा. हें तिचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणाला;—**झलमत** नांवाच्या अरण्यामध्यें '**नादर**' ह्या नांवाचा एक वृक्ष आहे. त्या वृक्षापासून एका प्रकारचा रस निघत आसतो. त्याचे जर दोन थेंब आणवाल तर मी ह्या तुमच्या मुलाचे डोळे चांगले बरे करितों. हें ऐकून **महापरीनें** ताबडतोब आपल्या शहरांत दंवडी पिटविली कीं, "जो कोणी **झलमत** अरण्यांत जाऊन **नादर** झाडाचा थोडासा चीक आणील त्यास इच्छेनुरूप बक्षिस मिळेल." ही दौंडी ऐकून घरोघरीं विचार करूं लागले कीं, **झलमत** अरण्यामध्यें जाणें मोठ्या मुष्किलीचें आहे. कारण त्या अरण्यामध्यें जो **नादरवृक्ष**

आहे, त्याच्या संरक्षणार्थ हजारो **ब्रह्मराक्षस** व भुतें अगदीं तत्पर असतात; व त्यांच्यापुढें आमचें कांहींच शहाणपण चालत नाहीं. तेव्हां ही गोष्ट व्हावी कशी? असा ते विचार करूं लागले.

ह्या गोष्टीस एक दोन दिवस गेल्यावर एके दिवशीं **हसनापरी, महापरी**च्या महालांत गेली आणि ह्मणाली:—जर तुह्मीं माझ्याहातून घडलेला सर्व अपराध क्षमा करून ह्या मानवास पुनः माझ्यास्वाधीन कराल तर मी **झलमत** अरण्यांत जाऊन हरप्रयत्नानें **नादर** झाडाचा चीक आणतें. हें तिचें भाषण ऐकून **महापरी** ह्मणाली:—तुझे अपराध मी अंतःकरणपूर्वक क्षमा करीन, परंतु ह्या मानवास तुझ्या हवालीं करण्याचें माझ्या हातीं नाहीं, कारण तो स्वतः आपला मुकूत्यार आहे. हें त्या उभयतांचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणाला:—हे **स्त्रिये,** मी तुझ्याजवळ सदोदित कधींही राहणार नाहीं. माझ्या मर्जीनुरूप लागेल तितके दिवस मी तुझ्याजवळ राहिन. ही गोष्ट जर तुला मान्य असली तर मी तुझ्या बरोबर कांहीं काळपर्यंत राहण्याचें कबूल करतों. **हातिमाचें** हें भाषण ऐकून **हसनापरीनें** तें त्याचें ह्मणणें कबूल केलें आणि **महापरी**ची आज्ञा घेऊन ती तेथून निघून गेली. नंतर बरेंच सैन्य बरोबर घेऊन ती **झलमत** अरण्याकडे जाण्याचा मार्ग—क्रमूं लागली. जातां जातां **हसनापरी**सर्व सैन्य येण्याची मार्गप्रतीक्षा न करितां मोठ्या त्वरेनें **झलमत** अरण्यांत गेली व तो प्रदेश जरी अंधारमय होता तरी **नादर** वृक्षाजवळ जाऊन तिनें त्या झाडाच्या रसाची एक बाटली भरून घेतली, आणि सर्व सैन्यासह परत येण्यास निघाली. इतक्यांत त्या वृक्षाच्या रखवालीस जे **ब्रह्मराक्षस** होते त्यांच्या नजरेस **हसनापरी** पडली. तेव्हां ते तिला धरण्याच्या उद्देशानें पाठलाग करूं लागले. परंतु **हसनापरीनें** मोठ्या वेगानें पलायन केल्यामुळें त्यांचा नाइलाज होऊन ते माघारे गेले. नंतर मजलमजलेनें सुमार दीडमहिन्यानें **हसनापरी** आपल्या सर्व परिवारासह राजदरबारीं आल्यावर तिनें ती रसाची बाटली **महापरी**च्या स्वाधीन केली. ती पाहून **महापरीस** अतिशय आनंद होऊन तिनें **हसनापरीस** राजव-

राण्यांत नेमणूक करून दिली. नंतर ती कुपी तिनें हातिमाच्या स्वाधीन केली. तेव्हां त्यानें त्या रसांत आपल्याजवळचें मोतीं उगाळून त्याचे कांहीं थेंब **महापरीच्या** मुलाच्या डोळ्यांत सोडले. परंतु कांहीं गुण आला नाहीं. पुढें सुमार आठ दिवस गेल्यावर **हातीमानें** पुनः कांहीं थेंब राजपुत्राच्या डोळ्यांत सोडले तेव्हां राजपुत्रास साफ दिसुं लागलें. हें पाहून **महापरीस** व तिच्या नवऱ्यास अतिशय आनंद झाला.

नंतर **हातिमाचे** उपकराची उतराई होण्याकरितां **महापरीनें** त्यास असंख्यात द्रव्य दिलें, तेव्हां तो ह्मणालाः—जर तूं हें द्रव्य **फारोक्याश** राजाच्या नगरा पर्यंत पोंचतें करशील तर मी ह्याचा अंगिकार करीन. कारण मी एकटा असून माझ्यानें हें सर्व द्रव्य नेववणार नाहीं. **हातिमाचें** हें भाषण ऐकून **महापरीनें** आपल्या चाकरांकडून तें द्रव्य पोंचविण्याचें कबूल केलें. नंतर **हातीम** ह्मणालाः—हें द्रव्य तूं मला दे अगर देऊं नको. परंतु पुर्वी जें तूं मला वचन दिलें आहेस त्याप्रमाणें वाग ह्मणजे झालें. **महापरीनें** तें त्याचें ह्मणणें मान्य करून इच्छितवस्तु मागण्यास सांगितलें. तेव्हां **हातीम** ह्मणलाः—तुझ्याजवळ जो **शहामोरा** नांवाचा हिरा आहे तो मला दे. हे **हातिमाच्या** तोंडचे शब्द ऐकतांच **महापरीचा** चेहरा अगदीं ऊतरला, व कांहीं वेळपर्यंत ती खालीं मान घालून स्वस्थ राहिली. नंतर थोडा वेळ गेल्यावर ती ह्मणाली; हें मानवा मी समजलें. हा हिरा **हरीथ** व्यापाऱ्याच्या कन्येनें तुजजवळ मागितला असेल? **हातीम** ह्मणाला, होय. तेव्हां **महापरी** ह्मणाली;—कांहीं हरकत नाहीं. मी तुला वचन दिल्याप्रमाणें हा हिरा तुझ्या स्वाधीन करितेंच. परंतु थोडक्या दिवसांत मी **हरीथ**व्यापाऱ्याच्या कन्येजवळून तो परत आणीन. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—जो माझा कार्यभाग होणें आहे, तो झाला ह्मणजे मग खुशाल तूं आपला हिरा घेऊन ये, माझी कांहीं हरकत नाहीं. **हातिमाचें** हें बोलणें **महापरीनें** मान्य करून आपल्या हातांतील आंगठीवर बसविलेला हिरा उखळून काढून **हातिमाच्या** आंगठी-

वर बसवून दिला. त्या बरोबर हिऱ्याच्या आंगीं जो गुण होता तो **हातिमाच्या** ताबडतोब लक्षांत आला. तो असा कीं, सर्व पृथ्वीमध्यें ज्या ज्या ठिकाणीं सोनें, रुपें, मोत्यें, हिरे व माणकें वगैरे द्रव्य गाडलेलें होतें तीं तीं ठिकाणें त्याला दिसूं लागलीं.

नंतर **महापरीची** आज्ञा घेऊन **हातीम** तेथून निघाला तो **हसनापरीच्या** महालीं आला. आणि तिजसहवर्तमान तीन चार महिनेपर्यंत काल—क्रमणा करून पुनः सर्वांची आज्ञा घेऊन तेथून निघाला. त्यावेळीं **महापरीनें**, **फारोक्याश** राजाच्या हद्दीपर्यंत **हातिमास** पोंचविण्यास व त्याला दिलेलें द्रव्य नेण्यास आपल्या पदरचे कांहीं गंधर्व शिपायी दिले. त्यांसह **हातीम** मजलेमजलेनें कांहीं दिवसांनीं **फारोक्याश** राजाच्या हद्दीपर्यंत येऊन पोहोंचला. तेव्हां ते गंधर्वशिपायी तेथून परतले. मग त्या ठिकाणीं पूर्वी **हातिमास** घेऊन आलेले जे **राक्षस** होते, त्यांनीं त्यास विमानांत बसवून अपल्या राजाकडे नेलें. नंतर **हातिमानें** घडलेलें सर्व वर्तमान **फारोक्याश** राजास निवेदन केलें. तें ऐकून त्यास मोठें नवल वाटलें. पुढें एक दोन दिवस पाहुणचार झाल्यावर **हातीम** तेथून निघाला. तेव्हां **फारोक्याश** राजानें आपले कांहीं लोक त्यास विवरद्वारा पर्यंत पोंचवावयास दिले. नंतर मजलेमजलेनें विवरद्वाराजवळ येतांच त्यानें त्या **राक्षसांस** परत जावयास सांगितलें आणि आपण **सुरी** शहरांतील ज्या धर्म शाळेंत **नाईम** राहिला होता तेथें गेला. उभयतांचें क्षेम कुशल झाल्यावर **गंधर्वकन्येनें** दिलेलें सर्व द्रव्य **हातिमानें** त्यास बक्षिस दिलें. नंतर तो तेथून निघून **हारीथ** सावकाराच्या घरीं गेला आणि त्याच्या **कन्येची** भेट घेऊन त्यानें तो शहामोरा हिरा तिच्या स्वाधीन केला. तो पाहतांच **सावकारकन्येचा** आनंद त्रिभुवनांत मावेनासा होऊन ती **हातिमास** ह्मणालीः—तुमच्या व आमच्या पूर्वींच्या ठरावाप्रमाणें तुह्मीं माझ्या तिन्हीं प्रश्नांचा उलगडा कलात. तरी कराराप्रमाणें आतां मी तुमची झालें. सबब या दासीस जी काय आज्ञा करणें असेल ती करावी.

हें तिचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—हे **सावकारकन्ये**, मी

जीं तुझ्या प्रश्नाचीं उत्तरें आणलीं तीं तूं मला स्वतःला प्राप्त व्हा-वसि या करितां नसून '**नाईम**' या नांवाचा मनुष्य तुझ्या विर-हानें दुःखित होऊन या शहरांतील एका धर्मशाळेंत राहिला आहे, त्याजकरितांच ही सर्व खटपट आहे. तरी तूं आतां विलंब न ला-वतां आपल्या बापाला बोलावून त्यास हा सर्व मजकूर विदित कर व **नाईमास** मोठ्या थाटानें धर्मशाळेंतून आणून या देशाच्या रितीप्रमाणें तुम्ही दोघेंही विवाहरज्जूनें बद्ध व्हा. **हातिमाचें** हें भाषण ऐकतांच **हारिथकन्येनें** आपल्या बापास झालेलें सर्व वर्त-मान निवेदन करून **नाईमास** आणावयास सांगितलें. त्याप्रमाणें **नाईम** येतांच त्या देशाच्या चालीप्रमाणें **काजीनें** चार लोकां समक्ष त्या उभयतां वधूवरांचें लग्न लाविलें. पुढें चार दिवस सुख-सोहळा झाल्यावर **हातीम** आपल्या कार्य-सिध्यर्थ जाऊं लागला; परंतु **नाईमाचा** आणखीं कांहीं दिवस राहण्याविषयीं विशेष आ-ग्रह झाल्यामुळें त्यानें आपला जाण्याचा बेत रहित केला. पुढें **नाईमाचें** लग्न झाल्याला दहा दिवस पूर्ण होतांच **हारिथकन्येज-**वळचा **शहामोरा** हिरा नाहींसा झाला. तेव्हां ती अतिशय शोक करूं लागली. परंतु **हातिमानें** तिची समजूत केली कीं, हे **साव-कारकन्ये**, तुझ्या जवळ अतोनात द्रव्य असतां आणखीं द्रव्य प्राप्त व्हावें या इच्छेनें तूं तो **शहामोरा** हिरा आणविलास. पण परमेश्वराच्याच मनांतून तुझी इच्छा सफल होऊं न देण्याचें अस-ल्यामुळें तो हिरा तुझ्या जवळून नाहींसा झाला. तरी त्याचा आतां व्यर्थ शोक करण्यांत काय अर्थ? अशा तऱ्हेनें **हातिमानें** तिची समजूत केल्यामुळें तिनें शोकत्याग केला. नंतर एक दोन दिवसांनीं **हातीम** सर्वांची रजा घेऊन तेथून निघाला.

दरकूच दरमजल करीत करीत बरेच दिवस गेल्यावर एके दि-वशीं तो एका नदीकिनाऱ्यानें जात असतां एक मोठा संगमरवरी वाडा त्याच्या दृष्टीस पडला. त्या वाड्याच्या दरवाज्यावर "**चां-गलें करा आणि पाण्यावर टाका.**" असें लिहिलें होतें. तें पाहून **हातिमास** अतिशय आनंद होऊन तो त्या वाड्याच्या दरवाज्याजवळ जाऊन उभा राहिला. इतक्यांत कांहीं चाकर

मनुष्यें बाहेर आलीं आणि **हातिमास** आंत घेऊन गेलीं. **हातीम** आंत जात आहे तोंच दिवाणखान्यांतील मुख्य **सिंहासनावर** बसलेला एक **वृद्ध** व तेजस्वी **पुरुष** बाहेर येऊन **हातिमाचा** हात धरून त्यास आंत घेउन गेला, आणि त्यानें त्यास एका **सिंहासनावर** बसण्यास सांगितलें. पुढें कांहीं वेळपर्यंत उभयांचेंही कुशलवृत्त होत आहे तोंच भोजनाची सर्व सिद्धता झाल्याची वर्दी चाकरांनीं दिली. तेव्हां तो **वृद्ध** मनुष्य **हातिमास** अतिशय आग्रह करून जेवावयास घेऊन गेला. नंतर कांहीं वेळानें भोजन वगैरे आटपल्यावर ते उभयतांही आपआपल्या जागीं येऊन बसल्यावर **हातीम** ह्मणालाः—हे पुण्यपुरुषा, आपण ह्या वाड्याच्या दरवाज्यावर जें वाक्य लिहिलें आहे त्याचा अर्थ कळावा अशी मला इच्छा झाली आहे. **हातिमाचें** हें भाषण ऐकून तो **वृद्धपुरुष** ह्मणालाः—ज्या वेळेस मी आपल्या पूर्ववयांत होतों, त्यावेळेस मोठा चोर असून इष्ट, मित्र, राजा, इत्यादिकांच्या घरावर दरोडे घालून त्यांचें वित्त हरण करीत असें. तथापि माझा नित्यनियम असा होता कीं, चोरी करून आल्यावर स्नान करून शुचिर्भूत होऊन पाकनिष्पत्ति करावी आणि त्या अन्नापैकीं कांहीं भाग पाण्यांत टाकावा. ह्याप्रमाणें माझा नित्यक्रम चालला असतां कांहीं दिवसांनीं मी आजारी पडलों. पुढें एके दिवशीं मला असा **भ्रम** झाला कीं, दंडधराच्या सैन्यांतील कांहीं **भेसूर** दैत्य येऊन ते मला घेऊन नर्ककुंडाजवळ गेले. आणि त्या कुंडांत टाकण्याचा बेत करूं लागले. इतक्यांत **दिव्यदेही** असें कांहीं देवदूत येऊन ते मला त्या विक्राळ यमदूतांपासून सोडवून स्वर्गलोकीं घेऊन गेले. तेथें एक **दिव्यदेही पुरुष** उभा होता; तो त्या दूतांस ह्मणालाः—तुह्मी या मनुष्यास व्यर्थ आणलेंत. ह्याचें आयुष्य अजून शंभर वर्षें आहे. कारण ह्यानें सर्व दानांत उत्तम जें अन्नदान तें केलें आहे. यास्तव याला घेऊन जाऊन ह्याच्याच नांवाचा जो दुसरा मनुष्य आहे त्याला घेऊन या. हें त्या **दिव्यपुरुषाचें** भाषण ऐकतांच ते दूत मला माझ्या घरीं पोंचवून निघून गेले. नंतर कांहीं वेळानें हा चित्तभ्रम नाहींसा झाल्यावर मी **परमेश्वराची** अनन्य

भावानें प्रार्थना केली. पुढें त्या दुखण्यांतून बरा झाल्यावर पूर्व क्रमाप्रमाणें मी अन्न तयार करून नदींत टाकण्याकरितां गेलों असतां एक मोहोरांनीं भरलेली पिशवी सांपडली. ती घेऊन मी आपल्या घरीं आलों, आणि "कोणाच्या मोहोरा सांडल्या असल्यास त्या त्यानें येऊन घेऊन जाव्या." अशी जिकडे तिकडे दौंडी पिटविली. परंतु कोणीही मनुष्य मजकडे आला नाहीं. तथापि कांहीं दिवसांनीं तरी मोहोरांचा धनी येऊन तो त्या घेऊन जाईल अशा हेतूनें मी त्या जपून ठेविल्या. नंतर दुसरे दिवशीं जेव्हां मी नदींत अन्न टाकण्यास गेलों तेव्हांही आदले दिवसाप्रमाणेंच मोहोरांची थैली सांपडली. तीही मी आपल्या घरीं नेऊन ठेविली. पुनः तिसरे दिवशींही त्याप्रमाणेंच झालें. याप्रमाणें दहा-दिवस पर्यंत एक सारख्या मोहोरांच्या थैल्या सांपडल्यावर त्या दिवशीं रात्रीं एक **सिद्ध** पुरुष स्वप्नांत येऊन ह्मणालाः—अरे मनुष्या, "तूं करीत असलेल्या अन्नदानें करून **परमेश्वर** संतुष्ट होऊन त्यानें प्रतिदिवशीं एक एक मोहोरांची थैली तुला देण्याविषयीं आह्मांस आज्ञा केल्यावरून त्या आह्मी तुला देत आहों. तरी स्वतःच्या खर्चा पुरतें द्रव्य ठेवीत जाऊन बाकीचें दानधर्म करण्या कडे खुशाल त्याचा व्यय करीत जा." अशा रीतीचें स्वप्न पाहिल्यावर मी जागा झालों. नंतर **परमेश्वाराची** अनन्य भावानें स्तुति केली. पूढें कांहीं दिवसांनीं मी हा वाडा बांधून त्याच्या दरवाज्यावर तुह्मी वाचलेलें वचन लिहिलें. हल्लींही मला पूर्वीं प्रमाणेंच प्रत्यहीं मोहोरांची थैली सांपडत असून स्वतःचा खर्च भागून जें द्रव्य शिल्लक राहतें तें दानधर्म करण्यांत मी खर्च करीत असतों.

ही त्या वृद्ध मनुष्यानें सांगितलेली सर्व हकीगत ऐकून परमेश्वराच्या अगम्य लीलेचें त्याला मोठें आश्चर्य वाटलें. पुढें एक दोन दिवस तेथें राहिल्यावर **हातीम** त्या वृद्ध मनुष्याची रजा घेऊन **शहाबादेस** येण्याकरितां निघाला. जातां जातां कांहीं दिवसांनीं एक कृष्ण वर्णाचा व दुसरा पिंवळ्या वर्णाचा असें दोन **सर्प** परस्परांशीं मोठ्या निकरानें भांडतांना त्यानें पाहिलें. त्या दोन

**सर्पां**पैकीं काळा **सर्प** बळानें जास्त असून तो पिंवळ्या **सर्पास** ठार मारण्याच्या अगदीं बेतांत आला होता. हें पाहून धांवत धांवत त्याच्याजवळ गेला. तेव्हां काळा **सर्प** तेथून पळून गेला. परंतु पिंवळ्या वर्णाचा **सर्प** विव्हळ झालेला असल्यामुळें **हातिमा**-कडे दीन मुद्रेनें पाहूं लागला. हें पाहून **हातीम** ह्मणालाः—हे ईश्वरीप्राण्या, भिऊं नकोस. मी तुझें संरक्षण करण्याकरितां आलों आहे; असें ह्मणून तो तेथेंच उभा राहिला. पुढें कांहींवेळ गेल्या-वर त्या **सर्पा**स जराशी हुशारी आली. त्या बरोबर त्याची ती काया पालटून तो एक सुंदर पुरुष बनला. हा विलक्षण प्रकार पाहून **हातिमा**स अतिशय आश्चर्य वाटलें. इतक्यांत तो पुरुष **हातिमा**च्या पांयां पडून ह्मणालाः—**महारा**ज आपल्या येण्यानें माझें प्राण वांचलें. नाहीं तर मी आज ठार मेलों असतों. हें त्याचें भाषण ऐकून **हातिमा**नें तो कृष्ण **सर्प** कोण होता व तो कां प-ळाला, याचें कारण त्यास विचारलें. तेव्हां तो ह्मणालाः—**महाराज,** मी एका गंधर्व राजाचा पुत्र असून तो कृष्ण **सर्प** माझ्या बापाचा चाकर आहे. परंतु त्याचें व माझें अतिशय हाडवैर अस-ल्यामुळें त्यानें आज संधी साधून जादूच्या योगानें मला **सर्पाचे** रूप दिलें; व आपणही **सर्प** बनून मला मारण्यास प्रवृत्त झाला. असो, आतां आपल्या योगानें माझे प्राण वांचले आहेत, तरी येथून जवळच माझें घर आहे तेथें आपण याल तर मजवर मोठे उपकार होतील. हें त्याचें ह्मणणें **हातिमा**नें मान्य केलें व ते दोघेही तेथून निघून घरीं गेले. पुढें एक दोन दिवस मेजवान्या झोडल्यावर **हातीम, शहाबादे**स जाण्याकरितां निघाला; परंतु इतक्यांत तो दुष्ट चाकर सांपडल्यामुळें गंधर्व **राजपुत्रा**नें त्यास **हातिमा**समक्ष सुळीं दिलें. नंतर **हातीम** मजल दरमजल करीत करीत **शहाबादे**स पोंचल्यावर धर्मशाळेंत जाऊन **शहाजादा-मुनीर** यास भेटला; व सर्व हकीगत निवेदन करून दुसरे दि-वशीं ते उभयतांही **बानू**कडे गेले. **हातीम** विजयी होऊन आला हें पाहून **बानू**स अतिशय आनंद झाला; व ती आपल्या प्रश्नाचें उत्तर ऐकण्यास अगदीं तत्पर झाली. हें पाहून **हातिमानें,** श-

**हाबाद** सोडल्यापासून सर्व इत्थंभूत वर्तमान तिला निवेदन केलें. तें ऐकून **बानूस** अतिशय आनंद होऊन तिनें त्या दोघांसही दोनतीन दिवस आपणाकडे राहवून घेतलें. नंतर **हातीम** जावयास निघाला तेव्हां **बानू** ह्मणाली:—माझ्या दोन्ही प्रश्नांचा तर तुह्मी निकाल केलातच. आतां एक मनुष्य आपल्या स्वतःच्या अनुभवावरून असें ह्मणतो कीं, "**कोणाशीं दगा करूं नको, करशील तर तसें फळ पावशील.**" तरी हा मनुष्य कोठें राहतो व त्यानें कोणतें वाईट कर्म केलें आहे, याचा तपास करा. **बानूचें** हें भाषण ऐकून **हातीम** व **शहाजादा** असे दोघे परत धर्मशाळेंत गेले. नंतर एक दोनादिवस गेल्यावर **हातीम शहाजाद्याची** आज्ञा घेऊन तिसऱ्या प्रश्नाच्या शोधाकरितां निघाला.

**प्रश्न २ रा समाप्त.**

---

# प्रश्न तिसरा.

**'कोणाशीं दगा करूं नको, करशील तर तसें फळ पावशील.'**

तिसऱ्या प्रश्नाचा उलगडा करण्याकरितां **शहाबादेहून हातीम** निघाला तो उत्तरदिशेचा रोंख धरून चालला. जातां जातां सुमार एक महिन्यानें 'ज्याचीं शिखरें जणूंकाय आकाश भेदण्याकरितांच उंच होत गेलीं आहेत!' असा एक मोठा **पर्वत** त्याच्या नजरेस पडला. नंतर **हातीम** जेव्हां त्या **पर्वतावरून** चढून जाण्याच्या उद्देशानें त्याच्या तळाशीं गेला तेव्हां कोणी मनुष्य रडत असून "हे मम चित्तहारिके, त्वकर ये. कारण तूं नसल्यामुळें ही जागा मला स्मशानवत् भासत आहे." असें ह्मणत आहे असा त्यास भास झाला. त्यावरून तो आसमंतात् भागीं तपास करूं लागला असतां एका मोठ्या वृक्षाखालीं संगमरवरी दगडाचा सुंदर चवथरा असून त्यावर एक तरुण मनुष्य उभा आहे व तो हे वरील शब्द उच्चारीत आहे असें त्याच्या

दृष्टीस पडलें. तेव्हां त्या परोपकारी पुरुषाचें अंतःकरण विव्हळ होऊन तो त्या तरुण पुरुषाच्या जवळ गेला आणि ह्मणालाः—**मित्रा**, तुला असें कोणतें संकट प्राप्त झालें आहे कीं, त्या योगानें तुझें चित्त अस्थिर होऊन शोकग्रस्त झालें आहे? तें मला सांग. असे शब्द जरी **हातीम** बोलला तरी त्या दुःखी मनुष्यानें त्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. परंतु **हातिमानें** पुनः एक दोन वेळ वरील शब्द उच्चारल्यावर तो दुःखी मनुष्य ह्मणालाः—आजपर्यंत बरेच लोकांजवळ मी आपलें दुःख सांगितलें, परंतु त्याचा परिहार करणारा कोणीच मनुष्य भेटला नाहीं, त्या अर्थीं तुह्मांजवळ तरी सांगून काय फळ? हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—जरी तूं पुष्कळ लोकांजवळ आपलें दुःख सांगितलें आहेस तरी एकवेळ परमेश्वरावर हवाला ठेवून माझ्याजवळ सर्व वृत्त निवेदन कर; ह्मणजे जर माझ्या हातून त्याचा परिहार होण्यासारखा असला तर काया वाचा मनेंकरून झटून मी त्याचें परिमार्जन करीन.

**हातिमाचें** हें भाषण ऐकून तो मनुष्य **हातिमास** वृक्षछायेस बसावयास सांगून ह्मणालाः—**मित्रा**, मी मूळचा व्यापारी असून अनेक प्रकारच्या मालांनीं भरलेलीं उंटे घेऊन '**रूम**' नामक देशास जात असतां ह्या पर्वताजवळ आलों. तेव्हां मी आपल्या सारवानांस पुढें जावयास सांगून ह्या प्रदेशाची मजा पहात पहात येत होतों. इतक्यांत ह्या ठिकाणीं एक सुंदर स्त्री माझ्या नजरेस पडली. तिला पहातांच कामज्वरानें विकल होऊन मी मूर्छित होऊन पडलों. तेव्हां ती **अप्सरा** मजवळ आली, आणि माझें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन पदरानें वारा घालूं लागली. पुढें कांहीं वेळानें मी चांगला सावध झाल्यावर पाहूं लागलों तों ही वरील स्थिति माझ्या नजरेस पडली. तेव्हां मला अतिशय आनंद होऊन मी तिला ह्मणालों, हे सुंदर **स्त्रिये**, तूं कोण आहेस व या अशा निर्जन प्रदेशांत कां आलीस? हें माझें भाषण ऐकून ती ह्मणालीः—मी गंधर्वकन्या असून ह्या ठिकाणींच राहत्यें. आजपर्यंत मी आपल्या सारखा कोणीतरी तरुण मनुष्य पहात होत्यें. परंतु आपण आज येथें आल्यानें ती माझी मनीषा सफल झाली. आतां आ-

पण मोठ्या आनंदानें कालक्रमण करूं. **मित्रा,** ह्या तिच्या मोहक भाषणास लुब्ध होऊन मी आपले आप्त सोयरे या सर्वांस विसरून तिज सहवर्तमान सुखानें कालक्रमण करूं लागलों. या गोष्टीस सुमार तीन महिनें लोटल्यावर एके दिवशीं मी त्या गंधर्वकन्येस ह्मणालोंः—ह्या अशा निर्मनुष्य ठिकाणीं राहण्यापेक्षां एखाद्या शहरांत जाऊन मोठ्या ऐषआरामानें राहावें, असें मला वाटतें. हें माझें भाषण ऐकतांच ती ह्मणालीः—तुमच्या ह्मणण्या प्रमाणें वागण्यास मी तयार आहे, परंतु ज्या जागेंत मी राहतें त्या जागेच्या मालकाची मला परवानगी घेतली पाहिजे. यास्तव ती परवानगी घेण्यास मी जातें. तरी मी परत येईपर्यंत तुह्मीं या वृक्षाखालीं रहा. नंतर मी ह्मणालोंः—तूं केव्हां परत येशील? तेव्हां ती ह्मणालीः—आजपासून बरोबर सात दिवसांच्या आंत मी येईन. परंतु जर तुह्मी ही जागा सोडून गेलां तर मात्र तुमची व माझी पुनः भेट होणार नाहीं. इतके शब्द बोलून ती जी गेली ती आज सात वर्षें झालीं तरी मुळींच आली नाहीं. त्या मुदतींत झाडाचीं पानें व ओहोळाचें पाणी पिऊन मी दिवस कंठले. परंतु प्रस्तुत माझ्या अंगांत बिलकुल ताकद राहिली नाहीं. बरें इतकें असूनही जर मी तिच्या शोधास गेलों आणि ती येथें आली तर मी नाहीं असें पाहून ती परत जाईल. मग तिची व माझी पुनः मुळींच भेट होणार नाहीं; यास्तव हें ठिकाण सोडून माझ्यानें कोठेंही जाववत नाहीं.

त्या '**तातीम**' नामक व्यापाऱ्याचे हे शब्द ऐकून **हातीम** ह्मणालाः—त्या **गंधर्वकन्येनें** आपलें नांव किंवा रहाण्याचें ठिकाण वगैरे कांहीं तुला सांगितलें आहे काय? **तातीम** ह्मणालाः—तिचें नांव **अलन्परी** असून '**अलका**' नामक पर्वतावर ती राहते. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—ती ज्या वेळेस येथून गेली तेव्हां कोणात्या रस्त्यानें गेली? **तातीम** ह्मणालाः—ती उजव्या हाताच्या रस्त्यानें गेली व थोडक्याच वेळानें दिसेनाशी झाली. हें ऐकतांच **हातीम** ह्मणालाः—तूं येथें स्वस्थ बैस. परमेश्वरकृपेनें थोडक्याच दिवसांत त्या **गंधर्वकन्येची** व तुझी भेट मी करवितों; असें

ह्मणून तो त्याची रजा घेऊन तेथून निघाला आणि ज्या मार्गानें गंधर्वकन्या गेली होती त्याच मार्गानें तो जाऊं लागला. दरकूच दरमजल करीत करीत जात असतां कांहीं दिवसांनीं त्यास एक पर्वत दिसला. तेव्हां त्या पर्वतावर चढून **हातीम** पाहूं लागला तों दुसरा एक मोठा पर्वत त्याच्या दृष्टीस पडला. पुढें कांहीं दिवसांनीं तो त्या पर्वतावर चढूं लागला, जातां जातां कांहीं वेळानें त्या पर्वताच्या शिखरावर जाऊन पोंचल्यावर त्याच्या दृष्टीस एक विस्तीर्ण बाग पडली. तेव्हां **हातीम** त्या बागेजवळ गेला. परंतु भर दोनप्रहरचें प्रखर ऊन पडलें असल्यामुळें तेथें जवळच ज्या हवा खाण्याकरितां बैठकी तयार केल्या होत्या तेथें जाऊन त्यांतील एका बैठकीवर विश्रांतीस्तव **हातीम** बसला. त्या स्थानासभोंवतीं असलेल्या वृक्षांच्या सुवासिक पुष्पांवरून येणारा मंदमंद वायु ज्या ठिकाणीं **हातीम** बसला होता त्या ठिकाणीं येत असल्यामुळें थोडक्याच वेळांत त्यास चांगली झोंप लागली. पुढें कांहीं वेळानें त्या ठिकाणीं दोनचार गंधर्वस्त्रिया आल्या आणि **हातिमास** निजलेला पाहून हा कोणीतरी मनुष्य असावा अशी त्यांनीं आपल्या मनाची खात्री करून घेतली. नंतर त्या आपापसांत **हातिमास** जागृत करून 'तूं कोठून आलास?' असें विचारण्याचा बेत करूं लागल्या. इतक्यांत त्या गंधर्वस्त्रियांची चळवळ ऐकून **हातीम** जागा झाला. तेव्हां त्या स्त्रिया त्यास ह्मणाल्याः—हे मानवा, तूं कोठून आलास? व तुझें येथें काय काम आहे? तें आम्हांस सांग. **हातीम** ह्मणालाः—**अलका** पर्वतावर राहणारी '**अलकनूपरी**' नामक गंधर्वस्त्री आहे; तिच्या शोधास मी जात आहें. कारण तिनें आपल्या नेत्रकटाक्षाकर्षणानें **तातीम** या नांवाच्या एका व्यापाऱ्याचें मन आकर्षण केलें असून ती त्याजसमवेत कांहीं दिवस राहून पुनः कांहीं कामाकरितां **अलकनूपर्वतावर** आली. परंतु तिनें **तातीम** यास पुनः सात दिवसांनीं परत येण्याचा वायदा केला होता, त्या गोष्टीला आज सात वर्षें झालीं; तरी ती गंधर्वस्त्री परत आली नाहीं. त्यामुळें **तातीम** हा तिनें ज्या जागेवर त्याजला रहावयास सांगितलें होतें त्या जागेवर अ-

न्नपाण्याचा त्याग करून एकसारखा तिच्या येण्याकडे दृष्टी लावून बसला असून प्रस्तुत तो विरहव्यथेनें अगदीं धरणीधर होऊन पडला आहे. यास्तव **अलकन्**परीस दोन गोष्टी सांगून त्याचें दुःख निर्सन करावें एतदर्थ मी निघालों आहें. परंतु तो **अलकन्**पर्वत कोठें आहे हें मला मुळींच ठाऊक नाहीं.

**हातिमा**चें हें भाषण ऐकून त्या **गंधर्व**स्त्रिया ह्मणाल्याः—हे मानवा, तूं भ्रमिष्ट आहेस असें आह्मांस वाटतें. कारण **अलकन्परी** ही ह्या सर्व प्रदेशाची मालकीण असून ती ह्मणजे एखाद्या मानवाशीं संबंध ठेवील असें कधींही होणार नाहीं. असें असतां ज्या अर्थीं तूं ही अशी भलतीच बडबड करतोस, व आमच्या धनीनीच्या धवलकीर्तीस कलंक लावितोस त्या अर्थीं तुला देहांत प्रायःश्चित्त द्यावें असें आह्मांस वाटतें. हें त्यांचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—हे **स्त्रियांनों**, तुमच्या हातून माझा अंत व्हावा असेंच जर परमेश्वराच्या मनांत असेल तर माझी कोणतीच हरकत नाहीं. हें त्याचें धैर्याचें भाषण ऐकून त्या **गंधर्व**स्त्रियांस **हातिमा**विषयीं लोभ उत्पन्न होऊन त्या ह्मणाल्याः—जर तूं कांहीं दिवसपर्यंत आमच्या जवळ राहण्याचें कबूल करशील तर आह्मी तुला **अलकन्** पर्वताजवळ घेऊन जावूं. हें त्या **स्त्रियांचें** ह्मणणें **हातिमानें** निरुपायास्तव कबूल केलें. नंतर कांहीं दिवसपर्यंत त्या स्त्रियांसमवेत काल–क्रमण केल्यावर **हातीम** त्यांस ह्मणालाः—येथें राहून बरेच दिवस झाले आहेत; तरी तुह्मी मला अलकन् पर्वताजवळ घेऊन चला. हें त्याचें भाषण ऐकून त्या गंधर्वस्त्रिया **हातिमास** घेऊन निघाल्या. मजल दर मजल करीत करीत सुमार सात दिवस मार्ग–क्रमिल्यावर गंधर्व स्त्रिया ह्मणालाः—आतां आमच्यानें पुढें येववत नाहीं. तरी तूं या उजव्या हाताच्या रस्त्यानें जा, ह्मणजे कांहीं दिवसांनीं दोन रस्ते लागतील. तेथें गेल्यावर पुनःही उजव्याच हाताच्या रस्त्यानें जा. ह्मणजे तूं थोडक्याच दिवसांत अलकन् पर्वतावर जाऊन पोंहोंचशील. असें ह्मणून त्या परत गेल्या.

नंतर दरकुच दरमजल करीत करीत **हातीम** बरेच दिवस

पर्यंत जात असतां कांहीं दिवसांनीं त्याजला दोन रस्ते लागले. परंतु त्या वेळीं रात्र झाली होती ह्मणून हातिमानें तेथेंच वस्ती केली. सुमार मध्य-रात्र झाल्यावर कोणी रडतें आहे असा ध्वनि त्याच्या कानीं आला, ह्मणून ज्या दिशेकडून तो ध्वनि येत होता त्या दिशेचा रोंख धरून हातीम जाऊं लागला. जातां जातां उजाडलें तरी रडणारा प्राणी त्याच्या दृष्टीस पडला नाहीं सबब त्यानें तेथेंच मुक्काम केला. नंतर रात्र होतांच पुनःपूर्ववत् रडण्याचा ध्वनि ऐकूं आला ह्मणून हातीम मार्ग-क्रमूं लागला असतां उजाडावयाच्या सुमारास एक उघडा बोडका मनुष्य अतिशय शोक करीत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां हातीम त्याजवळ गेला आणि ह्मणालाः-मित्रा, तुला असें कोणतें दुःख झालें आहे कीं, त्या योगानें तुं एकसारखा आक्रोश करीत आहेस तर तें दुःख मला सांग. हें त्याचें भाषण ऐकून तो दुःखी मनुष्य ह्मणालाः-हे उदार पुरुषा, मी एक शिपायी असून रोजगार धंद्याकरितां फिरत असतां एका शहरांत येऊन दाखल झालों. पुढें चौकशी अंतीं तें शहर एका जादूगाराचें आहे असें कळल्यावरून मी तेथून तावडतोब निघालों. आणि तेथून एक कोशावर एक बाग होता तेथें येऊन पोंहोंचलों. त्या बागाची शोभा फारच रमणीय असल्यामुळें ती पाहाण्याच्या उद्देशानें मी त्या बागांत गेलों; तों तेथें अतिशय स्वरूपवान् अशा स्त्रिया माझ्या दृष्टीस पडल्या. त्यांस पाहून आपणा सारख्या तरुण मनुष्यास हें स्थळ राहण्यास योग्य नाहीं असें वाटून मी तेथून निघालों. इतक्यांत त्या तरुण व सुंदर स्त्रियांची दृष्टी मजवर गेल्यामुळें त्यांनीं आपल्या धनिनीस मी आल्याचा मजकूर विदित केला. त्यावरून तिनें आपल्या एका दासीस मला बोलावूं पाठविलें. नंतर मी आंत गेल्यावर त्या मालकिणीचें सुंदर रूप पाहून अगदीं मोहित झालों. पंचशराच्या प्रभावानें मला उभें राहण्याची शक्ति राहिली नाहीं. सबब मी तेथील एका भिंतीला टेंकून उभा राहिलों. ही अशी माझी स्थिति पाहून तेथील दासीनें मला एक मोठ्या दिवाणखान्यांत नेलें. नंतर कांहींवेळानें त्या बागेची मालकीण

तेथें आली आणि मजजवळ गोष्टी बोलत बसली. इतक्यांत त्या बागाचा धनी ह्मणजे ज्या शहरांत मी पूर्वी गेलों होतों त्या शहराचा मालक जो जादूगार, माझ्या जवळ जी सुंदर व तरुण स्त्री गोष्टी बोलत बसली होती तिचा बाप त्या बागेमध्यें आला. आणि माझ्या घोड्यास पाहून त्यानें त्या विषयींची चौकशी केली. तेव्हां दासींनीं त्यास सर्व मजकूर कळविला. त्यावरून त्या जादुगारास अतिशय क्रोध येऊन ज्या दिवाणखान्यांत मी बसलों होतों तेथें तो आला, आणि त्यानें आपल्या कन्येची मानगोटी धरली. तेव्हां ती मोठ्या काकुळतेनें ह्मणालीः—हे बाबा, माझा जर कोणतेही रीतीचा अपराध असेल तर मला जी शिक्षा करणें ती करा. परंतु अगोदर खरा न्याय केल्याशिवाय अविचार करूं नका. हें तिचें भाषण ऐकून त्या जादूगार राजाचा थोडासा राग शांत होऊन तो आपल्या कन्येची मानगोटी सोडून देऊन तेथें असलेल्या एका सिंहासनार जाऊन बसला. इतक्यांत एक वृद्ध दासी पुढें होऊन हात जोडून ह्मणालीः—**महाराज**, हीं दोघेंही निरपराधी आहेत. कारण हल्लीं आपली कन्या उपवर असून विवाहाला योग्य झाली आहे, आणि हा जो मनुष्य एथें बसला आहे तोही थोरकुलांतला व प्रतिष्ठित आहे. या शहरांत आपल्या कन्ये-योग्य वर मिळणें दुरापस्त असल्यामुळें ह्या मनुष्यास तुह्मीं आपला जामात करावें. परंतु तसें न करितां जर ह्या दोघांस तुह्मी शिक्षा कराल तर मात्र अपकीर्तीला पात्र होऊन हत्या केल्याच्या पातकाला धनी व्हाल. हें दाईचें भाषण ऐकून राजा आपल्या कन्येस ह्मणालाः—**लाडक्ये**, ह्या गोष्टीविषयीं तुझें काय मत आहे? मुलगी ह्मणालीः—बाबा, आजपर्यंत मला कोणत्याही पुरुषाचें दर्शन झालें नसतां प्रथमतःच हा मनुष्य नजरेस पडला. त्या अर्थी मी ह्यास पतीसमान मानिला आहे.

हें त्या कन्येचें भाषण ऐकून मला थोडीशी हुषारी आली. नंतर राजा मला ह्मणालाः—हे तरुणा, जर तूं माझ्या तीन प्रश्नाचा उलगडा करशील तर मी आपली कन्या तुला देईन. मित्रा काय सांगू? पुष्पधन्व्याचा तीक्ष्णशर लागला असतां विचार ह्मणून

मुळींच राहत नाहीं. कसें ह्मणशील तर, वरील गोष्ट जेव्हां मला राजानें विचारली तेव्हां कांहींएक विचार न करितां त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें मीं कबूल केलें. नंतर राजानें दुसरे दिवशीं मोठा दरबार भरवून सर्व लोकांस माझी हकीगत निवेदन केली; आणि मला ह्मणालाः—ज्या अर्थी तुह्मीं माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें कबूल केलें त्या अर्थी माझा पहिला प्रश्न हा आहे कीं, "**परो नामक पक्ष्यांचा एक जोडा आणणें.**" दुसरा असा आहे कीं, "**लाल रंगाचा एक सर्प असून त्याच्या तोंडांत एक हिरा आहे; तो आणणें**" तिसरी अट ही आहे कीं, "**तप्ततैल कटाहांतून जिवंत बाहेर निघणें.**" ह्या तीन प्रश्नांचा जर तूं उलगडा केलास तर तुला मी आपला जांवई करीन. राजाचे हे तिन्ही प्रश्न ऐकून मी त्याचीं उत्तरें आणण्याकरितां सर्वांची रजा घेऊन तेथून निघालों. तो मजले मजलनें येथें येऊन राहिलों. खाण्या पिण्याची अतिशय दुर्बळता झाल्यामुळें प्रस्तुत माझ्या आंगांत बिलकुल शक्ति नाहीं; व त्यामुळें मला त्या तीन प्रश्नांचीं उत्तरें देवत नाहींत. आतां आजपर्यंत पुष्कळ लोकांनीं येथें येऊन माझ्या शोकाचें कारण विचारलें, व मी त्यांस तें सांगितलें; परंतु मला दुःखमुक्त करून ज्या सुंदरीनें माझें चित्त हरण केलें आहे ती प्राप्त करून देणारा असा परमेश्वराचा लाल एकही भेटला नाहीं. असो, नशीब माझें !!!

त्या दुःखी मनुष्याचें हें भाषण ऐकून **हातीम** त्यास ह्मणालाः—मित्रा भिऊं नको. मी त्या जादुगार राजाच्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन त्याचा तुला जामात करितों. तरी कोणत्याही प्रकारची काळजी न करितां तूं एथें स्वस्थ बैस. **हातिमाचें** हें भाषण ऐकून त्या दुःखी मनुष्यास थोडीशी हुषारी येऊन तो **हातिमाचे** फारच उपकार मानूं लागला, इतक्यांत **हातिमास** आठवण झाली कीं, पूर्वीं ज्यावेळेस त्यानें आपल्या मांडीवरचें मांस लांडग्यास खावयास दिलें होतें त्या वेळेस तो मांडीवरचा घाय बरा होण्याकरितां कोल्ह्यानें '**माझनद्रान्**' नामक अरण्यांतून **परो**पक्ष्याचा मेंदू आणला होता. तरी तेथें गेलें असतां पक्ष्यांचा तो जोडा आ-

पणास मिळेल अशी त्यास आठवण होऊन तो त्या दुःखी मनुष्याची रजा घेऊन मार्ग—क्रमण करूं लागला. जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एका शहराजवळ येऊन पोहोंचला. त्या वेळीं त्या शहारांतील सर्व लोक तटा सभोंवतीं लांकडाचा मोठा ढीग करित असलेले **हातिमाच्या** नजरेस पडले. त्यावरून त्यानें त्या लोकांस असें करण्याचें कारण विचारलें; तेव्हां ते लोक ह्मणालेः—प्रत्यहीं रात्रीच्यावेळीं एक मोठा अक्राळ विक्राळ स्वरूपाचा राक्षस आमच्या शहरांत येत असतो व आह्मांपैकीं जे लोक हातीं लागतील त्यांचा फन्ना उडवितो. यास्तव त्या राक्षसानें शहरांत येऊं नये ह्मणून आह्मी हा लांकडांचा ढीग करून संध्याकाळ झाली ह्मणजे तो पेटवितों. त्या योगानें राक्षसास शहरांत येण्यास मार्ग न मिळून आमचें रक्षण होतें. हें त्या लोकांचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—त्या राक्षसाचा आकार कसा आहे तो मला सांगा. तेव्हां ते लोक ह्मणालेः—जसें एखादें भयंकर जनावर असतें त्याप्रमाणें त्याचा आकार असून त्यास सात तोंडें आहेत. पैकीं बाजूचीं साह सिंहाच्या तोंडा सारखीं आहेत व मधलें हत्तीच्या तोंडासारखें असून त्याला तीन डोळे आहेत. हें ऐकून **हातिमानें** त्या राक्षसाचा वध कोणत्या युक्तीनें होईल याविषयीं कांहींवेळ विचार केला. नंतर तो त्या लोकांस ह्मणालाः—मी सांगेन त्याप्रमाणें जर तुह्मी वागाल तर त्या दुष्ट राक्षसास आज यमसदनास पोंचवितों. हें ऐकून सर्व लोक **हातिमाच्या** सांगण्याप्रमाणें वागण्यास कबूल झाले. नंतर **हातीम** त्यांस ह्मणालाः—आतांच्या आतां तुह्मी तो राक्षस येण्याच्या वाटेवर एक मोठा खाडा, व त्याचे सभोंवतीं लांकडाचा व कांटेच्या झाडांचा मोठा ढिग करा; ह्मणजे मी त्या राक्षसाची आज चांगली खोड मोडतों. ह्या **हातिमाच्या** ह्मणण्याप्रमाणें त्या लोकांनीं तावडतोब एक मोठा खाडा खणून त्या सभोंवतीं लांकडाचा व कांटेरी झाडांचा ढीग केला. नंतर रात्र होतांच तटा सभोंवतालचीं लांकडें पेटवून बरोबर एक धनुष्य बाण घेऊन **हातीम** त्या खाड्यांत जाऊन बसला.

सुमार प्रहर रात्र झाल्यावर तो राक्षस मोठमोठ्या किंकाळ्या

फोडीत आला. परंतु शहरासभोंवती अग्नि पेटलेला असल्यामुळें शहरांत प्रवेश करण्याचा नाइलाज होऊन तो सैरावैरा धांवूं लागला. इतक्यांत **हातिमानें** त्याच्या मधल्या हत्तींच्या तोंडावरील तीन डोळ्यांपैकीं एक डोळ्याचा नेम धरून एक बाण सोडला. त्याप्रमाणें तो बाण राक्षसाच्या डोळ्याचा भेद करून जातांच तो राक्षस धाडदिशीं जमीनीवर पडला. नंतर कांहीं वेळानें तो थोडासा शुद्धीवर आल्यावर विशेष गडबड न करितां रानांत पळून गेला. पुढें **हातीम** सर्व रात्रभर त्या खाड्यांतच होता. नंतर उजाडल्यावर तो शहरांत गेला तेव्हां सर्व लोक राक्षसाची खबर त्याजला विचारूं लागले असतां **हातीम** ह्मणलाः—आजपासून तो राक्षस तुमच्या शहराकडे नुसत्या नजरेनें सुद्धां पहाणार नाहीं. कारण मी त्याची पक्की खोड मोडून त्यास पळवून लावलें आहे. हें ऐकून ते लोक ह्मणालेः—ही गोष्ट खरी अशी कशावरून ? **हातीम** ह्मणालाः—आजरात्रीं तुह्मी सर्व लोक तटावर जाऊन राक्षच्या येण्याची वाट पहात बसा. जर तो राक्षस आला तर मी बोलतों हें खोटें असें समजा. हें **हातिमाचें** भाषण त्या लोकांनीं ऐकून सर्व लोक रात्रीं राक्षसाची वाट पहात बसले. परंतु त्या राक्षसाचा नुसता शब्द-सुद्धां त्यांच्या कानीं पडला नाहीं. त्यावरून **हातिमानें** राक्षसास पळवून लाविलें अशी त्यांची समजूत होऊन दुसरे दिवशीं ते त्यास घेऊन आपल्या राजाकडे गेले. आणि झालेलें सर्व वर्तमान त्यांनीं राजास निवेदन केलें. तें ऐकून राजानें **हातिमास** मोठ्या सन्मानानें आपल्या येथें रहावून घेतलें. पुढें दोन चार दिवस गेल्यावर जेव्हां **हातीम** जावयास निघाला तेव्हां उपकारपरिपूरणार्थ शहरांतील प्रत्येक इसम यथाशक्ति द्रव्य **हातिमास** देऊं लागला. प्रथमतः **हातिमानें** तें घेण्याचें नाकारलें. परंतु लोकांनीं अतिशय आग्रह केल्यावरून त्यानें त्या द्रव्याचा अंगिकार केला. नंतर तें सर्व द्रव्य गरीबगुरीबांस वांटून तो सर्वांची रजा घेऊन **माझन्द्रान** अरण्यांत जावयास निघाला.

जातां जातां एकेदिवशीं वाटेंत एका कृष्ण **सर्पाची** व **नकुलाची** झुंज चाललेली त्याच्या नजरेस पडली. तेव्हां कोणाच्या

जय होतो हें पहाण्याकरितां **हातीम** काहींवेळ तेथें उभा राहिला. परंतु त्या दोघांतून कोणांसही जयापजय येत नाहीं असें पाहून **हातीम** त्यांस ह्मणालाः—हे प्राण्यांनों तुह्मी व्यर्थ कां भांडतां? तेव्हां कृष्णसर्प ह्मणालाः—ह्या नकुलानें माझ्या बापाचा प्राण घेतला आहे, सबब मी भांडतों. नंतर नकुळ ह्मणालाः—**महाराज**, ह्या **सर्पाची** बहीण अतिसुंदर असल्यामुळें माझा हेतु तिजबरोबर लग्न करावयाचा होता व त्याप्रमाणें तो मी ह्या सर्पाच्या बापासही दर्शविला. परंतु त्यानें ती गोष्ट नाकारल्यामुळें मी ह्याच्या बापास मारलें व हा माझा भक्ष असल्यामुळें ह्यासही मीं आतां मारून खाणार. हें ऐकतांच **हातीम** त्या उभयतांस ह्मणालाः—जर तुह्मांला क्षुधाच शांत करावयाची असेल तर व्यर्थ एकमेकांचा जीव न घेतां मलाच भक्षा. मी खुषीनें मरण्यास तयार आहें. हें भाषण ऐकतांच नकुल ह्मणालाः—ही गोष्ट जर खरी असेल तर तूं आपल्या गालाचा तुकडा मला खावयास दे. हें ऐकून **हातिमानें** तावडतोब आपल्या कमरेची कट्यार काढली; व तो गाल कापूं लागला. इतक्यांत ते दोघेही आपलीं स्वरुपें टाकून मनुष्यरूपानें **हातिमा**पुढें उभे राहिले. हें पाहून **हातीम** अमर्दी चकित झाला. नंतर नकुलरुपी मनुष्य ह्मणालाः—हे परोपकारी मनुष्या, तुझें धैर्य पहाण्याच्या उद्देशानेंच मी गालाचा तुकडा मागितला. परंतु तूं खरोखर फारच धैर्यवान मनुष्य आहेस अशी आतां माझी पक्की खात्री झाली आहे. असो, आतां आह्मी आपली खरी हकीगत सांगतों ती अशी कीं, आह्मी उभयतांही गंधर्व असून ह्याच्या बहीणीवर मी आसक्त झालों. परंतु ह्याचा बाप सुखसंतोषानें ती मला देईना. ह्मणून मी त्याचा प्राण घेतला. तेव्हांपासून आह्मा उभयतांत हाडवैर माजून एकमेकांस ठार मारण्याची संधी पहात आहों. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः— माझी इच्छा तुह्मीं उभयतांनीं हीं आपल्या बहीणींबरोबर लग्नें करून वैर सोडावें असें आहे. तेव्हां तो गंधर्व ह्मणाला. ही गोष्ट होणें अशक्य आहे. कारण आह्मी ह्या शेजारच्या शहरचे मुख्य राजे असल्यामुळें ही गोष्ट माझ्या बापास पसंत वाटणार नाहीं. हें ऐकून **हातीम** ह्मणा-

हा:—त्या विषयीं तुह्मी काळजी करूं नका. फक्त मला तुझ्या बापाकडे घेऊन चल ह्मणजे त्याची समजूत मी करीन. ही गोष्ट त्या दोघांसही मान्य झाली व ते **हातीमास** बरोबर घेऊन शहरापर्यंत आले. नंतर राजपुत्र ह्मणाला:—**महाराज** कांहीं वेळपर्यंत आपण येथें बसा ह्मणजे मी शहरांत जाऊन आपल्या नोकरांस येथें पाठवितों मग ते आपणांस राजाकडे घेऊन जातील. हें ऐकून **हातीम** तेथेंच एका झाडाखालीं बसला व ते उभयतांही शहरांत निघून गेले. पुढें कांहीं वेळ गेल्यावर राजपुत्रानें सांगितल्याप्रमाणें दोन तीन चाकर आले आणि **हातिमास** त्या शहरच्या **हामीर** राजाजवळ घेऊन गेले. तेव्हां **हातिमास** पाहून राजा ह्मणाला हे मानवा, तूं माझ्या राज्यांत कां आलास? **हातीम** सर्व हकीगत सांगून ह्मणाला:—जर तुह्मांला तुमच्या पुत्राच्या जिविताची आशा असेल तर त्याजबरोबर हाडवैर धरणाऱ्या गंधर्वास तुह्मी आपली कन्या द्या. आणि त्याच्या बहीणी बरोबर तुह्मी आदल्या पुत्राचें लग्न करा. **हातिमाचें** हें भाषण ऐकून राजा ह्मणाला:— आपण सांगितलेली ही हकीगत मला मुळींच ठाऊक नव्हती. आतां आपण ती माझ्या जवळ स्पष्ट करून सांगून त्या विषयींची योग्य युक्ति सांगितलीत येणें करून मी आपला मोठा आभारी आहें. असें ह्मणून **हातिमाच्या** सांगण्याप्रमाणें त्यानें परस्परांच्या बहीणींबरोबर परस्परांचीं लग्नें लाविलीं. पुढें एक दोन दिवस गेल्यावर **हातीम, हामीर**राजाजवळ जाण्यास आज्ञा मागूं लागला. तेव्हां राजानें एक राजदंड **हातिमास** बक्षिस दिला. आणि सांगितलें कीं, ह्या राजदंडाच्या आंगीं आपणास प्रवासांत उपयोगी पडणारे अनेक गुण आहेत. ते असें कीं, ‘ हा दंड उभा धरिला असतां कोणत्याही रीतीची विषबाधा तुह्मांस होणार नाहीं. आणि जर कोणीं तुमच्यावर जादूचा प्रयोग केला तर हा दंड शरीरा भोंवतीं फिरविला असतां तिचें निवारण होतें. जर एखादी नदी उतरून जाणें आहे तर हा दंड नदींत टाकला असतां त्याची नाव होऊन ती पैलतीरास घेऊन जाते. आणि हा दंड हातांत घेऊन अग्नींत उडी टाकली तर आपणास अग्नीची बाधा बिलकुल

होणार नाहीं. इतके गुण ह्या राजदंडाच्या आंगीं आहेत असें ह्मणून राजानें तो हातिमास दिला, नंतर दुसरें एक भारलेलें मोतीं हातिमास देऊन ह्मणालाः—हें मोतीं तोंडांत धरलें असतां लाल, पांढऱ्या, काळ्या, किंवा हिरव्या वगैरे कोणत्याही रंगाच्या सर्पापासून भय अथवा मरण प्राप्त होणार नाहीं; इतका ह्याच्या आंगीं गुण आहे. तरी ह्याचाही तुह्मी स्वीकार करावा. तेव्हां हातिमानें त्या दोनही जिनसा घेऊन राजाचे अतिशय आभार मानून तो तेथून माज़नद्रान अरण्यांत जाण्याकरितां निघाला. जातां जातां काहीं दिवसांनीं वाटेंत त्यास एक नदी लागली. त्या नदीचें पाणी अगदीं काळेंभोर असून समुद्राप्रमाणें त्याच्या लाटा उसळत होत्या. हें पाहून ती नदी उतरून जाण्याचा हातीम विचार करूं लागला. इतक्यांत हामीर राजानें दिलेल्या राजदंडाची आठवण होऊन त्यानें तो नदींत टाकला. तेव्हां एक उत्तम नौका तयार होऊन तींत हातीम बसला आणि नदी उतरून जाऊं लागला. सुमार अर्ध वाटेवर गेला इतक्यांत एक मोठा दैत्य त्या ठिकाणीं उत्पन्न होऊन हातिमास नौकेसहीत पाण्यांत घेऊन गेला. पुढें कांहीं वेळ गेल्यावर ‘आपण जमीनीवर उभे असून ज्या दैत्यानें आपणास येथें आणलें तो पुढें हात जोडून उभा आहे’ असें त्यास वाटलें. इतक्यांत तो दैत्य मोठ्या नम्रतेनें ह्मणालाः—महाराज आपणास ज्या खटल्याच्या इनसाफाकरितां येथें आणलें, तो खटला असा आहे कीं, ही जागा माझी स्वतःची असतां दुसऱ्या एका बलाढ्य दैत्यानें ती बळकाविली आहे. तो दैत्य माझ्यापेक्षां अतिशय बळकट असल्यामुळें त्याच्या भीतिनें प्रस्तुत ही जागा मी सोडली आहे. आतां माझें आपणांस इतकेंच सांगणें आहे कीं, त्या दैत्यास या ठिकाणावरून हांकलून ही जागा माझी मला द्यावी. असें त्या उभयतांचें भाषण होत आहे, इतक्यांत जागा बळकाविणारा दैत्य मोठमोठ्या किंकाळ्या फोडीत तेथें आला. त्यास पाहून तो पूर्वीचा दैत्य पळून गेला. हातीमही त्याच्या आरोळ्या ऐकून प्रथमतः थोडासा भ्याला; परंतु थोडावेळ गेल्यावर धैर्य धरून व परमेश्वर स्मरण करून हामीर राजानें दिलेला राजदंड

त्यानें हातांत घेतला. त्या दंडास पहातांच तो उग्ररूपी राक्षस अगदीं लीन झाला; हें पाहून **हातीम** ह्मणालाः—हे राक्षसा, ज्या जाग्यावर आपली सत्ता नाहीं अशी जागा तेथील धन्याला घालवून देऊन केवळ बाहुदंडांच्या जोरावर आपली असें ह्मणणें फार गैर आहे. तुला जर ह्या नदींत रहावयाचें होतें तर दुसरी पुष्कळ रिकामी जागा होती तेथें जाऊन वास करावयाचा होता. परंतु तसें न करितां आपल्या ज्ञाति बांधवांस हांकलून त्याची जागा बळकावणें हें तुझ्या **सारख्या** पराक्रमी दैत्यास योग्य नाहीं. हें **हातिमाचें** भाषण ऐकून त्या दैत्यास अतिशय क्रोध आला व तो **हातिमास** खाण्याकरितां त्याच्या आंगावर धांवला. नंतर जेव्हां राक्षस अगदीं जवळ आला तेव्हा **हातिमानें** त्यास राजदंडाचा एक सपाटा लगावला. त्याबरोबर तो दैत्य अगदीं गर्भगलित होऊन पळून गेला. हें पाहून तो पूर्वींचा दैत्य पुन्हां परत आला आणि **हातिमाचे** फार फार उपकार मानूं लागला. नंतर **हातिमानें** आपल्या हातांतील राजदंड वर उडवला. त्याबरोबर त्याची पूर्ववत् नौका होऊन दैत्याची रजा घेऊन **हातीम** तींत बसला; आणि ती उतरून पैलतीरास आला. तेव्हां मजले मजलेनें मार्ग क्रमीत क्रमीत कांहीं दिवसांनीं तो एका भयानक अरण्यांत आला. त्यावेळीं संध्याकाळची वेळ झाली होती ह्मणून **हातीम** एका झाडाखालीं वस्तीस राहिला. रात्रीच्यावेळीं त्या झाडावर **परो**पक्ष्यांचे अनेक जोडे येऊन राहिले व ते आपापसांत ह्मणूं लागलें कीं, हा जो खालीं मनुष्य बसला आहे तो सदोदित दुसऱ्यांचें दुःख निवारण्यास अगदीं तत्पर असतो. यास्तव आपणही त्यास थोडीशी तरी मदत केली पाहिजे. असा विचार करून ते पक्षी झाडाखालीं उतरले आणि **हातिमा**जवळ जाऊन त्याचे पाय कुरवाळूं लागले. हें पाहून परमेश्वराच्या अगाध लीलेचें मोठें कौतूक वाटून त्यानें परमेश्वराची स्तुति केली. नंतर ते पक्षी ह्मणाले हे परोपकारी पुरुषा, **मसाहीर** ज्यादुगाराच्या कन्येला पाहून मोहित झालेल्या शिपायाचें दुःख निवारण करण्याचें प्रस्तुत तूं मनांत आणून ज्यादुगाराचा पहिला प्रश्न जो

" **परोपक्ष्यांचा जोडा आणणें** " त्याचा उलगडा करण्याच्या हेतूनें तो जोडा नेण्याकरितां येथें आला आहेस हें आह्मी जाणतों. हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—हे ज्ञानवान् पक्ष्यांनो, तुह्मीं जें बोललां तें अक्षरशः खरें आहे. आतां परमेश्वराकडे नजर देऊन जर तुह्मी आपल्या पैकीं एक जोडा द्याल तर मी तुमचा फारच आभारी होईन. हें ऐकून ते पक्षी कांहींवेळ आपापसांत विचार करून तेथून उडून झाडावर गेले. आणि कांहीं वेळानें पिलांचा एक जोडा घेऊन हातिमाजवळ येऊन ह्मणालेः—हे परोपकारी पुरुषा, हा जोडा तूं घेऊन जा आणि **मसाहीर** जादुगारास नजर कर; ह्मणजे त्याचा पहिला प्रश्न पुरा होईल. हें ऐकून **हातिमानें** त्यांचे अतिशय उपकार मानले. नंतर उजाडल्यावर तो परोपक्ष्याचा जोडा घेऊन **हातीम** तेथून निघाला. आणि मजलेमजलेनें प्रवास करीत ज्या ठिकाणीं तो दुःखी शिपायी रडत होता तेथें आला.

**हातिमास** कार्यसिद्धी करून आलेला पाहून तो शिपायी त्याच्या पायांवर गडबडा लोळूं लागला. तेव्हां **हातिमानें** त्यास उठवून पोटाशीं धरलें आणि त्याची समजूत केली. नंतर ते दोघेही तेथून निघून जादूगाराच्या शहरास येण्याकरितां निघाले. वाटेनें जात असतां **हातिमानें माझनद्रान** अरण्याविषयीं व **परोपक्ष्यां**विषयीं सर्व हकीगत त्यास निवेदन केली. पुढें काहीं दिवसांनीं ते जादूगाराच्या शहरास येऊन पोहोंचल्यावर **हातीम** ह्मणालाः—हा जोडा घेऊन तूं एकटाच शहरांत जा; आणि **मसाहीर** राजास नजर कर. परंतु जर तुला त्यानें हा जोडा कोणी आणला असें विचारलें तर माझ्याविषयीं कांहींएक न बोलतां मीं स्वतःच आणला आहे असें सांग. असें ह्मणून ते उभयतां ही शहरांत आले. नंतर **हातीम** एका धर्मशाळेंत जाऊन उतरला, आणि शिपायी राजाकडे निघून गेला.

राजवाड्यांत जातांच **परो**पक्ष्यांचा जोडा पाहून **मसाहीर** राजास अतिशय आनंद झाला. नंतर तो शिपायास ह्मणालाः—हा जोडा तूं स्वतः आणलास कीं काय, व तो कोठें सांपडतो ? हें तूं

मला सांग. हें त्या राजाचें भाषण ऐकून **हातिमानें** पढवून ठेवलेली सर्व हकीगत त्यानें त्यास सांगितली. ती ऐकून राजा ह्मणालाः—हे पराक्रमी पुरुषा, माझ्या पहिल्या प्रश्नाचा तर निकाल झालाच. आतां "**लाल सर्पाच्या मुखांतील हिरा आणणें**" हा नो माझा दुसरा प्रश्न आहे त्याचा तूं उलगडा कर. हें राजाचें भाषण ऐकून शिपायी ह्मणालाः—ज्या सुंदरांगीला पाहून माझी अशी अवस्था झाली आहे, व जिची मूर्ती मी रात्रंदिवस आपल्या हृदयांत ठेवली आहे तिचें एकवेळ जर दर्शन होईल तर दुसऱ्या प्रश्नाचा निकाल करण्याकरितां जाण्यास मला हुशारी येईल. त्या शिपायाचें बोलणें **मसाहीर** राजानें मान्य करून तावडतोब आपल्या कन्येस तेथें आणविलें. नंतर शिपायी तिला पाहून फारच आंनदित होऊन ह्मणालाः—प्रिये, आरक्त **सर्पाच्या** मुखांतील हिरा आणण्याकरितां मी जात आहें. परंतु तो **सर्प** कोठें राहतो या विषयीं मला बिलकुल माहिती नाहीं. तथापि या संबंधानें तुला जर कांहीं माहिती असली तर मला सांग. हें शिपायाचें भाषण ऐकून राजकन्या ह्मणालीः—**काफ्** पर्वताकडे जें अरण्य आहे त्यांत तो सर्प राहतो, असें माझ्या ऐकण्यांत आलें आहे. इतकीं अक्षरे बोलून सुहास्यमुद्रेनें एकवेळ शिपायाकडे पाहून ती तेथून निघून गेली. नंतर **मसाहीर** राजाची आज्ञा घेऊन तो शिपायी तेथून निघून धर्मशाळेंत आला. आणि घडलेलें सर्व वर्तमान त्यानें **हातिमास** निवेदन केलें. तें ऐकून **हातीम** ह्मणालाः—मित्रा, आतां मी लाल सर्पाच्या तोंडांतील हिरा आणण्यास जातों तरी मी येई पर्यंत तूं येथून कोठेंही जाऊं नको. असें सांगून तो **काफ्** पर्वताकडे जाण्याच्या उद्देशानें मार्ग—क्रमूं लागला. दरकूच दरमजल करीत जात असतां एके दिवशीं एक सप्तरंगी **सर्प** त्याचे नजरेस पडला. त्या सर्पास पक्ष्याप्रमाणें पंख असून त्या योगानें तो सर्व रानभर घिरट्या घालीत होता. असा हा विलक्षण प्राणी पाहून त्याचें वसतिस्थान कोठें आहे याचा शोध करावा अशी **हातिमास** इच्छा उत्पन्न होऊन जिकडे जिकडे तो सर्प फिरत असे तिकडे तिकडे **हातीम** जाऊं लागला. पुढें संध्याकाळच्या

सुमारास तो सर्प एका पर्वताच्या गुहेंत शिरला; त्यामुळें **हातिमा**नेंही तेथेंच वस्ती करण्याचा विचार केला. इतक्यांत कांहीं अंतरावर एक नदी असून पुष्कळ लोक पाणी भरण्या करितां तेथें आले आहेत असें त्याच्या नजरेस पडलें. त्यावरून **हातीम** त्या-नदीवर गेला. तेव्हां हा कोणी परदेशी मनुष्य आहे असें समजून त्या ठिकाणीं असलेल्या लोकांनीं **हातिमास** कांहीं अन्न खावयास दिलें व त्यास ते आपल्या गावांत येण्याविषयीं आग्रह करूं लागले. परंतु **हातिमानें** त्यानीं दिलेलें अन्न मात्र ग्रहण केलें. व गांवांत वस्ती करितां येण्याचें नाकारलें. नंतर ते लोक आपापल्या घरोघर निघून गेल्यावर **हातीम** त्या गुहे जवळ परत आला. पुढें कांहीं वेळानें त्या नदी किनाऱ्यास कित्येक फिरस्ते धनगर व लमाण मेंढरें व गुरें घेऊन आले आणि त्या सर्वांस मोठ्या मैदानांत सोडून देऊन ते फिरस्ते, ज्या झाडाच्या आश्रयानें **हातीम**-वस्तीस राहिला होता त्याच्याच शेजारीं वस्तीस राहिले. नंतर सुमार दीडप्रहर रात्र गेल्यावर तो नाग गुहेंतून निघाला. आणि **हातीम** शिवाय करून त्या प्रदेशांत जितके ह्मणून प्राणी होते त्यांस त्यानें दंशकरून मारून टाकलें व पुनः गुहेंत जाऊन बसला. हें त्या सर्पाचें कृत्य पाहून **हातिमास** अतिशय वाईट वाटलें. पुढें उजाडल्यावर त्या खेड्यांतील कांहीं लोक नदीवर पाणी भरावयास आले. तेव्हां त्यांच्या दृष्टीस धनगरांची, लमाणांचीं, मेंढरांचीं व गुरांचीं प्रेतें पडलीं. तीं पाहून ते लोक भयाभीत झाले व गावांत जाऊन त्यांनीं सर्वलोकांस ती हकीगत कळविली. ती ऐकून कित्येक लोक तो हृदयद्रावक देखावा पाहण्याकरितां तेथें आले. आणि **हातिमास** पाहून ह्मणाले, महाराज ह्या ठिकाणीं राहिलेलीं सर्व मनुष्यें व जनावरें गतःप्राण झालीं असून आपण कसे वांचलेत? हें त्यांचें भाषण ऐकून **हातिमानें** सर्व वृत्तांत त्यांस निवेदन केला. तें ऐकून ते सर्व लोक त्या सर्पास पाहण्या करितां गुहेच्या तोंडाशीं गेले. इतक्यांत तो भयंकर सर्प गुहेंतून बाहेर आला आणि त्या मंडळींत जो मुख्य पाटील होता त्यास दंशकरून चालता झाला. त्याबरोबर तो पाटील धाडकन जमीनीवर पडला आणि तडफडून

मरण पावला. हें पाहून ते सर्वलोक मोठा आक्रोश करीत परत आपल्या गांवांत गेले.

नंतर तो सर्प बिळांतून बाहेर निघाला आणि घोर अरण्यांतून जाऊं लागला, तेव्हां त्याचें चरित्र पाहण्या करितां **हातीम** ही त्याच्या पाठोपाठ चालला. जातां जातां संध्याकाळच्या सुमारास तो सर्प एका मोठ्या शहरास आला. आणि प्रहर रात्रीच्या सुमारास कृष्णसर्पाचें रूप धारण करून शहरांत गेला. नंतर राजाच्या व प्रधानाच्या घरीं जाऊन उभयतांच्याही पुत्रांस दंश करून तो परत आपल्या मकाणावर आला. हें त्या सर्पाचें कृत्य **हातीम** पहात होता. परंतु त्यानें कोणाचे प्राण घेतले ह्याचा अंदाज त्यास होईना. पुढें उजाडल्यावर जेव्हां त्या शहरांतील सर्व लोक राजपुत्र व प्रधानपुत्र सर्प दंशानें मेले ह्मणून आक्रोश करूं लागले, तेव्हां **हातिमास** अतिशय वाईट वाटलें. परंतु परमेश्वराच्या इच्छेपुढें कोणाचाही इलाज नाहीं असें समजून तो स्वस्थ राहिला. नंतर कांहींवेळानें तो सर्प तेथून निघून पुढें जाऊं लागला. तरी **हातीम** त्याच्या पाठोपाठ होतांच. पुढें संध्याकाळच्या सुमारास ते उभयताही एका नदीजवळ आले. तेव्हां सर्पानें सिंहाचें रूप धारण केलें. आणि त्या नदीवर एका खेडेगांवांतील कांहीं लोक पाणी नेण्याकरितां आले होते त्यापैकीं एका तरुण पुरुषास त्यानें फाडून खाल्लें. नंतर तो तेथून निघाला व सुंदरस्त्रीचें रूप धारण करून एका मोठ्या रस्त्यावर येऊन बसला. पुढें कांहीं वेळ गेल्यावर त्या रस्त्यानें दोघे भाऊ अन्यदेशीं व्यापारधंदा करून परत आपल्या घरीं जात होते, त्यांस पाहून ह्या वेषधारी स्त्रीनें मोठा आक्रोश मांडला. तो ऐकून ते दोघेही भाऊ ज्या ठिकाणीं ही नवयौवना वस्त्रालंकारांनीं भूषित अशी स्त्री बसली होती तेथें आले. आणि रडण्याचें कारण विचारूं लागले. तेव्हां ती स्त्री ह्मणाली, मी आज बहुत दिवस आपल्या बापाच्या घरीं होत्यें ह्मणून माझा नवरा मला सासरीं घेऊन येत होता. पुढें या घोर अरण्यांत आल्यावर तो कोठें नाहींसा झाला. त्याला आज दोन तीन दिवस मी एकसारखी शोधीत आहें; परंतु त्याचा थांग लाग-

त नाहीं. त्यामुळें मी प्रस्तुत अगदीं निराश्रित झालें आहें. आतां सासर किंवा माहेर या दोहोंतून कोठेंतरी जावें परंतु रस्ता माहीत नसल्यामुळें तोही उपाय खुंटला. तेंव्हां आतां काय करावें? हा विचार माझे मनांत आला ह्मणून मला दुःख होत आहे. हें त्या कपटी स्त्रीचें मायावी भाषण ऐकून त्या दोघांतील वडील भाऊ ह्मणालाः—जर तूं मजबरोबर विवाह करण्यास तयार असशील तर मी तुला आपल्या बरोबर घेऊन जातों. तेंव्हां स्त्री ह्मणालीः—माझे तीन करार आहेत ते असे कीं, माझ्या बरोबर लग्न लाविलें असतां दुसऱ्या स्त्रीशीं संबंध ठेवितां कामानये. दुसरें, मी स्वयंपाक वगैरे करणार नाहीं. व तिसरें मी ज्या रीतीनें वागेन त्याबद्दल मला प्रतिबंध करूं नये. हे तीन करार जर तुह्मांस मान्य असले तर मी तुह्मांबरोबर विवाह करीन. हें त्या स्त्रीचें भाषण ऐकून व तिच्या स्वरूपास लुब्ध होऊन त्या वडील भावानें ते तिन्ही करार मान्य असल्याबद्दल आपली संमति दर्शविली. नंतर उभयतांच्याही आणा भाका झाल्यावर तो वडील भाऊ त्या स्त्रीस आपल्या पुढें बसवून भावासहवर्तमान मार्ग—क्रमूं लागला. हें त्या वेषधारी स्त्रीचें कपटी वर्तन पाहून पुढें काय प्रकार होतो, तो पहाण्याकरितां हातीमही त्याच्या मागोमाग जाऊं लागला.

जातां जातां कांहीं वेळ गेल्यावर ती स्त्री आपल्या पतीस ह्मणालीः—आज तीन दिवसपर्यंत अन्नपाणी न मिळाल्यामुळें क्षुधेनें व तृषेनें माझा जीव व्याकुळ झाला आहे. तरी तुह्माजवळ कांहीं खाण्याचे पदार्थ असल्यास मला खावयास द्या आणि कोठून तरी थोडेसें पाणी आणून द्या. हें तिचें भाषण ऐकून त्या वडील भावानें आपला घोडा उभा केला. आणि स्त्रीस व धाकट्या भावास एका झाडाखालीं बसवून एक भांडें घेऊन तो पाण्याच्या शोधास गेला. तेंव्हां ती स्त्री त्या धाकट्या भावास ह्मणालीः—जरी मी तुमच्या वडील भावाबरोबर लग्न लाविलें आहे, तरी अंतर्यामापासून खरी प्रीती तुमच्यावरच आहे. यास्तव ही योग्य संधी साधून आपण येथून कोठेंतरी अन्य देशीं निघून

जाऊन सुखानें कालक्रमणा करूं. हें त्या स्त्रीचें भाषण ऐकून धाकटा भाऊ ह्मणालाः—वडील बंधूची स्त्री ह्मणजे मातेसमान; असें असतां तूं हें अवाटित भाषण बोलून मला पापकर्मास प्रवर्तक करितेस हें चांगलें नाहीं. असें ह्मणून त्यानें तिची पुष्कळ निंदा केली. ती ऐकून जरा रागावल्यासारखें करून ती स्त्री ह्मणालीः— जर तुह्मी मी सांगितलेली गोष्ट मान्य न कराल तर तुमचा भाऊ आला ह्मणजे "तुह्मीं माझ्यावरबलात्कारकरीत होतां" असें मी त्यास सांगून तुह्मांला शिक्षा करवीन. इतकी जरी त्या स्त्रीनें धमकी दिली तरी धाकट्यानें तिची मुळींच पर्वा केली नाहीं. पुढें कांहीं वेळानें वडील भाऊ पाणी घेऊन येत आहे असें पाहून त्या स्त्रीनें आपल्या आंगावरचें वस्त्र फाडून मोठा आक्रोश मांडला तो ऐकून वडील भाऊ धांवत धांवत तिच्याजवळ येऊन ह्मणालाः—प्रिये, तूं कां रडतेस ? व तुझ्या आंगावरचें वस्त्र कशानें फाटलें ? तें मला सांग. स्त्री ह्मणालीः—प्राणनाथ, आपण पाणी आणण्याकरितां गेल्यावर हा तुमचा निर्लज्ज बंधु माझी अब्रु घेण्यास सिद्ध होऊन जेणेंकरून मी आपल्या पातिव्रत्यरूपी स्वच्छ वस्त्रास कलंक लावण्यास तयार व्हावें अशा तऱ्हेच्या फुसलावणुकीच्या गोष्टी सांगू लागला. इतकेंच करून हा नराधम राहिला नाहीं; तर त्याची पाप वासना अनावर होऊन आंगावरचें वस्त्रही त्यानें ओढून फाडलें. परंतु मी जेव्हां त्याजला वश होईना, तेव्हां तो मला ह्मणालाः—हे अभागी स्त्रिये, माझ्या सारख्या तरुण पुरुषास टाकून वयातीत होण्याच्या पंथास लागलेल्या माझ्या भावाची तूं स्त्री झालीस हा मोठाच वेडेपणा केलास. आतां ह्या गोष्टीचा जर तुला पश्चात्ताप होत असेल तर सांग ह्मणजे मझा भाऊ पाणी घेऊन आल्याबरोबर त्यास यसमदनीं पोंचवितों.

हें त्या वेषधारी स्त्रीचें कपटी भाषण ऐकतांच आपल्या भावाच्या सच्छीलतेचा विचार न करितां तो वडील भाऊ शस्त्र उपसून धाकट्या भावाच्या आंगावर धांवला. हा त्याचा वेडेपणा पाहून धाकट्या भावानें त्यास सामोपचारानें खरी हकीगत सांगितली. परंतु त्याची खात्री झाली नाहीं हें पाहून त्यानें ही आपली तरवार बा

हेर काढली. पुढें कांहीं वेळ उभयतांचें निकरानें युद्ध झाल्यावर दोघेही एकमेकांच्या हातून मरण पावले. इतका प्रकार होतांच त्या स्त्रीनें ह्मशीचें रूपांतर केलें. हें पाहून **हातिमास** फारच आश्चर्य वाटलें. नंतर ती म्हैस कांहीं वेळानें एका खेडे गांवत गेली, आणि तेथें तिनें मोठी धांदल मांडली. तेव्हां त्या गावांतील जे लोक तिला धरावयास गेले त्यांस तिनें शिंगांनीं फाडून यम–लोकीं पाठविलें. इतकें कृत्य झाल्यावर ती ह्मैस अरण्यांत गेली. तेव्हां तिनें एका वृद्ध मनुष्याचें रुपांतर केलें. हें पाहून **हातीम** धांवतधांवत त्या **वृद्ध** मनुष्याजवळ गेला. त्यास पाहून **वृद्ध** मनुष्य ह्मणालाः–हे **हातिमा,** तुझी काय इच्छा आहे? **हातीम** ह्मणालाः–**महाराज,** सप्तरंगी नागाच्या रुपापासून वेळोवेळीं अनेक प्रकारचीं रुपें धारण करून हजारों प्राण्यांस मृत्युसदनीं पाठविलें ही इतकी हत्या करण्याचें कारण कळावें इतकीच माझी इच्छा आहे. **हातिमाचें** हें भाषण ऐकून वृद्ध मनुष्य ह्मणालाः—या गोष्टीची चौकशी करण्याचें तुला कांहींच प्रयोजन नाहीं. कारण कालांतरानें तुझी व माझी केव्हांतरी भेट होईल तेव्हां तुला या गोष्टीचें खरें इंगित कळेल. यास्तव आतां विशेष उहापोह न करितां तूं आपल्या कार्यास जा.

इतकें जरी बोलला तरी **हातिमानें** त्याचा पिच्छा सोडला नाहीं. हें पाहून तो वृद्ध मनुष्य ह्मणालाः–**हातिमा,** ज्याला '**यम**' अशी संज्ञा आहे तोच मी आहें. प्रत्येक प्राणीमात्राचा मृत्यु ज्या ज्या वेळीं व ज्याज्यारीतीनें व्हावा असें त्याच्या दैवीं लिहिलें असेल, त्याचा त्या त्या वेळीं अंत करण्याकरितांच मला निरानिरळीं रूपें घ्यावीं लागलीं. जगन्नियंत्यानें प्राणिमात्रच्या स्वाधीन इच्छित क्रियाकर्मे करण्याचें ठेवलें नांहीं. सारांश, **ब्रह्मदेवानें** ललाटीं जें लेखन केलें असेल त्याप्रमाणें अंतकाळपर्यंत स्थिति व्हावयाची. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—माझा मृत्यु कोणच्या स्थितींत आहे. हें जर मला कळवाल तर मजवर मोठ उपकार होतील. **हातिमाचें** हें अतिशय आस्थेचें बोलणें ऐकून **यम** ह्मणालाः—**हातिमा,** तुला एकंदर दोनशें वर्षें आयुष्य असून त्या पैकीं तुझें निम्मेसुद्धां आ-

युष्य कमी झालें नाहीं. तथापि ज्यावेळेस तुझा अंतकाल होण्याचा समय जवळ येईल त्या वेळेस तुझ्या नाकपुड्यांतून रक्त वाहूं लागेल. परंतु अशी स्थिति कांहींवेळ होऊन पुन्हां बंद पडेल व नेहमीं प्रमाणें तूं दानधर्म करूं लागशील. नंतर फिरून कांहीं वेळानें नाकांतून रक्तस्राव होऊन तुझा अंत होईल. असो, आतां पुढील होणाऱ्या भवितव्याविषयीं विशेष काळजी न करितां जेणेंकरून लोकांचें दुःख निवारण होईल अशा रीतीनें वर्तत जा; ह्मणजे तुझें कल्याण होईल. इतकें बोलून तो वृद्ध मनुष्य नाहींसा झाला.

हा चमत्कार पाहून **हातिमानें** बराचवेळ ईशस्तवन केलें. नंतर तो तेथून उद्देश—सिध्यर्थ मार्ग —क्रमूं लागला. जातां जातां कांहीं दिवसांनीं त्यास एक काळया रंगाचें अरण्य लागलें. त्या अरण्यांतून जात असतां कृष्णवर्णाचा एक अतिशय मोठा सर्प त्याच्या अंगावर धांवून आला. तेव्हां **हामीर** राजानें दिलेला राजदंड त्यानें जमिनीवर टाकला. त्यामुळें जरी तो सर्प **हातिमाशीं** अगदीं लगट करी, तरी त्या पासून त्यास कांहीं एक इजा न होतां थोडक्या वेळानें तो तें अरण्य सोडून श्वेत अरण्यांत येऊन पोहोंचला. तें अरण्य पांढरें शुभ्र असून तेथेंही पांढऱ्या रंगाचाच विशाळ देही सर्प रहात होता. **हातिमास** पहातांच तो सर्प त्याच्या आंगावर धांवून आला. परंतु त्यानें पूर्वींप्रमाणेंच राजदंड जमिनीवर टाकल्यामुळें त्या अरण्यांतूनही तो सुरक्षित रीतीनें पार पडून कांहीं दिवसांनीं पिंवळ्या रंगाचें व हिरव्या रंगाचें अशीं दोन्हीं अरण्यें राजदंडाच्या योगानें तेथील त्या त्या रंगाच्या महाभयंकर सर्पापासून इजा न पावतां लाल रंगाच्या अरण्यांत येऊन दाखल झाला. त्या अरण्यातील झाडें, दगड, जमीन आदिकरून सर्व वस्तू हिंगुळाप्रमाणें लाल होत्या. व तेथें अतिशय ऊष्णता होती. त्यामुळें **हातिमास** बरीच इजा होऊं लागली. तथापि, परदुःख निवारण्याच्या कामीं आपणास कितीही संकटें आलीं तथापि होईल तेथपर्यंत हातीं घेतलेलें काम अर्धवट सोडावयाचें नाहीं हा जो महाजनांचा सांप्रदाय त्यास अनुसरून **हातीम** हा मार्ग—क्रमण करीत होता. परंतु जेव्हां ऊष्णतेच्या अतिशय तापानें व तृषेनें त्याचा प्राण

व्याकुळ झाला तेव्हां मात्र तो बेशुद्ध होऊन पडला. इतक्यांत तेथें एक वृद्ध मनुष्य उत्पन्न होऊन **हातिमास** उठवून झणालाः—अरे, असें वेड्यसारखें काय करतोस? **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं तों डांत धर झणजे या उष्णतेची तुला बिलकुल इजा होणार नाहीं.

हें त्या **वृद्ध** मनुष्याचें भाषण ऐकून **हातिमानें** आस्वल कन्येनें दिलेलें मोतीं तोंडांत धरलें. त्याबरोबर उष्णतेपासून होणारी इजा बंद होऊन त्यास जराशी हुशारी आली. नंतर तो त्या **वृद्ध** मनुष्यास झणालाः—या अरण्यांत इतकी उष्णता कोठून आली तें मला सांगा. **हातिमाचें** हें भाषण ऐकून तो वृद्ध मनुष्य झणालाः—ह्या अरण्यांत महाबलाढ्य असे रक्त वर्णाचे असंख्यात नाग आहेत. ते श्वासोच्छ्वास करूं लागले झणजे त्यांच्या तोंडांतून अग्नीच्या भयंकर ज्वाळा निघतात. त्यामुळें येथें अतिशय उष्णता असून येथील सर्व पदार्थ तांबड्या रंगाचे दिसतात. इतकें बोलून तो **वृद्ध** मनुष्य गुप्त झाला, नंतर परमेश्वर स्तवन करून **हातीम** पुढें मार्ग—क्रमूं लागला. जातां जातां जेव्हां तो त्या अरण्याच्या मध्यभागीं आला तेव्हां हजारों रक्तवर्णाचे सर्प त्याच्या आंगावर धांवून आले व अग्नीच्या योगानें **हातिमाची** राख रांगोळी व्हावी झणून ते तोंडावाटे एक सारख्या अग्नीच्या ज्वाळा सोंडूं लागले. परंतु **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं **हातिमाच्या** तोंडांत असल्यामुळें त्या पासून त्यास बिलकुल इजा झाली नाहीं. पुढें त्या सर्व नागांत जो मुख्य **नाग** होता त्याच्या तोंडांत एक **हिरा** होता. तो पाहतांच 'आपली इच्छित वस्तु ती हीच.' असें **हातिमास** वाटून त्यानें **हामीर** राजानें दिलेला राजदंड त्या मुख्य सर्पाच्या आंगावर फेंकला. राजदंडाचा फटका त्या **नागास** बसतांच सभोंवतालचे सर्व नाग भयाभीत होऊन तेथून पळाले. आणि मुख्य नाग फारच व्याकुळ होऊन त्यानें आपल्या तोंडातील हिरा खालीं टाकून पलायन केलें.

आपली इच्छित वस्तू थोडक्याच आयासानें प्राप्त झाली असें पाहून **हातिमास** अतिशय आनंद होऊन त्यानें तो हिरा उचलून

आपल्या पागोत्याच्या पदरांत घट्ट बांधला. त्या हिऱ्याच्या आंगीं हजारो प्रकारचे विलक्षण गूण होते. ते असे कीं, 'ज्याच्या जवळ तो हिरा असेल तो मनुष्य कितीही खोल पाण्यांत पडला तरी बुडणार नाहीं. दुसरा, अग्नि पासून बाधा होणार नाहीं. तिसरा, आंधळ्यांस दृष्टी येणें. चौथा, विषारी प्राण्यांपासून इजा न होणें. पांचवा, सदोदित जय असणें' सारांश, असा अनेक गुणसंपन्न हिरा हातीं येतांच **हातीम** तेथून निघाला. आणि ज्याठिकाणीं तो शिपायी होता तेथें आला. नंतर प्रवासाची व रक्तारण्याविषयींची सर्व खबर त्यास सांगून तो हिरा त्याज पाशीं देऊन ते उभयतांही जादूगार राजाकडे आले. आणि सर्व हकीगत निवेदन करून त्यानें तो हिरा त्याचे स्वाधीन केला. हिरा हातीं येतांच राजान रक्तारण्याविषयीं फारच बारकाईनें चौकशी केली. परंतु **हातिमानें** सर्व खुणाखाणा यथास्थित रीतीनें सांगितलेल्या होत्या; ह्मणून जादूगाराच्या मनाप्रमाणें त्या शिपायानें उत्तरें दिलीं. तीं ऐकून राजा ह्मणालाः—आतां काय तो माझा एकच करार राहिला आहे त्याचा निकाल करा ह्मणजे तुमची इच्छित वस्तु तुह्मांस प्राप्त होईल. हें ऐकतांच त्या कराराप्रमाणें वर्तण्याची शिपायानें इच्छा दर्शविल्याबरून एक मोठी थोरली तेलानें भरलेली कढई चुलीवर तापत ठेवण्याविषयीं राजानें आपल्या सेवकांस सांगितलें. इकडे तो शिपायी **हातिमा**जवळ येऊन सर्व हकीगत सांगून ह्मणालाः—आजपर्यंतच्या दोन्हीं प्रश्नांचा आपण होऊन निकाल केलात. परंतु तप्ततैल कटाहांत मला स्वतःलाच उडी टाकावी लागणार. तेव्हां आतां कसें होईल? याची मला मोठी काळजी पडली आहे. हें ऐकतांच **हातीम** ह्मणालाः—त्या विषयीं तूं बिलकुल काळजी करूं नको. असें ह्मणून त्यानें **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं शिपायास देऊन सांगितलें कीं, हें मोतीं तोंडांत धरून तूं बेधडक कढईत उडी टाक. ह्मणजे त्या तप्ततेलापासून बिलकुल इजा होणार नाहीं. हें **हातिमाचें** सांगणें प्रथमतः त्या शिपायास खरें वाटेना. परंतु त्यानें शपथ घेऊन सांगितल्यावरून तो शिपायी तेथून निघून ज्याठिकाणीं तप्ततैलकटाह

होता तेथें आला. आणि हातिमाच्या सांगण्यावर विश्वास ठेऊन राजासमक्ष त्यानें त्या कढईंत उडी टाकली. तेव्हां मोत्याच्या योगानें उष्णतेची बिलकुल इजा न होतां तो शिपायी कढईतल्या-कढईंत इकडून तिकडे फिरूं लागला. हें पाहून जादूगार राजास अतिशय आश्चर्य वाटलें. नंतर कांहींवेळ गेल्यावर त्यानें त्या शिपायास बाहेर निघण्यास सांगितलें. शिपायी सुरक्षित रीतीनें बाहेर पडला हें पाहून आतां आपली कन्या याजला द्यावी लागेल हें त्याच्या मनांत येऊन मंत्राच्या योगानें शिपायास मारण्याचा तो यत्न करूं लागला. हें त्याचें कृत्रिम पाहून हातीम पुढें हो-ऊन ह्मणालाः—हे राजा, तूं कितीही जादूचा प्रयोग केलास तरी जो पर्यंत ह्या शिपायाजवळ जादूचा नाश करणारें मोतीं आहे तों-पर्यंत तुझें कांहींएक न चालतां उलट नाश मात्र होईल. हातिमा-चें भाषण ऐकून तो जादूगार फारच चकित झाला. नंतर त्यानें सुमुहूर्त पाहून प्रतिज्ञेप्रमाणें आपल्या कन्येबरोबर त्या शिपायाचें लग्न लावून सर्व राज्य आंदण दिलें.

पुढें चार दिवस सुखसोहळा झाल्यावर हातीम त्या सर्वांचीं रजा घेऊन तेथून निघाला आणि मजले मजलेनें कांहीं दिवसांनीं अलका पर्वताजवळ आला. तो पर्वत इतका मोठा व उंच होता कीं, उंच उडणाऱ्या पक्ष्यांच्यानेंही त्याचें उल्लंघन करवणार नाहीं. मग इतरांची ती काय कथा !! असो, अशा गगनभेद्य पर्वताच्या पायथ्याशीं आल्यावर कसें वर चढतां येईल याविषयीं तो विचार करीत उभा राहिला. इतक्यांत त्या पर्वताच्या एका बाजूस कांहीं गंधर्वस्त्रिया हवा खाण्याकरितां आलेल्या त्याच्या नजरेस पडल्या-वरून हळू हळू तो त्यांचे जवळ गेला. तेव्हां एकाएकीं त्या ना-हींशा झालेल्या पाहून हातीम वेड्यासारखा आसपास पाहूं लागला. तों त्याचे दृष्टीस एक संगमरवरी दगडानें बांधलेलें विवर पडलें. त्यावेळीं विवरांत उतरण्याची इच्छा होऊन तो त्या विवरद्वाराशीं जाऊन तेथील फरसबंदीवर उताणा पडला. त्याबरोबर एकसारखा घसरत घसरत संध्याकाळच्या सुमारास तो एका सपाट मैदानावर उभा राहिला. तेव्हां त्यानें आपले नेत्र उघडून पाहिलें तों एक

मोठा सुंदर बाग त्याच्या नजरेस पडला. परंतु त्यावेळीं रात्र झाली होती ह्मणून तो तेथेंच निजून राहिला. पुढें उजाडल्यावर त्या अनोळखी प्रदेशांतून फिरत असतां कांहीं वेळानें एक रमणीयमहाल त्याच्या दृष्टीस पडल्यावरून तो तेथें गेला. तेव्हां पूर्व दिवशीं पर्वतावर पाहिलेल्या गंधर्वस्त्रिया त्याच्या नजरेस पडल्या. इतक्यांत त्या स्त्रियांचीही नजर हातिमावर जाऊन त्या, त्यास 'तूं कोण? कोठून आलास? व येथें येण्याचा रस्ता तुला कोणी दाखविला?' असें विचारूं लागल्या. तेव्हां हातीम ह्मणालाः—मी एक फिरस्ता मनुष्य असून अलकापर्वताची शोभा पहाण्यास्तव आलों होतों. त्यावेळीं पर्वतावर तुह्मांस फिरतांनां पाहिल्यावरून मीही वर चढलों. इतक्यांत तुह्मी अदृश्य झालांत. सबब मी तुमचा शोध करीत फिरत असतां एक गुहा माझ्या नजरेस पडली. तेव्हां त्या गुहेच्या मार्गानें मी ह्या ठिकाणीं आलों. आतां तुह्मी कोण? व ह्या प्रदेशाच्या अधिपतीस काय ह्मणतात? येवढें कळविल्यास मजवर मोठें उपकार होतील.

हातिमाचें हें भाषण ऐकून त्या गंधर्वस्त्रिया ह्मणाल्याः—ह्या प्रदेशास अलका असें ह्मणतात व येथें अलकनूपरी ह्या नांवाची राणी राज्य करीत असते. हा जो बाग आहे तो तिनें वसंतऋतूंत विश्रांति घेण्याकरितांच तयार केला असून त्याचा योग्य बंदोबस्त ठेवण्याच्या कामीं आमची योजना केली आहे. उद्ईक अलकनूपरी ही ह्या बागेंत रहावयाकरितां येणार आहे तरी तूं आतां येथून कोठेंतरी निघून जा. कारण जर तूं तिच्या नजरेस पडलास तर तुला व आह्माला योग्य शासन केल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. हें त्यांचें भाषण ऐकतांच हातीम ह्मणालाः—हे स्त्रियांनों, प्राणांत संकटें सोसून जो मी अलकनूपरीची भेट घेण्याकरितां येथें आलों आहे तो जीविताचें भय बाळगून पळण्याकरितां आलों नाहीं. जरी तुमची मालकीण येथें येऊन मला शिक्षा करूं लागली तरी त्याविषयीं मी बिलकुल पर्वा करीत नाहीं. मात्र एकवेळ तिची भेट झाली ह्मणजे बस आहे. हातिमाचें हें निग्रहाचें भाषण ऐकून हा कोणीतरी वेडा मनुष्य असावा

अशी त्यांची समजूत होऊन त्यांस फारच राग आला व त्या **हातिमास** बुक्यांनीं मारूं लागल्या तरी **हातीम** तेथून एक पाऊलसुद्धां हालला नाहीं इतकेंच नाहीं; तर‘ तुह्मी मला कां मारतां ?’ असेंही बोलला नाहीं. हा त्याचा चमत्कारिकपणा पाहून गंधर्वस्त्रियांस थोडीशी दया आली. नंतर त्या ह्मणाल्या:—जर तुला राणीची भेटच घ्यावयाची असेल तर आह्मीं सांगूं तेथें जाऊन रहा ह्मणजे ती तुझ्या नजरेस पडेल. **हातिमानें** हें त्यांचें ह्मणणें मान्य केल्यावरून त्या त्यास घेऊन बागेंत गेल्या; आणि एका गुप्तस्थळीं त्यास रहावयास सांगून कांहीं खाण्याचे पदार्थ आणून दिले. ते खाऊन थोडीशी विश्रांती घेतल्यावर **हातीम** फारच चमत्कारिक व मनोवेधक अशा गोष्टी त्यांस सांगूं लागला. त्या ऐकून हा कोणीतरी चतुर मनुष्य आहे असें समजून त्या स्त्रिया **हातिमास** येण्याचें व **अलकपन्‌री**ची भेट घेण्याचें कारण विचारूं लागल्या. त्यावरून **हातिमानें** त्यांस सर्व हकीगत निवेदन केली. ती ऐकून त्या **गंधर्वस्त्रिया** ह्मणाल्या: आमची धनीन येथें आली ह्मणजे आह्मी तुझे हातपाय बांधून तुला तिच्या समोर नेऊं मग तुझ्या मित्राच्या संबंधानें जें तुला बोलावयाचें असेल तें तूं तिच्याजवळ बोल. ह्मणजे अनायासानें तुझा कार्यभाग होऊन आह्मीं तुझें संरक्षण केलें असें होणार नाहीं. हें त्या स्त्रियांचें बोलणें **हातिमानें** मान्य केलें.

नंतर दोनतीन दिवस गेल्यावर **अलकन्‌परी** आपल्या परिवारासह मोठ्या थाटानें त्या बागेंत रहावयाकरितां आली. पुढें भेटीकरितां आलेल्या कित्येक लोकांबरोबर ती बोलत आहे अशी संधी पाहून एक गंधर्वस्त्री **हातिमा**जवळ जाऊन ह्मणाली:—आमच्या राणीची भेट घेण्याची जी तुमची इच्छा आहे ती पूर्ण होण्याची ही संधी उत्तम आहे; यास्तव मजबरोबर चला. हें तिचें भाषण ऐकतांच **हातिमास** आतिशय आनंद होऊन तो तिजबरोबर जाण्यास सिद्ध झाला. नंतर त्या गंधर्वस्त्रीनें त्यास एका आडमार्गानें नेऊन **अलकन्‌परि** ज्या **सिंहासना**वर बसली होती त्या **सिंहासना**समोर कोणास न दिसेल अशा जागीं तिनें त्यास बसविलें.

**अलन्‌कपरी** राणीचें अप्रतिम **सौंदर्य** व विलक्षण तेज पाहून **हातीम** अतिशय कामातुर होऊन निचेष्ट पडला. तात्पर्य, ज्या तरुणाच्या कामिक व्यथेचें निवारण करण्याकरितां **हातीम** तेथें आला होता, त्याचें काम पूर्णतेनें बजवावयाचें सोडून उलटा हाच तिच्या सौंदर्यास लुब्ध होऊन मुर्छित झाला. असो, अशा स्थितींत **हातीम** असतां एक सिद्ध तेथें उत्पन्न होऊन ह्मणाला:—हे **हातिमा,** ज्या कार्यासाठीं प्राणांत संकटें सोसून तूं येथें आला आहेस, तें कार्य एकीकडे ठेवून पंचशर–प्रभावानें व्याकुळ होऊन निश्चेष्ट पडलास? अरे, आजपर्यंत दुसऱ्याचें दुःख निरसन करण्या करितां आपल्या आयुष्याचा व्यय तूं केलास; आणि आतां मी कोण व माझें कर्तव्य काय? हें विसरून ईश्वराची भीति न बाळगितां असा मूर्छित होऊन पडलास या तुझ्या वेडेपणास काय ह्मणावें!

हें त्या **सिद्धाचें** भाषण ऐकून **हातीम** खडबडून उठला आणि पहातो तों ज्यानें आपल्याला हा सदुपदेश केला तो कोठें दिसत नाहीं! असें पाहून त्यानें आपणाला अशी कुबुद्धि न देण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना केली. इतक्यांत त्या रखवालदार गंधर्वस्त्रिया **हातिमा**जवळ येऊन ह्मणाल्या:—जर तुला राणीची भेट घ्यावयाची असेल तर तुझे हातपाय बांधून आह्मी तिजकडे नेण्यास तयार आहों. **हातीम** ह्मणाला:—ठीक आहे. मग त्या स्त्रियांपैकीं एक स्त्री **अलकन्‌परी** जवळ जाऊन ह्मणाली:—आज एक मानव आपल्या बागेंत आला होता. तो कोठून आला व त्याला येथें येण्याचा मार्ग कोणी दाखविला हें आह्मांस माहीत नाहीं. तथापि आह्मी त्यास बांधून ठेवलें आहे. जशी आपली आज्ञा होईल त्याप्रमाणें तजवीज करूं. हें त्यांचें भाषण ऐकून **अलकन्‌परीनें** विचार केला कीं, पूर्वीं मी एका मनुष्यास सात दिवसांनीं परत येतें असें वचन दिलें असून आजपर्यंत गेलें नाहीं. यास्तव तो माझा शोध करीत येथें आला असेल. असा विचार करून तिनें त्यास घेऊन येण्यास सांगितलें. **कलकन्‌परीची** आज्ञा होतांच ती स्त्री **हातिमा**जवळ गेली आणि त्यास एखाद्या बंदिवानाप्रमाणें आणून राणीच्या **सिंहासनासमोर** उभें केलें. तेव्हां **हाति-**

मास पहातांच 'हा आपला प्रियकर नाहीं.' अशी तिची खात्री झाली. मग तिनें आपलें **सिंहासन** आणावयास सांगून तें आणल्यावर **हातिमास** त्याजवर बसावयास सांगितलें. त्याप्रमाणें तो बसल्यावर **अलकन्परी** ह्मणालीः—महाराज, आपण कोण, कोठून आलां? व इतका लांबचा प्रवास करण्याचें कारण काय? तें मला कळवावें. हें तिचें मधुर भाषण व अप्रतिम सौंदर्य पाहून **हातीम** अगदीं वेडा होऊन गेला. आपल्या विचारलेल्या प्रश्नांचें उत्तर न मिळण्याचें कारण राणीच्या तेव्हांच लक्षांत येऊन ती पुनः पूर्वीप्रमाणेंच विचारूं लागली. तेव्हां **हातीम** विचार-शक्तीनें आपल्या मनाचें आकलन करून ह्मणालाः—मी **इमन**देशाहून आलों असून माझें नांव '**हातीम**' असें आहे. **हातिमाचें** हें भाषण ऐकतांच **अलकन्परी** तावडतोब **सिंहासनावरून** उठली, आणि मोठ्या नम्रतेनें **हातिमास** आपल्या **सिंहासनावर** बसवून ह्मणालीः—हे महापराक्रमी व परदुःख-निवारक **हातिमा**, आपली कीर्ति आज बरेच दिवस मी ऐकत होतें; परंतु ईशसत्तेनें प्रत्यक्ष भेटीचा लाभ झाला येणेंकरून मी आपणास मोठी भाग्यवान् समजतें. असो, ज्या कामाकरितां आपण येथें आलां आहां तें काम निर्धास्त रीतीनें मला कळवावें. त्याविषयीं मला बिलकुल राग येणार नाहीं.

**अलकन्परीचें** हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—आपलीही कीर्ती आजपर्यंत माझ्या पुष्कळवेळां ऐकण्यांत आली आहे. तिचें वर्णन जर मी करूं लागलों तर तें माझ्यानें होणार नाहीं. असो, आतां मी कोणत्या कामा करितां येथें आलों आहें हें समजून घेण्याची आपली इच्छा आहे तर सांगतों, इकडे लक्ष द्यावें. कांहीं दिवसांमागें **हिमयार** अरण्यामध्यें मी जात असतां वाटेमध्यें एका संगमरवरी दगडाच्या चौथऱ्यावर एक मनुष्य उभा राहून मोठ्यानें विलाप करीत असलेला पाहिला. त्यावरून मला त्याची अतिशय दया येऊन त्याच्या दुःखाचें कारण विचारून घेण्याच्या उद्देशानें मी त्याजवळ जाऊन विचारूं लागलों! परंतु तो दुःखी मनुष्य क्षणोक्षणीं "अगे प्राणवल्लभे, ये ये! कारण तुजवांचून

मला हें सर्व जगत् शून्यवत् भासत आहे. ” असें ह्मणत होता. पुढें मी त्याजला जेव्हां एकदोनवेळां दुःखाचें कारण विचारलें तेव्हां तो ह्मणालाः—“ **अलकन्परी** नामक एका गंधर्वस्त्रीची व माझी सुमार दोनतीन महिने मैत्री जडली होती. परंतु एके वेळीं ती ‘ सात दिसांनीं परत येतें ’ असें सांगून येथून निघून गेली; ती आज सात वर्षें झालीं तरी आली नाहीं. आतां तिच्या शोधास जर मी जावें तर तिनें जातेवेळीं या ठिकाणावरून हालूं नको असें मला निक्षून सांगितलेलें असल्यामुळें माझा नाइलाज आहे. परंतु जर येथेंच तिची वाट पहात रहावें तर पंचशराच्या तडाक्यानें माझें ह्रदय अगदीं करपून गेल्यामुळें चैन पडत नाहीं. ” अशी त्यानें आपली हकीगत मला सांगितली. त्यावरून व त्याच्या स्थितीकडे पाहून त्याच्या दुःखाचें निरसन करावें एतदर्थ मी हे एवढे अकटोविकट श्रम करून येथें आलों आहें. आतां जसें आपल्या मर्जीस येईल तसें करा.

हातिमाचें हें भाषण ऐकून **अलकन्परी** ह्मणालीः—ज्या दिवसापासून मी येथें आलें त्या दिवसापासून मला तिकडे जाण्याची आठवणच राहिली नाहीं; ह्मणून माझ्या हातून हा प्रमाद घडला. परंतु त्या मनुष्याच्या संबंधानें जर वास्तविक विचार केला तर तुमचें ह्मणणें मला थोडेसें चमत्कारिक वाटतें. कारण, माझ्याविषयीं त्याच्या मनांत जर पूज्यबुद्धि वास्तव्य करीत असती तर मग आज सात वर्षें तो केवळ माझ्या येण्याचीच वाट पहात बसला नसता. कारण माझें नांव, राहण्याचें ठिकाण, हें जर माहीत होतें तर त्यानें माझा शोध करीत यावयाचें होतें; यास्तव ज्याअर्थी तो आला नाहीं त्याअर्थी खऱ्या प्रीतीचें व दृढ निश्चयाचें दिग्दर्शन होत नाहीं. अलकन्परीचें हें भाषण ऐकून हातीम ह्मणालाः—आपणाविषयीं जर त्याच्या मनांत पूज्यबुद्धि नसती तर आज सात वर्षें तो केवळ रस्त्याकडे नजर लावून व अश्रांत श्रम सोसून अन्नपाण्याविरहीत एकसारखा दुःख करीत तेथें राहता ना. आतां त्यानें तुझा शोध करीत येथें यावयाचें, परंतु “ येथून कोठेंही जाऊं नको, कारण मी आलें असतां तूं जर

मला येथें दिसला नाहींस तर परत जाईन. " अशी त्याला तूं सक्त ताकीद दिली होतीस. सबब तो त्या ठिकाणींच वचनाप्रमाणें तुझ्या येण्याची वाट पहात राहिला, ह्यांत त्याची फारशी चूक नाहीं. हें हातिमाचें भाषण ऐकतांच **अलकनूपरी** निरुत्तर होऊन स्तब्ध राहिली. पुढें कांहींवेळ गेल्यावर ती ह्मणाली:—तुह्मी त्या मनुष्याविषयीं सांगितलेल्या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. परंतु अतःपर माझें मन त्याच्या बरोबर कोणत्याही रीतीचा संबंध ठेवण्याविषयीं अनुमोदन देत नाहीं. आतां ज्या अर्थीं तुह्मी इतके श्रम सोसून त्याच्याविषयीं रदबदली करण्याकरितां येथें आलां आहां त्या अर्थीं मी त्यास फक्त येथें राहूं देईन. याच्यापलीकडे मी कांहीं एक करणार नाहीं. **अलकनूपरीचें** हें भाषण ऐकून **हातिमास** थोडा राग येऊन तो ह्मणाला:—प्रथमतः प्रीतीचा पाश टाकून मागाहून कोणत्याही प्रकारचा अपराध नसतां मदनाच्या तीक्ष्ण बाणानें क्षीण होऊन रात्रंदिवस झुरणीस लावण्यास जर तुझा दृढ निश्चय असला तर तुझ्या दाराशीं उपोषीत राहून अंतकाल होईपर्यंत ह्या तुझ्या विश्वास घातकी कृत्याबद्दल मी परमेश्वराजवळ गाऱ्हाणें सांगेन. असें ह्मणून तो तेथून निघाला आणि बागेंत जाऊन एका वृक्षाखालीं सात दिवस एकसारखा उपोषित राहिला. सातवे दिवशीं रात्रीच्या वेळीं **हातीम** स्वस्थ निजला असतां त्याच्या स्वप्नांत एक सिद्ध पुरुष येऊन ह्मणाला:—अरे **हातिमा** असा वेड्यासारखा उपास करीत कां राहिलास? तुझ्या मित्राला **अलकनूपरीकडून** येथें आणीव आणि एका स्वच्छ पाण्यानें भरलेल्या पेल्यांत **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं टाकून तें पाणी त्या मनुष्याच्या हातून **अलकपनूरीस** प्यावयास दे; ह्मणजे तिची त्याजवर पूर्ववत् प्रीति होईल. ही स्वप्नस्थिती पाहून **हातीम** तावडतोब जागा होऊन जगन्नियंत्या परमेश्वराची स्तुति करूं लागला. नंतर कांहींवेळानें उजडल्यावर **अलकनूपरी** ज्या ठिकाणीं **हातीम** निजला होता तेथें आली आणि ह्मणाली:—अहो **हातीम,** तुह्मी असे उपास करीत येथें राहिलांत तर थोडक्याच दिवसांत अन्नपाणी न मिळाल्यामुळें क्षीण होऊन स्वर्गवासी व्हाल. आणि

असें झालें ह्मणजे मी तुमचा प्राण घेतला असें होऊन सर्वशक्तिमान परमेश्वराजवळ मला या गोष्टीचा जाब द्यावा लागेल. तेव्हां मी काय करावें बरें? हें तिचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—**राणीसाहेब**, आतां एवढें तरी करा कीं, माझ्या त्या प्राणप्रिय मित्रास येथें आणवा ह्मणजे नुसता आपला मुखचंद्र पाहून तरी तो समाधान मानील. **हातिमा**चें हें भाषण **अलकन्‌परी**नें तावडतोब मान्य करून आपल्या कांहीं दासींस हांक मारली, आणि सर्व खुणा सांगून **हातिमा**च्या मित्रास घेऊन येण्याविषयीं त्यांस आज्ञा केली. आपल्या धनीनीची ही आज्ञा ऐकतांच त्या दासी पवनगतीनें ज्या ठिकाणीं तो दुःखी मनुष्य होता तेथें गेल्या, आणि त्याजला सर्व हकीगत निवेदन केली. ती ऐकतांच तो दुःखी मनुष्य **हातिमा**चे अतिशय आभार मानून त्या दासींबरोबर जाण्यास सिद्ध झाला. नंतर पूर्ववत् त्या दासी दुःखी मनुष्यास घेऊन **अलकनपरी**च्या महालांत येऊन दाखल झाल्या त्यावेळीं राणीचा मुखेंदु पाहून तो दुःखी मनुष्य आपली सर्व स्थिति विसरून हर्षवायूच्या योगानें मूर्छित होऊन निचेष्ट पडला. ही त्याची स्थिति पाहून **अलकनपरी**नें त्याच्या आंगावर गुलाबपाणी शिंपडून त्यास सावध केलें. नंतर ती त्यास ह्मणालीः—हे तरुणा, माझें सौंदर्य पाहण्याची जी तुझी इच्छा आहे ती तूं पूर्ण करून घे. त्या विषयीं मी तुला कधींही हरकत करणार नाहीं. हें तिचें भाषण ऐकून त्या तरुणानें तो सर्व दिवस अन्नपाण्याविरहित केवळ **अलकनपरी**चा मुखचंद्र पाहाण्यांतच घालविला. पुढें संध्याकाळ झाल्यावर राणीच्या सांगीवरून ज्या दिवाणखान्यांत उत्तम प्रकारची आरास केली होती तेथें सर्व मंडळी जाऊन बसली. नंतर कांहींवेळानें वारांगनेच्या नृत्यास सुरवात झाली. असा हा आनंदाचा प्रकार सुरू झाला असतां कामदेवाच्या प्रभावानें **हातिमा**चा मित्र फारच विव्हळ झाला. ही त्याची स्थिति पाहून **हातिमा**नें एक पंचपात्री भरून पाणी आणलें; आणि त्यांत आपल्या जवळचें मोतीं कांहींवेळ ठेवून तें पाणी त्या दुःखी मनुष्याजवळ दिलें; व त्यास सांगितलें कीं, **अलकन्‌परी**च्या सिंहासनाजवळ जो सुवर्णकलश

उदकानें भरलेला आहे त्यांत हें पाणी नेऊन टाक ह्मणजे तुझी मनोव्यथा निरसन होईल. हें त्याचें भाषण ऐकतांच तो मनुष्य मोठ्या आनंदानें तें पाणी घेऊन जेथें सुवर्णकलश होता तेथें गेला आणि गफलतिनें त्यानें तें पाणी त्या तांब्यांत ओतलें. हें त्याचें कृत्य ताबडतोब एका अप्सरेनें पाहिलें व त्याजबद्दल तिनें त्यास निषेधही केला. परंतु त्या मनुष्यानें मोठ्या खुबीनें तिचें समाधान केलें.

इतका प्रकार होऊन कांहीं वेळ गेल्यावर एक दासी पाणी पिण्याच्या इराद्यानें त्या तांब्याजवळ गेली; आणि पेल्यांत पाणी ओतून तोंडास लावणार इतक्यांत **हातीम** ह्मणालाः—हे **स्त्रिये**, तूं दासी असून हें तुझें करणें थोडेसें उद्दामपणाचें आहे. कारण तुझ्या यजमानणीला पिण्याकरितां जें पाणी ठेवलेलें त्याचा तिनें अंगिकार केल्याशिवाय अगोदर पिणें हें चांगलें नाहीं. **हातिमाचें** हें भाषण ऐकून **अलकन्परीस** मोठें आश्चर्य वाटलें. पुढें कांहींवेळ गेल्यावर राणीस तहान लागल्यामुळें तिनें एका दासीस पाणी पिण्यास आणण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तिनें आणून दिल्यावर **अलकन्परी** तें पाणी प्याली. हें पाहून **हातिमास** फारच आनंद झाला. कारण **सिद्धानें** सांगितल्याप्रमाणें त्या **मोत्याचें** पाणी तिच्या पोटांत गेलें, ह्मणजे अर्थांतच आपला मित्र कामिक विकारांपासून मुक्त होईल. आणि तसें झालें ह्मणजे आपण जे एवढे श्रम केले आहेत त्याचें सार्थक होईल, असें **हातिमास** वाटलें. असो.

इकडे **मोत्याचें** पाणी **अलकन्परीच्या** पोटांत जाऊन थोडा-वेळ झाला नाहीं तोंच **कामदेवानें** तिच्या शरीरांत संचार केल्या-मुळें एकाएकीं ती **सिंहसनावरून** उठली आणि **हातिमाच्या** मित्रास दृढालिंगन देवूं लागली. हें पाहून **हातीम** ह्मणालाः—हे अप्सरे, इतका वेळ तूं माझ्या मित्राचा तिरस्कार करीत होतीस आणि आतांच हें असें विपरीत कृत्य कां करूं लागलीस ? तेव्हां **अलकन्परी** ह्मणालीः—हे परोपकारी पुरुषा, ह्या मनुष्याविषयीं माझ्या मनांत प्रेमपाझर उत्पन्न करणारा तूंच असून ज्याअर्थी असें बोलतोस त्याअर्थी तुझ्या प्रश्नाचें काय उत्तर द्यावें हें मला मु-ळींच सुचत नाहीं. असो, आतां ह्या तुझ्या मित्रास मी आतांच

आपला प्राणपती असें समजलें असतें; परंतु माझ्या बापाच्या संमत्याशिवाय ही गोष्ट मला कबूल करवत नाहीं. यास्तव मी आतांच आपल्या बापाकडे जातें आणि परवानगी घेतें. असें ह्मणून ती तेथून एकाएकीं नाहींशी झाली; ती थेट **अलका** पर्वतावर आपल्या बापाच्या घरीं गेली. तेथें गेल्यावर प्रथमतः आपल्या आईस भेटून तिनें सर्व वर्तमान कळविलें. तें ऐकून **अलकन्परी**च्या आईस अतिशय आनंद झाला. नंतर तिनें आपल्या भर्त्याजवळ जाऊन त्यास कन्येचे मनोगत हेतू कळविले. तेव्हां तो ह्मणालाः—ज्याअर्थीं **अलकन्परीनें** आपण होऊन वर योजना केली आहे त्याअर्थीं तिचा हेतू मोडणें आपणांस योग्य नाहीं. हे त्याच्या तोंडचे शब्द **अलकन्परी**च्या आईनें आपल्या मुलीस कळविले. त्यावेळीं तिचा हर्ष गगनांत मावेनासा होऊन तिनें ताबडतोब कांहीं दासींस **हातिमास** व त्याच्या मित्रास आणावयास पाठविलें. त्याप्रमाणें ते उभयतांही मित्रद्वय यानमार्गानें ताबडतोब तेथें येऊन पोहोंचले. नंतर रीतीप्रमाणें **अलकन्परी**चा व **हातिमा**च्या मित्राचा विवाह झाला; हें पाहून **हातिमास** अतिशय आनंद झाला.

पुढें चार दिवस मोठ्या थाटाचा समारंभ झाल्यावर **हातीम** जाण्याविषयीं आज्ञा मागूं लागला. त्यावेळीं **अलकन्परीनें** विचारलें:—हे परोपकारी पुरुषा, आतां आपण कोणीकडे जाणार? तेव्हां **हातीम** ह्मणालाः—मला **हिमयार** पर्वताकडे जावयाचें आहे. तें ऐकून राणीनें आपल्या कांहीं सेवकांस बोलावून त्यांस **हातिमास** विमानांत बसवून **हिमयार** पर्वताजवळ नेवून सोडण्यास सांगितलें. त्याप्रमाणें सेवकांनीं विमान तयार करून आणलें. तेव्हां **हातीम** सर्वांचा निरोप घेऊन त्या विमानांत बसला. त्यावेळीं **हातिमा**च्या मित्रास अतिशय दुःख झालें; परंतु **हातिमानें** त्याची समजूत करून सेवकांस विमान चालविण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें पवनगतीनें तें जात असतां थोडक्याच वेळानें "कोणाचें वाईट करूं नका; आणि जर कराल तर तुह्मांवर अनेक संकटें येतील." असे शब्द **हातिमा**चे कानीं पडले. तेव्हां सेवकांस विमान थांबविण्याविषयीं त्यानें आज्ञा केली. नंतर आज्ञेप्रमाणें विमान थांब-

त्यावर **हातीम** त्यांतून उतरला व सेवकांस परत जावयास त्यानें सांगितलें. पुढें ज्या दिशेकडून ते इच्छित शब्द ऐकूं येत होते त्या दिशेचा रोंख धरून **हातीम** चालला.

जातां जातां कांहींवेळानें एका वृक्षास एक पिंजरा टांगलेला असून त्यांत एक **वृद्ध** मनुष्य बसला आहे असें त्याच्या नजरेस पडलें. तेव्हां तो अतिशय आश्चर्यभरित होऊन त्या पिंजऱ्याजवळ जाऊन ह्मणालाः—हे **वृद्ध** मनुष्या, तूं जे तोंडानें उपदेशपर शब्द उच्चारतोस त्याचा अर्थ काय? व तुझी ही अशी दुःखदस्थिति होण्याचें कारण काय? तेवढें मला कृपाकरून सांग. **हातिमाचें हें** भाषण ऐकून तो **वृद्ध** मनुष्य ह्मणालाः—माझें दुःख निरसन करण्याचें तुझ्याआंगीं जर सामर्थ्य असेल तरच त्याचें कारण विचार. नाहींतर मुळींच विचारूं नको. आतां मी जे शब्द उच्चारतों त्याचा अर्थ कळण्याची जर तुझी इच्छा असेल तर मी जी हकीगत तुला सांगेन ती दुसऱ्या कोणास कधींही न सांगण्या विषयीं वचन दे ह्मणजे ती सर्व हकीगत तुला सांगेन. हें त्याचें भाषण ऐकून **हातिमानें** तावडतोब वचन दिलें. तेव्हां तो **वृद्ध** मनुष्य ह्मणालाः— मी एका व्यापाऱ्याचा मुलगा असून माझें नांव **हिमयार** असें आहे. आमचा व्यापार निरनिराळ्या देशाशीं असल्यामुळें माझा बाप नेहमीं व्यापारानिमित्तानें जलपर्यटणास जात असे. माझी बाल्यावस्था सरून तरुणावस्था प्राप्त झाल्यावर घरसंसार व व्यापारधंदा माझ्या स्वाधीन करून माझा बाप बऱ्याच दिवसाच्या मुदतीनें एका मोठ्या द्विपांतरीं मालखरेदीस्तव गेला. तेव्हां हलकट व व्यसनी लोकांच्या नादीं लागून थोडक्याच दिवसांत, माझ्या बापानें मोठ्या कष्टानें मिळविलेली सर्व मालमत्ता मी चैनींत व ऐषआरामांत उधळून टाकली; पुढें जेव्हां माझ्याजवळ एकही कपर्दिका नाहींसी झाली तेव्हां बापानें घरांत कांहीं द्रव्य पुरून ठेवलेलें आहे अशी बातमी मला समजल्यावरून मी आपलें सर्व घर खणलें. परंतु त्यापासून कांहीं एक निष्पन्न झालें नाहीं. अशी माझी स्थिती झाली असतां त्याच संधीस द्वीपांतरांहून माल भरून घेऊन येतांना 'माझा बाप गलबत फुटून बुडून मेला' अशी बातमी मला समजली. त्या-

वेळीं बापाच्या मरणाचें व माझ्या दुःस्थितीचें मला अतिशय दुःख झालें. पुढें कांहींदिवस गेल्यावर एके दिवशीं मी बाजारांत गेलों असतां जमीनींत पुरून ठेवलेलें द्रव्य उकरून काढणारा एक मांत्रिक मला भेटला. तेव्हां त्यास घेऊन मी घरीं आलों, आणि सर्व हकीगत निवेदन केली. ती ऐकून तो मांत्रिक ह्मणालाः—जर मला सांपडेल त्या द्रव्याचा चतुर्थांश देशील तर मी तुझ्या घरांतलें द्रव्य उकरून काढीन. गरजेस्तव मी त्याचें मागणें तत्काल मान्य केलें. नंतर तो मांत्रिक सर्व घरभर फिरला व ज्या ठिकाणीं द्रव्य पुरलेलें होतें ती जागा उकरण्यास त्यानें सांगितलें. त्याप्रमाणें ताबडतोब मी तेथें खणलें, तों मोहोरांनीं व रुपयांनीं भरलेले हांडे माझ्या नजरेस पडले. मित्रा, द्रव्य माझ्या नजरेस पडल्याबरोबर बुद्धिभ्रंश होऊन मी त्या मांत्रिकास कांहीं मोहरा देऊं लागलों; परंतु मांत्रिक त्या घेईना. तेव्हां मला अतिशय राग येऊन मी दहा पांच रट्टे त्या मांत्रिकास चढवून घरांतून घालवून दिलें.

या गोष्टीस कांहीं दिवस गेल्यावर एके दिवशीं तो मांत्रिक माझ्या घरीं आला आणि ह्मणालाः—त्या दिवशीं मी नुसती मस्करी केली असतां तूं मला मारून घालवून लाविलेंस. असो, वास्तवीक मला तुझें द्रव्य मुळींच घ्यावयाचें नव्हतें. कारण परमेश्वर—कृपेनें मला जी विद्या अवगत आहे त्या योगानें मी अतोनात द्रव्य मिळवीन. हें त्या मांत्रिकाचें मिष्ठ भाषण खरें वाटून मी त्याजबरोबर मित्रत्वानें वागूं लागलों; व तो ही निःष्कपटपणानें अनेक ठिकाणीं पुरून ठेवलेलें द्रव्य मला दाखवूं लागला. असा क्रम चालला असतां कांहीं दिवसानीं त्याची ती मंत्र—विद्या शिकण्याची मला इच्छा उत्पन्न होऊन त्याजबद्दल मी त्या मांत्रिकाजवळ गोष्ट काढली. तेव्हां तो ह्मणालाः—मला हीं जीं जमीनींत पुरलेलीं द्रव्यें दिसतात तीं मंत्राच्या योगानें दिसत नसून एका प्रकारचें अंजन आहे तें डोळ्यांत घातलें ह्मणजे "कोठें काय आहे ! कोठें काय आहे" तें दिसतें. हें त्याचें बोलणें खरें वाटून तें अंजन माझ्या डोळ्यांत घाल असें मी त्यास सांगितलें. त्यानेंही ती गोष्ट मान्य केली.

नंतर एके दिवशीं तो मांत्रिक मला ह्मणालाः—तुझी इच्छा असेल तर मजबरोबर निर्मनुष्य ठिकाणीं चल ह्मणजे तुझ्या डोळ्यांत तें अमोलिक अंजन घालीन. मी ती गोष्ट मान्य करून त्या मांत्रिकाबरोबर येथें आलों. त्यावेळीं हा पिंजरा रिकामाच झाडाला टांगलेला होता. तो पाहून मी त्यास हा पिंजरा कोणाचा असें विचारिलें:—तेव्हां तो ह्मणाला, ह्या पिंजऱ्याचा मालक कोणीच नाहीं. पुढें आह्मी ह्या वृक्षातळीं बसल्यावर त्यानें आपल्या जवळची एक डबी काढली आणि त्यांतलें अंजन माझ्या डोळ्यांत घातलें. मित्रा काय सांगूं? त्या दुष्ट अंजनाचा माझ्या डोळ्यांस स्पर्श होतांच मी आंधळा झालों. त्यावेळीं मला अतिशय दुःख होऊन अशी स्थिति होण्याचें कारण मी त्यास विचारिलें. तेव्हां तो ह्मणालाः—ज्याप्रमाणें तुझी कर्मे त्याप्रमाणें तुझें परमेश्वरानें पारिपत्य केलें आहे. तरी आतां विशेष दुःख न करितां प्राप्त झालेल्या स्थितींतच आयुष्याचे दिवस घालीव. हें त्याचे भाषण ऐकून मी ह्मणालोंः—तूं व मी आजपर्यंत मित्रत्वाच्या नात्यानें वागत आलों असून माझी जी अशी अवस्था तूं केली आहेस त्याचा तुला परमेश्वराजवळ जाब द्यावा लागेल. यास्तव मित्राचा असा घात न करितां माझी पूर्व स्थिती मला प्राप्त होईल असा कांहीं इलाज कर. हें माझें भाषण ऐकून तो मांत्रिक ह्मणालाः—ज्याचें जसें कर्म तशीच त्याला फळें प्राप्त होतात. यास्तव दुःख न करितां ह्या पिंजऱ्यांत सुखानें बस व प्रत्येक पाव पाव घटकेला **"कोणाचा घात करूं नका, आणि जर कराल तर तुम्हांवर संकट येईल."** असे शब्द उच्चारीत जा, ह्मणजे थोडक्याच दिवसांनीं एक पुण्य पुरुष येथें येईल व तुझी अशी स्थिती होण्याचें कारण विचारील; तेव्हां तूं आपली इत्थंभूत हकीगत त्यास सांग ह्मणजे येथून थोड्या अंतरावर जें **हिमयार** नांवाचें अरण्य आहे तेथून तो सूर्यकमळ आणून त्याचा रस तुझ्या डोळ्यांत पिळील. व त्या योगानें तुझी दृष्टी पूर्ववत् होईल; असें सांगून तो मांत्रिक मला ह्या पिंजऱ्यांत घालून निघून गेला.

मित्रा, आज तीन वर्षें मी ह्या पिंजऱ्यांमध्यें एखाद्या पक्ष्या-

प्रमाणें राहिलों आहें. आतां ह्या पिंजऱ्याचें दार जरी मोकळें आहे तरी माझ्यानें बाहेर फिरवत नाहीं. फार तर काय ? परंतु नुसतें पिंजऱ्याचें दार जर उघडलें तर तावडतोब हातापायांचे सांधे दुखूं लागतात व आंगांत कळा मारूं लागतात. एकेवेळीं मी ह्या पिंजऱ्यांतून बाहेर निघालों मात्र; तों माझ्या सर्वांगांतून वेदना येवूं लागल्या, प्राणोत्क्रमण होण्याची पाळी आली. परंतु मी विलंब न करितां तसाच परत पिंजऱ्यांत येऊन बसलों, त्याबरोबर सर्व दुःख नाहींसें होऊन मी अगदीं पहिल्या सारखा झालों. तेव्हांपासून दैवावर हवाला ठेवून मांत्रिकानें सांगितल्या प्रमाणें प्रत्येक पाव पाव घटकेस तुह्मी ऐकलेलें उपदेशपर वाक्य ह्मणत असतों. येणेंप्रमाणें मी आपली हकीगत सांगितली. आतां मजवर कृपा करून ज्या योगानें मी ह्या दुःखांतून मुक्त होईन, असा एखादा उपाय योजा.

हें त्या वृद्ध मनुष्याचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—या विषयीं तुह्मी कोणत्याही प्रकारची काळजी न करितां स्वस्थ असा. आतां त्या मांत्रिकाच्या सांगण्याप्रमाणें मी सूर्यकमळाचा शोध करण्यास जातों. परंतु त्या कामांत यश येणें परमेश्वराधीन आहे असें ह्मणून तो त्या **वृद्धाची** आज्ञा घेऊन तेथून निघाला. इकडे **हातिमास हिमयार**पर्वताच्या नजीक विमानांतून उतरून ते सेवक जेव्हां **अनकन्**परीजवळ गेले तेव्हां ती त्यांस ह्मणालीः तुह्मी **हातिमास** एकटाच सोडून परत आलेत हें बरें केलें नाहीं. असो, आतां तुह्मी विमानारूढ होऊन ज्या ठिकाणीं **हातीम** असेल त्या ठिकाणीं जाऊन तो जें काम करीत असेल त्या कामांत त्यास मदत करा. नंतर तो जेव्हां **शहाबादेस** जाण्याकरितां निघेल तेव्हां त्यास सुरक्षित रीतीनें तेथें पोहोंचवून परत या. **अलकनूपरीचें** भाषण ऐकून ते सेवक विमानारूढ होऊन ज्याठिकाणीं **हातीम** होता तेथें आले व त्यांनीं **अलकनूपरीनें** सांगितलेला निरोप त्यास सांगितला. नंतर ते ह्मणालेः—**महाराज,** आतां आपणास कोठें जावयाचें आहे? **हातीम** ह्मणालाः—**हिमयार** अरण्यांत सूर्यकमळें ज्या झाडावर येतात त्या झाडाचा शोध कर-

ण्याकरितां जावयाचें आहे. हें ऐकून सेवक ह्मणाले:—आह्मी तुह्मांस त्या झाडाच्या नजीक नेवून पोहोंचवितों, परंतु त्या झाडा- पर्यंत आमच्यानें येवणार नाहीं. कारण झाडावर सूर्यकमळें येऊं लागलीं ह्मणजे आसपासचा सर्व प्रदेश त्या कमळांच्या तेजानें रात्रंदिवस सतेज असतो. त्यामुळें तेथें जाणाऱ्या मनुष्यास अति- शय संताप होतो, इतकेंच नव्हे तर त्या झाडाच्या सभोंवती ह- जारो विषारी प्राणी नेहमीं वास करीत असल्याकारणानें पक्षीसुद्धां त्या झाडाच्या वाऱ्यास उभे राहत नाहींत. इतकें तें भयंकर स्थळ असल्यामुळें आमच्यानें तेथपर्यंत येववत नाहीं.

हें त्या सेवकांचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणाला:—त्याविषयीं तुह्मी बिलकूल काळजी करूं नका. फक्त त्या झाडाच्या नजीक मला नेवून पोहोंचवा ह्मणजे मी तें कमळ हरप्रयत्नकरून घेऊन येतों. **हातिमाचें** हें धैर्याचें भाषण ऐकून सेवकांनीं त्यास विमा- नांत बसविलें; व पवनगतीनें ते त्यास आठवे दिवशीं **हिमयार** अरण्यांत घेऊन आले. नंतर **हातीम** ह्मणाला:—ज्या झाडावर सूर्यकमळें येतात तीं झाडें कोठें आहेत तें मला दाखवा. तेंव्हां सेवक ह्मणाले:—ज्या ऋतुमध्यें तीं कमळें येतात तो ऋतु येण्या- ला अजून थोडक्याच दिवसांचा अवकाश आहे. सबब आपणास येथेंच मुक्काम केला पाहिजे. **हातिमानें** हें त्याचें ह्मणणें मान्य केलें. नंतर जितके दिवस तो ऋतु येण्यास अवधी होती तितके दिवस **हातीम** एखाद्या वनराजाप्रमाणें ऐषआरामांत होता. कारण, ह्याची उत्तम प्रकारची शुश्रूषा राखण्याविषयीं **अलकन्परीनें** सेवकांस सक्त ताकीद दिलेली असल्यामुळें ते त्याच्या खाण्या- पिण्यांत व ऐषआरामांत बिलकूल कमतरता करीत नसत. अशा रीतीनें कालक्रमणा करीत **हातीम** तेथें राहिल्यावर थोडक्याच दिवसांनीं तो ऋतु आला, त्यामुळें त्या अरण्यांतील झाडावर कमळें येऊं लागलीं. व एकेक कमळ प्रतिसूर्यच आहे कीं काय, असा भास होऊं लागला! अशी स्थिति झाल्यामुळें तें सर्व अरण्य चकचाकित दिसूं लागून त्या कमळांचा सुवास चहूंकडे पसरूं लागला.

पुढें जेव्हां तीं कमळें पूर्णतेला येऊं लागलीं तेव्हां सर्प विंचू

आदिकरून हजारो विषारीप्राणी त्या झाडासभोंवतीं वास करूं लागले. हें जेव्हां त्या सेवकांच्या नजरेस पडलें तेव्हां ते भयाभीत झाले. हा त्यांचा भित्रेपणा पाहून **हातिमानें** त्यांस धीर दिला. नंतर तीं कमळें घेऊन येण्याच्या उद्देशानें **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं हातांत धरून व सेवकांची आज्ञा घेऊन **हातीम** तेथून निघाला. जातां जातां कांहीं दिवसांनीं तो त्या वृक्षाजवळ गेला आणि त्याजवर चढून तीन सूर्यकमळें काढून **आस्वलकन्येनें** दिलेल्या मोत्याच्या योगानें सुरक्षितपणें आपल्या स्थळीं येऊन पोंहोचला. **हातीम** कोणतीही इजा न होतां कार्यभाग साधून सलामत परत आला. हें पाहून सेवकांस हा कोणीतरी ईश्वरांशी पुरुष असावा असें वाटलें. असो, पुढें एक दोन दिवस गेल्यावर ते सर्व विमानारूढ होऊन ज्या झाडावर पिंजऱ्यामध्यें **हिमयार** होता तेथें आले. नंतर **हातिमानें** त्या **वृद्ध** मनुष्यास हांक मारून पिंजऱ्यांतून खालीं उतरावयास सांगितलें. त्याप्रमाणें तो उतरल्यावर त्या **सूर्यकमळाच्या** रसाचे कांहीं थेंब **हातिमानें** त्याच्या डोळ्यांत घातले. त्यामुळें थोडक्याच वेळांत **हिमयारास** पूर्वीप्रमाणें साफ दिसूं लागलें. त्याबरोबर **हिमयारानें हातिमास** साष्टांग नमस्कार घातला. हें पाहून **हातिमानें** त्यास उठविलें. तेव्हां तो ह्मणालाः—माझ्या घरांत जें असंख्यात द्रव्य भरलेलें आहे तें मी तुह्मांस अर्पण करतों, तरी त्याचा आपण अंगिकार करावा. **हातीम** ह्मणालाः—मला तें अविनाशी द्रव्य घेऊन काय करावयाचें आहे !!! माझ्याजवळही अतोनात द्रव्य आहे; परंतु त्याचा मला कधींच उपयोग होत नाहीं. असो, आतां तूं आपल्या घरीं जाऊन स्वस्थतेनें कालक्रमण कर आणि आंधळे, पांगळे व मुके वगैरे जे अनाथलोक आहेत त्यांचा योग्य समाचार घेत जा. ह्मणजे परमेश्वर तुझें कल्याण करील.

असा उपदेश केल्यावर **हातिमानें** त्या वृद्ध मनुष्यास जावयास सांगून आपण विमानांत बसला. त्याबरोबर सेवक तें पवनगतीनें घेऊन चालले. जातां जातां कांहींदिवसांनीं **शहाबादेस** पोंहोचल्यावर **हातिमानें** सेवकांस परत जावयास सांगितलें; आणि आपण

**हस्नबानू**च्या घरीं गेला. **हातीम** सुरक्षितपणें कार्यभाग करून परत आला असें पाहून **बानूस** अतिशय आनंद झाला. नंतर कांहींवेळ उभयतांचें कुशल झाल्यावर **हातिमानें** गिघाल्यापासूनचा सर्व वृत्तांत तीस निवेदन केला. तो ऐकून **बानूस** फारच समाधान वाटलें. नंतर भोजनाची सर्व सिद्धता झाल्याची वर्दी आल्यामुळें तिनें **हातिमास**ही भोजनास बोलाविलें. तेव्हां **हातीम** ह्मणालाः—**आसिरिया** देशाच्या राजपुत्रास येथें बोलावून आणल्याशिवाय मी अन्नाला शिवणार नाहीं. हा त्याचा निग्रह पाहून **बानूनें मुनीरशहास** बोलावून आणण्याविषयीं सेवकांस सांगितलें. आज्ञे-प्रमाणें सेवकांनीं **मुनीरशहास** तेथें आणलें. नंतर त्या सर्वांनी तो दिवस मोठ्या आनंदांत घालविला. पुढें एक दोन दिवस गेल्यावर **हातीम** ह्मणालाः—बाईसाहेब, आतां आपला जो चवथा प्रश्न असेल तो सांगावा; ह्मणजे ज्याप्रमाणें तीन प्रश्नांचा उलगडा गेला त्याप्रमाणें परमेश्वरकृपेनें तोही प्रश्न शेवटास नेऊन परत येतों. **हातिमा**चें हे भाषण ऐकून **बानू** ह्मणालीः—एक मनुष्य असें ह्मणतो कीं, "**खरें बोलणारा नेहमीं सुखी असतो.**" तरी तुह्मी असें ह्मणणाऱ्या मनुष्याचा शोध करून त्याच्या ह्या ह्मणण्याचा अर्थ काय आहे तो मला कळवा. **बानूचें** हें भाषण ऐकतांच **हातीम** ह्मणालाः—तो मनुष्य कोठें राहतो हें आपणास माहीत आहे काय? **बानू** ह्मणालीः—"**काराम**" नामक जें शहर आहे तेथें तो मनुष्य राहतो. हें ऐकून **हातीम बानूची** व आपल्या मित्राची रजा घेऊन चौथ्या प्रश्नाचा जबाब आणण्याच्या उद्देशानें **शहाबादे**हून निघाला.

प्रश्न ३ रा समाप्त.

---

## प्रश्न चवथा.

### "खरें बोलणारा नेहमीं सुखी असतो."

चौथ्या प्रश्नाचा तपास करण्या कारितां **हातीम, शहाबादे**हून

निघाला तो मजले मजलेनें प्रवास करीत असतां ' कोठें जावें व काय करावें ? ' असा विचार करूं लागला. परंतु **काराम** शहराकडे जाणारा रस्ता माहीत नसल्यामुळें वाट मिळेल त्या रस्त्यानें तो जावूं लागला. जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एका पर्वताच्या पायथ्याशीं आल्यावर त्याच्या नजरेस एक नदी पडली. त्यावरून तो तेथें गेला आणि पहातो तों त्या नदींतील पाणी केवळ रक्तासारखें आहे. हा अद्भुत चमत्कार पाहून त्यास मोठें नवल वाटलें. नंतर ह्या रक्तवर्णी पाण्याचा तपास करावा, असें त्याच्या मनांत आल्यावरून त्या नदीच्या उगमाकडे तो जावूं लागला. जातां जातां कांहीं दिवसानीं त्याच्या नजरेस एक मोठा अजस्त्र वृक्ष पडला. त्यावरून तेथें जाऊन पहातो तों त्या **वृक्षा**च्या प्रत्येक फांदीस **स्त्रियांचीं** शिरें टांगलेलीं असून त्याच्या मुळांशीं असलेल्या पाण्याच्या झाऱ्यांत त्या शिरांतून रक्त गळत आहे असें त्याच्या **दृष्टीस** पडलें.

हा अपूर्व **चमत्कार** काय असावा याचा तपास अवश्य करावा असें वाटून तो त्या वृक्षाखालीं बसला असतां तीं सर्व शिरें खदखदां हांसूं लागलीं. हें पाहून आश्चर्य भरीत होऊन **हातीम** त्या शिरांकडें पाहूं लागला; तेव्हां सर्वांत उंच टांगलेलें एक सुंदर व **सुहास्यवदनी** शीर त्याच्या नजरेस पडलें. त्या शिराकडे न्याहाळून पहात असतां **हातिमा**च्या मनांत विचाराचे अनेक तरंग उद्भवून तो बेशुद्ध होऊन पडला. नंतर कांहीं वेळानें सावध झाल्यावर तो मनांत ह्मणालाः—एक वेळ धडापासून वेगळें केलेलें शीर हंसतांना माझ्या कधींही पाहण्यांत आलें नसून हींच शिरें कां हंसतात ? व ह्या **स्त्रिया** इतकी यातना कां भोगतात याचा जर तपास न केला तर एका मोठ्या महात्वाच्या गोष्टीचा आपण अनादर केला असें होईल. यास्तव शोध लागेपर्यंत तेथेंच मुक्काम करण्याचा त्यानें निश्चय केला. पुढें सूर्यास्ताचा समय अगदीं नजीक येऊन ठेपल्यावर **हातीम** त्या वृक्षापासून थोड्या अंतरावर दुसऱ्या एका झाडाखालीं जाऊन विश्रांति घेत पडला असतां प्रहर रात्रीच्या सुमारास त्या वृक्षावरील सर्व शिरें तळाशीं जो जलसमूह होता

त्यांत पडलीं; त्याबरोबर जलसमूहाचा एक सुंदर महाल बनला. त्या महालांत उत्तम तऱ्हेच्या बैठका घातलेल्या असून जागजागीं हांड्या, झुंबरें वगैरे दीप प्रदिप्त करून खिडक्यांस वाळ्याचे पडदे सोडले होते. अशा त्या सुशोभित महालांत थोडक्याच वेवेळानें हजारों सुंदर व तरुण **स्त्रिया** एका मागून एक येऊन बसल्यावर प्रत्यक्ष रतीसही लाजविणारी अशी एक नवयौवना देदिप्यमान **स्त्री** त्या महालांतील मुख्य **सिंहासनावर** विराजमान झाली. हा विलक्षण थाट पाहून **हातिमानें** कल्पना केली कीं, झाडावर टांगलेल्या सर्व शिरांपेक्षां सर्वांत जें उंच टांगलेलें होतें व ज्यानें माझें मन आकर्षण केलें त्याच शीराची ही मुख्य **स्त्री** असून बाकीचीं शिरें ह्या सर्व दासी होत. अशी तो कल्पना करीत असतां तिकडे महालांत मुख्य **स्त्रीच्या** हुकुमावरून नृत्यगायन सुरू झालें. तें इतकें मनमोहक कीं, त्याच्या योगानें **हातीमही** अगदीं तर्करहित गर्क होऊन गेला. सुमार बारावाजेपर्यंत असा हा प्रकार चालला. नंतर त्या सर्व स्त्रिया भोजनाची सिद्धता करूं लागल्या. कोणी झाडून काढताहेत, कोणी सुवर्ण-समया प्रज्वालित करिताहेत, कोणी पात्रें मांडीत आहेत, कोणी वाढावयास लागल्या आहेत. अशी सर्वांची एकच गर्दी उडाल्यावर कांहीं वेळानें सर्व सिद्धता झाली. नंतर ती मुख्य **स्त्री** ह्मणाली:—आपल्या ह्या महालानजीक एका वृक्षाखालीं एक प्रवासी उतरला आहे त्याजला कोणी तरी ह्या पैकीं एक पात्र नेऊन द्या. आणि अशी प्रार्थना करा कीं, आमच्या मालकीणीनें आपणांस हें पात्र पाठविलें आहे तरी ह्याचा कृपाकरून अंगिकार करावा. धनीणीची ही आज्ञा ऐकतांच एक **स्त्री** पात्र घेऊन **हातिमा**जवळ गेली आणि ह्मणाली:—आमच्या राणीनें हें भोजन आपणांस पाठविलें आहे तरी ह्याचा अवश्य अंगिकार करावा. हें तिचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणाला:—अशी जी परोपकारी राणी तिचें नांव काय? तें मला प्रथम कळीव. **स्त्री** ह्मणाली:—ही गोष्ट मला विचारूं नका. कारण, तें सांगण्याची आह्मांस परवानगी नाहीं व तुह्मांला तरी ह्या गोष्टीविषयीं काय करावयाचें आहे? फक्त पुढें

आलेल्या अन्नाचा स्वीकार करा म्हणजे झालें. हें ऐकून **हातीम** म्हणालाः—तुझ्या राणीचें नांव व हा काय प्रकार आहे तो समजेपर्यंत मी ह्या अन्नाला स्पर्शसुद्धां करणार नाहीं. **हातिमाचें** हें निग्रहाचें भाषण त्या **स्त्रीनें** आपल्या राणीस कळविलें. तें ऐकून राणी म्हणालीः—पुनः जाऊन त्या प्रवाशास माझा निरोप सांग कीं, "आतां तूं ह्या अन्नाचा स्वीकार कर म्हणजे तुझी जी इच्छा आहे त्याचा जबाब तुला उद्यां कळेल." हा निरोप **स्त्रीनें** **हातिमास** जाऊन कळविला; परंतु त्यानें आपला हेका सोडिला नाहीं. इतकेंच नव्हे, तर तो त्या **स्त्रीला** परत जाण्याचा प्रतिबंध करूं लागला. पण ती **स्त्री हातिमाच्या** हाताला झटका देऊन तेथून निघून आपल्या समुदायांत जाऊन बसली. पुढें ती सर्व रात्र त्या **स्त्रीयांनीं** आनंदांत क्रमून उजाडल्यावर तो महाल नाहींसा होऊन तेथें पूर्ववत् जलसमूह झाला व पूर्वीप्रमाणें शिरें झाडावर लटकूं लागलीं. हें पहातांच **हातीम** त्या झाडाखालीं जाऊन बसला व त्या शिरांकडे मोठ्या आतुरतेनें पाहूं लागला. पुढें **हातिमानें** पुष्कळ वेळपर्यंत जरी त्या चमत्काराविषयीं विचार केला तरी त्याची खरी स्थिति त्याच्या मुळींच लक्षांत आली नाहीं. शेवटीं ह्या गोष्टीचा पूर्ण तपास लावल्याशिवाय व कोणी जादूनें **स्त्रीयांची** अशी अवस्था केली असल्यास त्यांना संकट मुक्त करून मुख्य **स्त्रीशीं** विवाह केल्याशिवाय कधींही रहावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला.

पुढें संध्याकाळचा समय झाल्यावर आदले दिवशीं प्रमाणें त्या ठिकाणीं महाल उत्पन्न होऊन त्या स्त्रिया नृत्यागायन करूं लागल्या. नंतर भोजनाची सिद्धता झाल्यावर राणीच्या सांगण्यावरून पूर्व दिवशींचीच **स्त्री** एक पात्र घेऊन **हातिमा**जवळ आली आणि त्यास तें अन्न-ग्रहण करण्याविषयीं प्रार्थना करूं लागली. तेव्हां **हातीम** म्हणालाः—तुझ्या राणीचें नांव समजल्याशिवाय मी या अन्नाचा आज अंगिकार करणार नाहीं. हें त्याचें भाषण **स्त्रीनें** राणीस कळविलें असतां ती म्हणालीः—हा सर्व प्रकार समजून घेण्याची जर तुझी इच्छा असेल तर प्रथमतः भोजन करून मज-

कडे ये ह्मणजे सर्व हकीगत तुला कळेल. ह्या निरोपाप्रमाणें हातीम आपलें भोजन वगैरे आटोपून त्या स्त्रीबरोबर जाण्यास निघाला. पुढें ती स्त्री हातिमास बरोबर घेऊन राणीकडे नेत असतां तिनें सरोवरांत उडी टाकली; तेव्हां हातिमानेंही तिच्या पाठोपाठ त्या सरोवरांत उडी मारली. नंतर कांहींवेळानें पाय जमिनीला लागल्यावर तो डोळे उघडून पहातो तों महाल व स्त्रिया वगैरे सर्व प्रकार नष्ट होऊन आपण एका राक्षसवस्तीच्या घोर अरण्यांत उभें आहों असें त्यास वाटलें. पुढें आपण होतों कोठें ? आहों कोठें ? करतों काय ? या विषयीं विचार उद्भवून त्याचें मन उदास झालें व त्या स्थितींतच तो त्या अरण्यांत भटकूं लागला. भटकतां भटकतां सुमार आठवे दिवशीं एक वृद्धऋषी त्याच्या नजरेस पडला. त्या ऋषीचा हातिमाकडेसच येण्याचा झोंक असल्यामुळें तो जागच्या जागींच उभा राहिला. कांहींवेळानें तो ऋषीजवळ आल्यावर हातिमानें त्याच्या चरणीं लोटांगण घातलें, नंतर हातिमास उठवून ऋषी ह्मणालाः—हे ज्ञानवान् हातिमा, तूं येथें कोठें आलास ? हें तर राक्षसांचें वसतिस्थान आहे! पूर्वींच जर तूं त्या ऐंद्रजालाविषयीं शोध करण्याची इच्छा धरली नसतीस तर त्या सरावरोपासून दहासहस्त्र कोश तूं कधींही येऊन पडला नसतास.

हें त्या ऋषीचें भाषण ऐकून हातिमास आपल्या स्थितिविषयीं अतिशय वाईट वाटून तो मोठमोठ्यानें रडूं लागला. हा त्याचा आक्रोश पाहून ऋषीस दया येऊन तो ह्मणालाः—हातिमा, तुझी जी इच्छा असेल ती मला सांग. तेव्हां हातीम ह्मणालाः—ज्या ठिकाणाहून मी ह्या अरण्यांत येऊन पडलों तेथें जावें. अशी माझी इच्छा आहे. ऋषीनें हें भाषण ऐकून आपल्या झोळींतून एक दंड काढला आणि हातिमाच्या हातांत देऊन सांगितलें कीं, आतां तूं डोळे झांक ह्मणजे पूर्व ठिकाणीं जाशील. ऋषीच्या सांगीप्रमाणें हातिमानें तसें करतांच तो एका क्षणांत पूर्वींच्या जागीं आला. नंतर नेत्र उघडून पहातो तों शिरें टांगलेला वृक्ष त्याच्या नजरेस पडला. तेव्हां फारच आश्चर्य भरीत होऊन तो त्या झाडा-

खालीं कांहींवेळ बसला. थोडावेळ गेल्यावर त्या वृक्षावर सर्वांत उंच जें राणीचें शिर टांगलेलें होतें तें काढण्याची **हातिमास** इच्छा होऊन तो त्या झाडावर चढूं लागला. इतक्यांत मोठा **प्रभंजन** सुटून तो त्या झाडावरून खालीं पडला. नंतर थोडावेळ गेल्यावर पुनः धैर्य धरून तो त्या झाडावर चढला. सुमार अर्ध्यावर गेला नाहीं तोंच तो वृक्ष दुभांगला व त्या फटींत **हातीम** पडून त्याचें अर्धें आंग बाहेर व अर्धें झाडाच्या फटींत अडकून राहिलें. अशी अवस्था झाल्यावर त्यास मोठा पश्चत्ताप झाला. नंतर वृक्षाच्या फटींत अडकलेलें अर्धें आंग बाहेर काढून घेण्याचा तो प्रयत्न करूं लागला. परंतु **हातीम** जसजसा जोर करी तसतसें त्याचें आंग आंतच जाऊं लागलें. शेवटीं फक्त हात व तोंड बाहेर राहिल्यावर त्याचा नाईलाज झाला. व श्वासावरोध होऊं लागल्यामुळें थोडक्याच वेळानें आपला प्राणांत होईल असें त्यास वाटलें.

इतक्यांत **ताटिका** वनांतून ज्या **सिद्ध** पुरुषानें **हातिमाची** मुक्तता केली होती तो तेथें अकस्मात् उत्पन्न होऊन **हातिमास** ह्मणालाः—तुला आपल्या जिवाचा कंटाळा आला आहे कीं काय? हें मला समजत नाहीं. मागें मी तुला **ताटिका** वनांतील राक्षसांच्या तडाक्यांतून सोडविलें असतां पुनः तूं ह्या मायावी स्त्रियांचा शोध करण्याच्या भरीस पडून आपला प्राण धोक्यांत घातलास या तुझ्या वेडेपणास काय ह्मणावें? हें त्या **सिद्धाचें** बोलणें **हातिमास** ऐकूं येत होतें; परंतु सर्व धड झाडाच्या फटींत गच्च अडकून राहिल्यामुळें त्याच्यानें एक शब्दसुद्धां बोलवला नाहीं. इतकेंच नव्हे तर कांहीं वेळपर्यंत जर तो तशाच स्थितींत असता तर थोडक्याच वेळानें त्याचें प्राणोत्क्रमण झालें असतें. अशी ही त्याची अवस्था पाहून त्या **सिद्धास** दया आली आणि त्यानें आपल्या झोळींतून एक कांडी काढून ती त्या वृक्षावर मारली. त्याबरोबर **हातीम** वृक्षाच्या फटींतून सुखरूपतेनें बाहेर पडला. नंतर आपण संकटमुक्त झालों असें पाहून **हातिमानें** त्या **सिद्धाच्या** पायांवर लोटांगण घातलें. तें पाहून **सिद्धानें** त्यास उठविलें, आणि ह्मणालाः—ह्या स्त्रियांच्या शोधास्तव तूं जो इतकी प्राणांत खटपट करतोस ह्याचें कारण

काय तें मला सांग. तेव्हां **हातीम** ह्मणालाः—हे **सिद्ध**पुरुषा, हीं शिरें येथें अशा रितीनें कां टांगलीं आहेत याचें खरें कारण समजून घेण्याच्याच इच्छेनें मी हा घोर प्रयत्न करीत आहें; बाकी दुसरें कांहींएक कारण नाहीं. **हातिमा**चें हें भाषण ऐकून **सिद्ध**-पुरुष ह्मणालाः—एवढेंच समजून घेण्याची जर तुझी इच्छा असेल तर याचा ईंगितार्थ मी सांगतों, तो ऐकः

ह्या वृक्षावर जीं शिरें टांगलेलीं आहेत त्यामध्यें सर्वांत उंच व सतेज असें जें **शिरकमल** आहे तें '**भारद्वाज**' नामक एका महा तपोनीधी ऋषीच्या कन्येचें आहे. ही कन्या जेव्हां आपल्या वयांत आली तेव्हां एका पुरुषावर तिचें मन जाऊन त्या पुरुषाबरोबर विवाह करण्याविषयीं तिनें आपल्या बापाजवळ आज्ञा मागितली. परंतु त्या तपस्व्यास कन्येचा भाषणापासून अतिशय राग आला आणि त्या आवेशांत त्यानें आपल्या कन्येची अशी अवस्था केली. इतकेंच नव्हे तर हा वृक्ष, हें सरोवर व शिरें वगैरे सर्व **ऐंद्रजाल** असून त्या कन्येचा बाप येथून एक सहस्र कोशांवर जो '**ब्रह्मघाट**' या नांवाचा पर्वत आहे तेथें राहतो. तो सव तपस्व्यांत श्रेष्ट असून ब्रह्मघाटांपासून ह्या ठिकाणीं येण्यास त्यास एका निमिषाचीही अवधी लागणार नाहीं. आतां जो पर्यंत तो तपस्वी जिवंत आहे तोंपर्यंत ह्या **भुवनसुंदरी**चें ( ह्मणजे भारद्वाज ऋषीच्या मुलीचें ) लग्न न होतां ती ह्याच स्थितींत राहील. **सिद्धाचें** **हें** भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—असें जर आहे तर मी ह्या वृक्षावर चढून तिचें शिरकमल खालीं घेऊन येतों. हें ऐकून ऋषी ह्मणालाः—या भानगडींत तूं बिलकुल पडूं नकोस. कारण ह्या स्त्रियांचा नुस्ता शोध करण्याचें मनांत आणलेंस तोंच तुजवर प्राणांत संकटें येऊन गुदरलीं आणि आतां तर तूं त्या शिराला खालीं घेऊन येणार; मग काय प्रळय होईल तो माझ्यानें सांगवत नाहीं. यास्तव ही उठाठेव नकरितां स्वस्थ ऐस ह्मणजे झालें.

हें त्या **ऋषीचें** भाषण ऐकतांच **हातीम** ह्मणालाः—**ब्रम्हदेवानें** मनुष्य प्राण्याच्या ललाटीं जें लेखन केलेलें असतें त्याप्रमाणें झाल्याशिवाय कधींही राहत नाहीं. असें जर आहे तर **ह्या स्त्री** कारितां जर माझा प्रणांत व्हावयाचा असला तर तो कधींही

चुकावयाचा नाहीं. आतां अशी गोष्ट केल्यानें अनेक संकटें गुदर-तील असें आपण ह्मणतां परंतु ह्या सुंदरीनें माझें मन आकर्षण केलें आहे. त्यामुळें ती प्राप्त झाल्याशिवाय मला बिलकुल चैन पडणार नाहीं. **हातिमाचें** हें निग्रहाचें भाषण ऐकून त्या **सिद्धानें** आपल्या झोळींतून थोडीशी विभुती काढली आणि ती झाडावर टाकून **हातिमास** वर चढावयास सांगून आपण अदृश्य झाला. नंतर कांहीं वेळपर्यंत परमेश्वर—स्तवन करून **हातीम** त्या झाडावर चढला आणि ज्या डाहाळीला **भुवनसुंदरीचें** शिर टांगलेलें होतें तेथपर्यंत जाऊन त्यानें त्या शिरास हात लावला. त्याबरोबर धड व शीर निरनिराळें होऊन, धड खालील सरोवरांत पडलें आणि शीर **भुवनसुंदरीच्या** शिरा शेजारीं टांगून राहिलें. पुढें जेव्हां सूर्यास्त होऊन रात्र पडली तेव्हां नित्य नियमाप्रमाणें तीं सर्व शिरें पाण्यांत पडलीं; त्यांबरोबर **हातिमाचेंही** शीर पाण्यांत पडलें. व सर्वांप्रमाणें शीर व धड याचें संमिलन होऊन तेथें उत्पन्न झालेल्या महालांत **भुवनसुंदरीच्या** **सिंहासनाजवळील** एका सिंहासनावर बसून मोठ्या आनंदानें कालक्रमण करूं लागला. परंतु आपण आहों कोठें, करतों काय व ह्या **ऐंद्रजालांतून** आपली सुकटा कशी होईल या विषयीं त्याच्या मनांत बिलकुल विचार उद्भवले नाहींत. ही **हातिमाची** स्थिती पाहून **भुवनसुंदरी** मनांत ह्मणाली. 'हा आतां आपल्या पूर्ण कचाट्यांत सांपडला आहे, असो.

पुढें नृत्यगायन झाल्यावर जेव्हां भोजनाची तयारी झाली, तेव्हां **भुवनसुंदरीनें** **हातिमास** स्वतःच पाय धुवावास पाणी आणून दिलें; व त्याचें पात्र आपल्या पात्राच्या शेजारींच मांडविलें, नंतर सर्व मंडळींचीं भोजनें झाल्यावर पुनः नृत्यगायन सुरू होऊन पहाट होतांच नित्याप्रमाणें जशीं सर्वांचीं शिरें झाडाला टांगून राहिलीं तसेंच **हातिमाचेंही** शीर धडापासून वेगळें होऊन वृक्षाच्या फांदीस टांगून राहिलें. ह्याप्रमाणें बरेच दिवसपर्यंत चाललें असतां एकेदिवशीं ज्या **सिद्धानें** **हातिमास** दोनवेळ संकट मुक्त केलें होतें तो त्या झाडाखालीं अकस्मात् उत्पन्न झाला, आणि आपल्या झोळींतून थोडीशी विभुती काढून त्यानें

**हातिमा**च्या शिरावर फेंकली. त्या बरोबर त्या तळ्यांतून **हातिमा**चें धड बाहेर निघालें. तसेंच त्याचें शीरही वृक्ष फांदीपासून सुटून दोघांचें संमिलन झालें. तेव्हां जसा एखादा मनुष्य झोपेंतून जागा होतो तसा **हातीम** वृक्षाखालीं अकस्मात् उभा राहिला. नंतर संकट-मुक्त करणाऱ्या **सिद्धा**च्या चरणीं लीन होऊन ह्मणालाः—स्वामिन्, माझी विलक्षण अवस्था झालेली पाहून तु ह्मांस दया येऊन तुह्मी मला संकट मुक्त केलेंत; परंतु आपल्या साह्याशिवाय माझी मनिषा पुरी व्हावयाची नाहीं, असें मला वाटतें. आतां ती मनिषा कोणती ह्मणाल तर ज्या **भुवनसुंदरी**नें आपल्या अलौकिक सौंदार्यानें माझें चित्त आकर्षण केलें तिची प्राप्ती हीच होय. **हातिमा**चें हें भाषण ऐकून **सिद्ध** ह्मणालाः—ह्या **भुवनसुंदरी**च्या प्राप्तीची इच्छा धरल्या पासून तुजवर जरी अनेक संकटें गुदरलीं तरी अजून ती प्राप्त व्हावी ही इच्छा आहेचना ? **हातीम** ह्मणालाः—होय. कारण तिजवांचून हें सर्व जग शून्य आहे असें मला वाटतें; इतकेंच नव्हे, परंतु जर ती मला कोणत्या रीतीनें प्राप्त होईल या विषयीं कांहीं उपाय सांगणार नाहीं तर माझ्यानें होईल तितका मी प्रयत्न करीन. आणि तितकेंही करून जर ती प्राप्त न झाली तर शेवटीं प्राणत्यागही करीन.

**हातिमा**चें हें दृढ निश्चयाचें भाषण ऐकून **सिद्ध** ह्मणालाः—**भुवनसुंदरी**ची जर तुला इच्छा असेल तर तिचा बाप जो '**भारद्वाज**' नामक ऋषी त्यास ठार मारलें पाहिजे. कारण जोंपर्यंत तो जिवंत आहे तोंपर्यंत तिचा कोणाबरोबरही विवाह होणार नाहीं. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः-असें जर आहें तर मी आतांच जाऊन त्याला ठार मारतों. त्यावर सिद्ध ह्मणालाः-**हातिमा**, असा जर तूं उतावाळिपणा करशील तर तुझ्या हातून कांहींएक होणार नाहीं. यास्तव धीर धरून मी जें सांगत आहें तें स्वस्थ चित्तेंकरून ऐक ह्मणजे सर्व गोष्टी यथास्थितरीतीनें सिद्धीस जातील. **सिद्धा**चें हें भाषण ऐकून **हातीम** त्याजला नमन करून ह्मणालाः स्वामिन तुह्मी जी आज्ञा कराल ती मला शिरसावंद्य आहे. तेव्हां सिद्ध ह्मणालाः-ठीक आहे; आतां मी तुला एक मंत्र सांगतों तो तूं पाठ कर.

असें ह्मणून त्या **सिद्धानें हातिमा**च्या कानांत एक मंत्र सांगितला. तो मुखोद्गत झाल्यावर त्यानें तो ह्मणून दाखविला. तेव्हां **सिद्ध** ह्मणालाः—आज पासून तूं नेहमीं सुचिर्भूतपणानें वर्तत जा. आणि ज्यावेळेस तुजवर प्रसंग पडेल त्यावेळेस या मंत्राचा जप कर, ह्मणजे सर्व संकटें निवारण होतील.

**सिद्धा**चें हें भाषण संपतांच **हातीम** त्याच्या पांयावर गडबडां लोळूं लागला. हें पाहून त्यानें त्यास उठवून सांगितलें कीं, मी तुला एक दंड देतों; तो हातांत धर आणि तोंडानें **परमेश्वरा**चें नामस्मरण कर ह्मणजे तूं एका क्षणांत **ब्रम्हघांटा** जवळ जाऊन पोंहोंचशील. ही **सिद्धा**ची आज्ञा **हातिमानें** मान्य करून, त्यानें दिलेला दंड हातांत घेतला आणि तोंडानें परमेश्वराचें नामोच्चारण करूं लागला. त्याबरोबर आपण हावेंतून मोठ्यावेगानें जात आहों असें त्यास वाटलें. पुढें या गोष्टीस फारसा वेळ गेला नाहीं तोंच **हातिमा**चे पाय जमिनीला लागले. तेव्हां त्यानें डोळे उघडून पाहिलें तों एका निर्मनुष्य स्थळीं उभे असून आपल्या समोर एक पर्वत आहे असें त्यानें पाहिलें. नंतर तो त्या पर्वतावर चढूं लागला. तो ऋतु जरी भिन्न होता तरी वसंतऋतु प्रमाणें तेथील सर्व वृक्ष, फलांनीं व फुलांनीं आच्छादित होते. हा अद्भुत व रमणीय प्रकार पाहून **हातिमा**स अति आश्चर्य वाटलें. पुढें पर्वत चढून गेल्यावर त्यास एक पुष्करणी लागली. तीवर **हातिमानें** स्नान केलें. व **सिद्धानें** सांगितलेला मंत्र जपण्यास सुरवात केली. त्या बरोबर **ऐंद्रजाल** विद्येनें उत्पन्न केलेलीं तेथील सर्व जनावरें भराभर पळावयास लागलीं. इतकेंच होऊन राहिलें नाहीं, तर **भारद्वाज** ऋषीसही भय वाटूं लागलें. ही अशी स्थिति कां झाली त्याचें कारण समजून घेण्याच्या इच्छेनें **भारद्वाज**ऋषीनें आपली **शकुनवंती** काढून प्रश्न पाहिला तों "**हातीम**नामक कोणी एक राजपुत्र ह्या पर्वतावर आला असून तो महापराक्रमी व विलक्षण सामर्थ्यवान आहे. तरी त्याचे पुढें तुझें तपोबळ व मंत्र सामर्थ्य बिलकुल चालावयाचें नाहीं." असा प्रश्न निघाला. त्यावेळीं **भारद्वाज**ऋषीची अतिशय गाळण उडून गेली. नंतर त्यानें

**ऐंद्रजाल**–विद्येनें कांहीं यक्षिणी उत्पन्न केल्या व त्यांस **हातिमा**-स आपला अंकित करून घेण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें य-क्षिणी ज्या पुष्करणीवर **हातीम** मंत्रजप करीत होता त्या ठि-काणीं गेल्या. त्यांत जी मुख्य यक्षीण होती तिनें **भुवनसुंदरीचें** रूप धारण केलें होतें. त्या यक्षिणीला हें रूपांतर करण्याची **भारद्वाज**ऋषीनेंच आज्ञा केली होती. कारण, जेव्हां त्यानें पुनःश-कुनवर्तींत प्रश्न पाहिला होता तेव्हां " तुझ्या मुलीवर **हातिमाचें** मन गेल्यामुळें तुझा प्राण घेण्याच्या इराद्यानें तो येथें आला आहे, व तत्प्रीत्यर्थ तो द्वादशाक्षरी मंत्राचा जप करीत आहे. " असें प्रश्नाचें उत्तर निघतांच **भारद्वाज**ऋषीनें विचार केला कीं, '**हा-तिमाच्या** द्वादशाक्षरी मंत्रापुढें आपल्या **ऐंद्रजालिक**विद्येचें कांहीं एक बल चालावयाचें नाहीं. यास्तव त्या मंत्राचा जेणेंकरून त्याला विसर पडेल असा कांहीं उपाय केला पाहिजे.' असा वि-चार करूनच त्याणें त्या यक्षिणी पाठविल्या होत्या; असो.

इकडे ज्या पुष्करणीवर **हातीम** सुचिर्भूत होऊन मंत्रोच्चार करीत बसला होता तेथें त्या यक्षिणी येतांच **हातिमानें** त्यांजकडे पा-हिलें तों ज्या कामाकरितां आपण इतका दीर्घ प्रयत्न करीत आ-हों ती इच्छितवस्तु आपल्या समोर उभी आहे असें त्यास वाटलें; व तो कांहींवेळ विचार करीत स्तब्ध राहिला. इतक्यांत **भुवन-सुंदरीचें** रूप धारण करणारी यक्षीण ह्मणालीः–अहो प्राणनाथ, माझ्या प्राप्तीकरितां आपणांस इतका दीर्घ प्रयत्न करावा लागला याबद्दल मला फार वाईट वाटतें. तस्मात् आतां कोणत्याही प्रकारची काळजी न करितां तुह्मी स्वस्थ असा. कारण, माझ्या बापानें आमची सर्वांची त्या ऐंद्रजालापासून प्रस्तूत मुक्तता केली आहे, स-बब आतां इच्छेप्रमाणें वर्तण्यास मला कोणताही प्रति-बंध नाहीं. हें त्या वेषधारी यक्षिणीचें मोहक भाषण ऐकून **हातीम** अगदीं वेड्यासारखा झाला. ही त्याची स्थिती पाहून यक्षिणीनें ताबडतोब त्याच्या कंठाला मिठी मारली व लडिवाळपणानें ती त्यां-च्या मांडीवर बसली. नंतर दासीजवळून मद्यकलश घेऊन **हाति-मास** ह्मणालीः–हा आमच्या कुलस्वामिणीचा प्रसाद मी तुमच्याक-

रितां मुद्दाम आणला आहे; तरी त्याचा तुह्मी अंगिकार करावा ह्मणजे तुमचा व माझा पुनः कधींही वियोग होणार नाहीं. हें मोहक भाषण ऐकून द्वादशाक्षरी मंत्राच्या योगानें आपला कार्यभाग झाला असें समजून तो तें अपवित्र मद्य प्याला. नंतर त्या यक्षिणींनीं भयंकर स्वरूपें धारण केलीं व **हातिमास** चतुर्भुज करून आपल्या स्वामीजवळ नेलें. तेव्हां त्याची बत्तिस लक्षणी मुद्रा पाहून ह्यास मारूं नये असें प्रथमतः **भारद्वाज**ऋषीस वाटलें. परंतु तसें केलें असतां हा आपला शत्रु असल्यामुळें आपण होऊन आपला घात करून घेतल्यासारखें होईल. असें समजून त्यानें त्या यक्षिणींस **हातिमास** मोठा अग्नि प्रदीप्त करून त्यांत टाकण्यास सांगितलें.

आज्ञेप्रमाणें यक्षिणींनीं **हातिमास** अग्निकुंडांत नेऊन टाकलें व हें वर्तमान त्यांनीं **भारद्वाज**ऋषीस येऊन सांगितलें. परंतु हें वर्तमान खरें किंवा खोटें याचा प्रत्यय पाहण्याकरितां त्यानें आपली **शकुनवंती** उघडून पाहिली तों " तुझा शत्रु जो **हातीम** तो अग्नीच्या योगानें कधींहीं मरणार नाहीं. कारण **आस्वलकन्येनें** दिलेलें अमूल्य मोतीं त्याच्याजवळ आहे. " हें प्रश्नाचें उत्तर पाहून ऋषि अगदींच गर्भगळीत झाला. नंतर कांहींवेळ झाल्यावर त्यानें विचार करून यक्षिणींस पाचारण केलें आणि त्यांस **हातिमास** अग्निकुंडांतून बाहेर काढून पुष्करणीवर नेऊन सोडण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें यक्षिणींनीं त्यास पुष्करणीवर नेऊन सोडलें. तेव्हां **हातिमानें** स्नान करून पुन्हां मंत्र जप करण्यास सुरवात केली. इकडे **भारद्वाज**ऋषीस चैन पडेनासें होऊन त्यानें यक्षिणींस बोलावून आणून **हातिमास** आपल्या कन्येचा नाद सोडण्याविषयीं उपदेश करण्याची त्यांस आज्ञा केली. त्याप्रमाणें पुनः त्या यक्षिणी पुष्करणीवर गेल्या. तेव्हां त्यांतील मुख्य यक्षीण भुवनसुंदरीचें रूप धारण करून **हातिमास** ह्मणालीः—प्राणनाथ, मयाशीं मी प्रेमोत्सुक होऊन आपल्या मांडीवर बसल्यें. ही बातमी माझ्या पित्याला समजल्यावरून त्याला अतिशय क्रोध आला आणि त्यानें मंत्र विद्येच्या बळानें आह्मां सर्वांस डाकिणीचीं रूपें देऊन आप-

णांस आमच्या कडूनच अग्निकुंडांत टाकविलें. हा जो आपला अनादर झाला तो आह्मी बुध्या केला नसून माझ्या पित्यानें आह्मांकडून मुद्दाम करविला, यास्तव विशेष इतराजी न करितां माझा नाद सोडावा. आतां माझ्या अंतःकरणांत जरी आपल्या विषयीं प्रीति आहे तरी पित्याच्या धाकामुळें तुह्मांजवळ सख्य करवत नाहीं आणि तितकाही धाक सोसून मी जर तुमच्या बरोबर सख्यत्वानें वागलें तर तुमचा व माझा प्राण घेतल्याशिवाय माझा बाप कधींही राहणार नाहीं.

हें त्या वेषधारी यक्षिणीचें भाषण ऐकून **हातीम** अगदीं कामातुर होऊन त्या यक्षिणजिवळ गेला आणि त्यानें तिचें चुंबन घेतलें. तेव्हां ती ह्मणालीः—मी आपणांस इतका उपदेश केला असून ज्याअर्थी तुह्मी माझा नाद सोडित नाहीं त्याअर्थी मी आपणांस प्राणापेक्षांही प्रिय आहें असें मला वाटतें. त्यावर **हातीम** ह्मणालाः—यांत काय संशय!! खरोखरच तूं मला प्राणापेक्षांही प्रिय आहेस. **हातिमाचें** हें भाषण ऐकतांच हा आपल्या पूर्ण अंकित झाला असें समजून ती यक्षीण **हातिमाचें** चुंबन घेऊन ह्मणालीः—आपणांजवळ एक वस्तु मागावयाची आहे; ती जर आपण द्याल तर मी आपणांस मोठी भाग्यवान समजेन. तेव्हां **हातीम** ह्मणालाः—मी कंगाल मनुष्य असून तुला देण्यास माझ्याजवळ एक फुटकी कवडी सुद्धां नाहीं; अशी माझी स्थिति आहे. आतां त्या स्थितींत तुला जें मागावयाचें असेल तें माग. नंतर यक्षीण मोठ्या नम्रतेनें ह्मणालीः—तुह्मांजवळ जें **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं आहे तें मला कृपा करून द्या. **हातीम** ह्मणालाः—माझ्याजवळ तें अमोल्य मोती आहे हें तुला कसें कळलें. यक्षीण ह्मणालीः—माझा बाप काल त्या मोत्याच्या गुणाविषयीं बोलत होता तें मी ऐकिलें. तेव्हां अशी अमोल्य वस्तु आपणांजवळ असावी अशी मला इच्छा उत्पन्न झाल्यावरून मी तें आपणांजवळ मागत आहें. हें तिचें बोलणें ऐकून **हातीम** ह्मणालाः—तें मोतीं जरी अमोल्य व बहुगुणकारी आहे तरी मी तुला देतों. असें ह्मणून त्या यक्षिणीची खरी स्थिति लक्षांत न आणतां केवळ

ती **भारद्वाज** ऋषीची कन्या **भुवनसुंदरीच** आहे असें समजून तो तें अमोल्य मोतीं देऊं लागला.

इतक्यांत **हातिमास** ज्यानें मागें दोन तीन वेळां संकट—मुक्त केलें तो **सिद्ध** त्याच्या पुढें उभा राहिला. आणि ह्मणालाः—हे **हातिमा**, तूं अगदीं वेडा झालास असें मला वाटतें. कारण हें अमूल्य मोतीं तूं ह्या डाकिणीला देण्यास तयार झालास त्यावरून तूं ज्या हेतूनें हा असाध्य प्रयत्न केलास त्या हेतूपासून पराङ्मुख होणार असें वाटतें. अरे ही जी तुला **भुवनसुंदरी** सारखी भासते आहे ती खरोखरच डाकीण आहे. हिच्या नादाला लागल्यास शेवटपर्यंत तुला पश्चात्ताप करावा लागेल. हे त्या **सिद्धाचे** शब्द ऐकतांच **हातीम** अगदीं घाबरून गेला व वेड्यासारखा त्याच्या तोंडाकडे पाहूं लागला. नंतर कांहींवेळ गेल्यावर तो शुद्धीवर आला व त्या **सिद्धास** नीटपणें ओळखून त्याच्या चरणावर लोळूं लागला. तेव्हां सिद्धानें त्यास उठवून सांगितलें कीं, मी जो तुला पूर्वीं उपदेश केला आहे त्याप्रमाणें शुचिर्भूतपणानें राहून द्वादशाक्षरी मंत्रजप करीत जा. ह्मणजे तुझी इच्छा लवकरच पूर्ण होईल. परंतु तसें न करितां जर वेडेपणानें ह्या वेषधारी स्त्रियांच्या नादीं लागशील तर फसशील. आतां या माझ्या ह्मणण्याचा खरेपणाच जर तुला पहावयाचा असेल तर शुचिर्भूत होऊन मंत्र—जप कर. ह्मणजे या डाकिणी जळून भस्म होतील. हें त्याचें भाषण ऐकतांच **हातिमानें** पुष्करणींत स्नान करून मंत्र जपण्यास सुरवात केली. त्याबरोबर त्या डाकिणी थरथर कांपूं लागून कांहीं वेळानें त्यांच्या मस्तकांतून अग्नि निघून त्या योगानें त्या जळून खाक झाल्या. हा अद्भुत चमत्कार पाहून **हातीम** अगदीं आश्चर्यचकित झाला.

इकडे **भारद्वाज**ऋषीनें आपण केलेले अनेक तऱ्हेचे यत्न व्यर्थ झाले हें पाहून **काळभैरवाची** आराधना केली. नंतर साक्षात् ती मूर्ति प्रगट होतांच साष्टांग नमस्कार करून सर्व हकीगत निवेदन केली. ती ऐकून **काळभैरव** क्रोधयुक्त होऊन **भारद्वाजास** ह्मणालेः—तूं जो विचार मनांत आणला आहेस तो कालत्रयींही घडणार नाहीं. कारण **हातीम**राजाच्या ललाटीं **ब्रह्मदेवानें** पुष्कळ

आयुष्य लिहिलें आहे; इतकेंच नाहीं तर **परमेश्वराची** त्याजवर पूर्ण कृपा असल्यामुळें ह्या तिन्हीं लोकांत त्यास कोणाच्यानेंही मारवणार नाहीं. ह्याकरितां मनांत धरलेला हेतु सोडून देऊन त्यास शरण जा व त्याजला आपली कन्या अर्पण कर. **काळभैरवाचें** हें भाषण ऐकून **भारद्वाज**ऋषि ह्मणालाः—**महाराज,** हें तुह्मी भलतेंच काय सांगतां? जोंपर्यंत माझ्या शरीरांत प्राण आहे तोंपर्यंत मी त्यास कधींही शरण जाणार नाहीं व आपली कन्याही देणार नाहीं. **भारद्वाज**ऋषीचें हें दुराग्रहाचें भाषण ऐकून **काळभैरव** ह्मणालाः—माझी आराधना तूं कां केलीस तें सांग. ऋषी ह्मणालाः—ह्या **हातिमानें द्वादशाक्षरी** मंत्राच्या सामर्थ्यानें दोन तीन वेळ माझ्या मंत्रसामर्थ्याचा मोड केला सबब त्याला त्या द्वादशाक्षरी मंत्राचा विसर पडेल अशी कांहीं तजवीज कृपा करून करावी. ऋषीचें हें भाषण ऐकून **काळभैरव** अतिशय संतप्त होऊन ह्मणालाः—मूर्खा, **हातिमाची** कीर्ति सर्व जगभर पसरावी अशी प्रत्यक्ष ईश्वराची इच्छा असल्यामुळेंच त्यानें आपल्या एका शिष्यास **हातिमास** मदत करण्यास पाठविलें आहे. यास्तव **हातीम** जोंपर्यंत द्वादशाक्षरी मंत्राचा जप करीत आहे तोंपर्यंत माझ्यानें त्यास बिलकुल उपद्रव देववणार नाहीं. आतां तूं माझा प्रियभक्त असून ज्याअर्थीं संकट निवारण करण्यास माझी आराधना केलीस त्याअर्थीं **हातिमास** गाढ निद्रा लागून सुखकारक स्वप्नें पडतील अशी मी तजवीज करतों. ह्मणजे त्या योगानें कदाचित् त्यास मंत्राचा विसर पडला तर पडेल.

**काळभैरवाचें** हें भाषण ऐकून ऋषि हात जोडून ह्मणालाः—ठीक आहे; तसें कां होईना. असें ह्मणून त्यानें **भैरवाची** पूजा केली. नंतर ऋषीस आशिर्वाद देऊन **काळभैरव** अंतर्धान पावले. इकडे **हातिमास** घोर निद्रा लागल्यामुळें व सुखकारक स्वप्नें पडल्यामुळें अर्थातच त्यास त्या द्वादशाक्षरी मंत्राचा विसर पडला. पुढें दुसरे दिवशीं प्रातःकाळीं **हातीम** जागा झाल्यावर स्नान करण्याकरितां पुष्करणीवर गेला. इतक्यांत **भारद्वज**ऋषीच्या आज्ञेवरून तेथें एक मोठा विक्राळ **ब्रम्हराक्षस** उत्पन्न झाला व **हाति-**

मांस गदेनें मारूं लागला. राक्षसाचें हें कृत्य पाहून **हातीम** अतिशय घाबरून गेला, त्यामुळें द्वादशाक्षरी मंत्र जरी त्याच्या अगदीं मुखोद्गत होता तरी त्यावेळीं एकही अक्षर त्यास आठवलें नाहीं. अशी स्थिति झाल्यामुळें त्या **ब्रम्हराक्षसानें हातिमास** चतुर्भुज करून **भारद्वाज** ऋषीजवळ नेऊन उभा केला. तेव्हां ऋषीनें **ब्रम्हराक्षसास** आज्ञा केली कीं, ह्याच्या हातापायांत बिड्या ठोकून एका मोठ्या खाड्यांत ह्यास नेऊन टाक व त्या खाड्याच्या तोंडावर एक मोठी शिळा ठेव. अशी आज्ञा होतांच ताबडतोब **ब्रम्हराक्षसानें** तसें केलें. पुढें कांहींवेळानें **हातीम** शुद्धीवर आल्यावर आपण एका मोठ्या खाड्यांत आहों असें पाहून मुक्तता होण्यासाठीं तो परमेश्वर स्तवन करूं लागला.

ह्या गोष्टीस एक दोन दिवस गेल्यावर **भारद्वाज** ऋषीस वाटलें कीं, ‘ क्षुधा आणि तृषा ह्यांची पीडा झाल्यामुळें **हातीम** कदाचित् आपल्याजवळील **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं देण्यास तयार होईल. अशा समजुतीनें त्यानें आपल्या कांहीं शिष्यांस **हातिमाच्या** शोधास पाठविलें. त्याप्रमाणें ते गेल्यावर **हातिमास** हांका मारूं लागले; परंतु तो त्यांजवळ एकही शब्द बोलला नाहीं. तेव्हां ते शिष्य परत ऋषीजवळ जाऊन ह्मणाले:—आह्मी **हातिमास** पुष्कळ हांका मारिल्या; परंतु तो कांहींच बोलला नाहीं. हें ऐकून ऋषि ह्मणाला:—तुह्मीं पुनः एकवेळ तेथें जा आणि माझा निरोप सांगा कीं, ‘जर तूं **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं देशील तर या संकटांतून मी तुझी मुक्तता करीन.’ हा निरोप ऐकून ते शिष्य पुनः **हातिमा**जवळ गेले, आणि त्यांनीं ऋषीचा निरोप त्यास सांगितला. तो ऐकून **हातीम** ह्मणाला:—जर तुमचा ऋषि आपली कन्या मला देत असेल तर मी त्यास तें मोतीं देईन. हें ऐकून ते शिष्य आपल्या गुरूजवळ गेले व **हातिमाचा** निरोप त्यांनीं त्यास सांगितला. तो ऐकतांच ऋषीस अतिशय क्रोध येऊन त्यानें आपल्या सर्व शिष्यांस हांक मारून **हातिमास** मरेपर्यंत दगडांनीं मारण्याची आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें ते सर्व शिष्य ज्या खाड्यांत **हातिमास** टाकला होता तेथें गेले आणि ह्मणाले:—अरे

वेड्या मनुष्या, यःकश्चित् मोत्याकरितां आपल्या आमोलिक जीवाचा नाश कां करून घेतोस ? आतां जर तूं तें मोतीं आमच्या स्वाधीन करणार नाहींस तर तुझा प्राण घेतल्याशिवाय आह्मी कधींही राहणार नाहीं. हें त्यांचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः— मी मरणाची मुळींच पर्वा करीत नाहीं. इतकेंच नव्हे तर जर मी नांवाचा खरा **हातीम** असेन तर तुमच्या गुरूच्या नरडीचा घोंट घेतल्याशिवाय कधींही राहणार नाहीं.

**हातिमाचें** हें भाषण ऐकतांच त्या शिष्यांस अतिशय राग येऊन ते **हातिमावर** दगडांचा एकसारखा वर्षाव करूं लागले. परंतु त्यांपैकीं एकही दगड **हातिमास** न लागतां ते सर्व दगड बाजूस पडत. हें पाहून ते शिष्य व प्रत्यक्ष **भारद्वाज**ऋषिही अगदीं चकित झाला. पुढें सात दिवसपर्यंत जरी हा दगड मारण्याचा क्रम एकसारखा चालू होता तरी **हातिमास** त्यापासून कांहींएक इजा झाली नाहीं. फक्त अन्नपाणी न मिळाल्यामुळें मात्र तो अगदीं व्याकुळ झाला होता. शेवटीं तो त्या सर्व शिष्यांस ह्मणालाः—तुह्मी कितीही दिवसपर्यंत जरी मला एकसारखे दगड मारूं लागलां तरी त्या पासून मी कधींही मरणार नाहीं. कारण माझ्या जवळ जें अमोलिक मोतीं आहे त्याचें सामर्थ्य फारच विलक्षण असल्यामुळें त्याचेच योगानें मला तुमच्या गुरूनें अग्निकुंडांत टाकलें असतांही माझा बचाव झाला. तेव्हां अर्थातच ह्या तुमच्या करण्यापासून कांहींएक निष्पन्न होणार नाहीं. आतां जर कोणी मला ह्या खाड्यांतून काढून पुकरण्णीवर नेईल तर तें अमोल्य मोतीं मी त्याजला देईन. हें **हातिमाचें** भाषण ऐकतांच ते सर्व शिष्य ह्मणालेः—बाबारे, आह्मांस तें मोतीं घेऊन काय करावयाचें आहे ? "आह्मी जी ही धोंड मार करीत आहों ती फक्त गुरूच्याच सांगण्यावरून" असें ह्मणून पुढें कांहीं वेळानें ते सर्व शिष्य, आपण कितीही यत्न केला तरी **हातीम** मरत नाहीं असें पाहून कंटाळून निघून गेले.

ज्या मोत्याकरितां आपला गुरु **हातिमास** अतिशय त्रास देत आहे तें मोतीं आपणास मिळावें अशी त्या शिष्यवर्गापैकीं

एकास इच्छा झाल्यावरून मध्य—रात्रीच्या सुमारास तो एकटाच त्या खाड्याजवळ आला. आणि **हातिमास** हांक मारून ह्मणालाः—तूं जर मला आपल्या जवळचें मोतीं देशील तर मी तुला ह्या खाड्यांतून काढून पुष्करणीवर नेऊन सोडतों. हें त्याचें भाषण ऐकून **हातिमानें** फार उत्तम आहे; असें ह्मटल्यावर तो शिष्य **पंचाक्षरी** मंत्राचा जप करूं लागला. इतक्यांत दोन मोठे विक्राळ राक्षस त्या ठिकाणीं उत्पन्न होऊन शिष्याच्या सांगीवरून त्यांनीं त्या खांचेंतून **हातिमास** अचानक बाहेर काढलें. नंतर ते दोघेही पुष्करणीवर गेल्यावर **हातीम** स्नान करून द्वादशाक्षरी मंत्र जप करूं लागला. हें पाहून तो शिष्य ह्मणालाः—अहो हें तुह्मीं काय करतां? अगोदर माझ्या कामागिरी बद्दल कबूल केलेली देणगी मला द्या. त्यावर **हातीम** ह्मणालाः—बाबारे, तें अमोल्य मोतीं माझें स्वतःचें नाहीं, सबब माझ्यानें तें कोणासही देववत नाहीं. आतां तूं माझ्यावर जो उपकार केला आहेस त्याची फेड मी अशी करीन कीं, थोडक्याच दिवसांत तुझ्या गुरूला यमसदनीं पोंहोंचवून त्या जागीं तुझी स्थापना करीन. हें **हातिमाचें** भाषण ऐकतांच त्या शिष्यास **हातिमाचा** फारच राग येऊन **ऐंद्रजाल** उत्पन्न करण्याकरितां तो मंत्रजप करूं लागला. परंतु **हातीम** त्यावेळीं **द्वादशाक्षरी मंत्र** जपत असल्यामुळें उलट त्या शिष्याच्याच सर्वांगांत अग्नीनें संचार केला; त्यामुळें तो अतिशय भयाभीत होऊन तेथून पळून गेला आणि ज्या ठिकाणीं त्याचे सोबती निजले होते तेथें जाऊन निजला.

इकडे प्रातःकाळ होतांच भारद्वाजऋषीनें आपली **शकुनवंती** काढली तों "तुझ्या **विश्वनाथ** या नांवाच्या शिष्यानें मोत्याच्या आशेनें **हातिमास** खाड्यांतून काढून पुष्करणीवर नेलें." असा प्रश्न निघाला. तेव्हां ऋषीस अतिशय राग येऊन तो **विश्वनाथास** हांक मारूं लागला. परंतु ऋषीचें हांक मारण्याचें कारण **विश्वनाथाच्या** ताबडतोब लक्षांत आल्यामुळें आतां हा आपला प्राण घेतल्याशिवाय कधींही राहणार नाहीं असें समजून तो भयानें तेथून पळाला; आणि पुष्करणीवर येऊन **हातिमास** ह्मणालाः—मी तुमची मुक्तता

केली ही बातमी माझ्या गुरूस समजल्यावरून तो मला ठार मारण्याकरितां हांक मारूं लागला. परंतु हा त्याचा मनोगत हेतु मला कळल्याबरोबर प्राणरक्षणाकरितां मी तेथून पळून आपणांजवळ आलों आहें; तरी कृपा करून माझें संरक्षण करा. **विश्वनाथाचें** हें दीन वाणीचें बोलणें ऐकून **हातीम** त्याला ह्मणालाः—तूं कोणत्याही रीतीची काळजी न करितां स्वस्थ ऐस. जोपर्यंत मी जिवंत आहें तों पर्यंत तुझ्या केंसासही धक्का लागणार नाहीं.

इकडे आपल्या शिष्यास **हातिमानें** आश्रय दिला ही बातमी **शकुनवंतीच्या** योगानें ऋषीस समजतांच तो क्रोधानें अगदीं लाल होऊन गेला, आणि **हातिमाचें** पारिपत्य करण्याकरितां बरोबर आपली सर्व शिष्यमंडळी घेऊन निघाला. नंतर तो ऋषि पुष्करणीवर येतांच **हातिमावर** व **विश्वनाथावर** मंत्राचा भडिमार करूं लागला. परंतु **हातिमावर** त्या मंत्राचा प्रयोग न चालतां फक्त **विश्वनाथाच्या** शरिरांतून मात्र अग्नीच्या ज्वाळा निघूं लागल्या. हें पाहून द्वादशाक्षरी मंत्र जपून **हातिमानें** त्याचे अंगावर थोडेसें पाणी शिंपडलें, त्या बरोबर अग्नीच्या ज्वाळा नाहींशा झाल्या. हें **हातिमाचें** कृत्य पाहून ऋषीनें त्याजवर मंत्रसामर्थ्यानें दगडांचा वर्षाव करण्याचा एकसारखा सपाटा चालविला. परंतु द्वादशाक्षरी मंत्राच्या योगानें ते दगड उलट ऋषीच्याच आंगावर पडूं लागले. त्यामुळें ऋषीस अतिशय त्रास झाला. नंतर त्यानें **हातिमावर** अग्न्यास्त्राचा प्रयोग केला. परंतु त्याचेंहीं सामर्थ्य नष्ट झाल्यामुळें आतां आपली धडगत नाहीं असें पाहून पक्ष्याचें रूप घेऊन तो ऋषी तेंथून पळून गेला. हें पाहून **विश्वनाथ** ह्मणालाः—आतां हा आमचा गुरु आपलें मुख्य दैवत जें **भैरवनाथ** त्याजकडेस जाऊन संकटनिवारणार्थ मदत मागणार आहे. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—तुला जर तें ठिकाण माहित असलें तर चल, आपण त्या भैरवनाथाकडे जाऊं. पुढें **विश्वनाथानें** ‘ होय ’ असें ह्मटल्यावर ते दोघेही तेथून निघाले. जातां जातां कांहीं वेळानें एक मोठा वृक्षसमुदाय त्यांच्या नजरेस पडला. तेव्हां **विश्वनाथ** ह्मणालाः—आपल्या मंत्रसामर्थ्यानें जेव्हां ऋषीस व त्याच्या परिचारकांस अतिशय

त्रास झाला, तेव्हां ते भयाभीत होऊन पळूं लागले. हें पाहून ऋषीनें आपल्या मंत्र सामर्थ्यानें त्या सर्वांस वृक्षरूपी केलें. **विश्वनाथाचें** हें भाषण ऐकून हातिमानें त्यास थोडेसें पाणी आणावयास सांगितलें. नंतर त्यानें पाणी आणल्यावर **हातिमानें** द्वादशाक्षरी मंत्र ह्मणून तें पाणी त्या वृक्षांवर शिंपडण्याकरितां **विश्वनाथाच्या** स्वाधीन केलें. त्याप्रमाणें त्यानें तें पाणी सर्व झाडांवर शिंपडतांच त्या वृक्षांचें पूर्ववत् पुरुष झाले; आणि **हातिमाच्या** पायांवर गडबडा लोळूं लागले. तेव्हां **हातिमानें** त्या सर्वांस उठवून तुह्मी ज्यावेळीं वृक्ष झालां त्या वेळेस तुह्मांस कसें काय वाटलें तें सांगा असें सांगितलें. त्यावरून ते ह्मणाले:—हे स्वामिन्, ज्या वेळीं आपल्या मंत्र सामर्थ्याच्या योगानें आह्मांस असह्य त्रास होऊं लागला. त्या वेळीं आपला निभाव लागणार नाहीं असें समजून आह्मी पळूं लागलों. हें पाहून ऋषीनें आपल्या **ऐंद्रजालिक** विद्येनें आह्मांस प्रतिबंध केला. त्या वेळीं आमचे पाय जमिनीस चिकटल्यासारखे होऊन होऊन सर्वांगास कळा लागूं लागल्या. ह्या गोष्टीस थोडा वेळ झाला नाहीं तोंच एकाएकीं आमच्या शरीराचे वृक्ष बनले, त्या पुढें आह्मांस कांहींच माहीत नाहीं. आतां ज्याअर्थीं आपल्या कृपेनें आजन्मपर्यंत वृक्षवासांत राहण्याच्या स्थितींतून आमची मुक्तता झाली त्याअर्थीं काया, वाचा मनेंकरून तुमचीच सेवा करून राहण्याचा आह्मीं निश्चय केला आहे; तरी कृपाळू होऊन आह्मां सर्वांचा आपण अंगिकार करावा.

हें त्या सर्वांचें भाषण ऐकून **हातिमानें** ठीक आहे, असें ह्मटल्यावर ती सर्व मंडळी **भैरवनाथाच्या** स्थानाकडे जाण्यास निघाली. पुढें जातां जातां कांहीं दिवसांनीं ते एका सरोवरापाशीं आले. त्यावेळीं भर दोनप्रहराचा समय झाला असल्यामुळें सर्व मंडळींनीं त्या सरोवरांतील उदक प्राशन केलें. त्याबरोबर सर्वांचीं तोंडेंसुजून त्यांतून एकसारखी लाळ वाहूं लागली. हें पाहून प्रथम **हातीम** मनामधें थोडासा भ्याला. परंतु हा सर्व प्रभाव **भारद्वाजऋषीचाच** असेल असें जाणून त्यानें मंत्रजपण्यास सुरवात केली. त्याबरोबर सर्वांच्या तोंडावरील सूज नाहींशी होऊन लाळ गळणेंही

बंद झालें. तेव्हां **हातिमास** फारच आनंद होऊन तो **परमेश्वर**—स्तवन करीत करीत सर्व मंडळीसमवेत मार्ग—क्रमण करूं लागला.

इकडे **भैरवनाथानें** व **भारद्वाज**ऋषीनें **हातीम** आपल्याकडेस येत आहे असें पाहून आसपासच्या प्रदेशांत हजारों विषारी प्राणी उत्पन्न केले. पुढें जेव्हां **हातीम** त्या विषारी प्राण्यांच्या अगदीं जवळ गेला तेव्हां ते त्या सर्व मंडळीच्या आंगावर तुटून पडले. हें पाहून **हातिमानें** एकसारखा मंत्र जपण्याचा सपाटा चालविला. त्याबरोबर ते सर्व प्राणी मृत झाले. हें त्या उभयतांस **शकुनवंती**च्या द्वारें समजल्याबरोबर त्यांनीं मंत्रसामर्थ्यानें आसपास मोठा अग्नि प्रज्वलित केला. परंतु तोही **हातिमा**च्या मंत्रसामर्थ्यानें नाहींसा झाल्यावर **भैरवनाथास** व ऋषीस मोठी काळजी पडली. इकडे मजलेमजलेनें **हातीम** चालत असतां जेव्हां तो अगदीं जवळ आला असें त्या उभयतांस समजलें, तेव्हां त्यांनीं **हातिमा**च्या आंगावर पाडण्याकरितां एक मोठा पर्वत आकाशांत तरंगत ठेवला. हें जेंव्हां **हातिमास** समजलें तेव्हां त्यानें पुनःमंत्रजप केला. त्याबरोबर तो पर्वत **भैरवनाथा**च्या सर्व सैन्याच्या आंगावर कोसळून पडला; त्यामुळें त्यासर्व सैन्याचा अगदीं चुराडा झाला. हें पाहून ते उभयतांही गर्भगलित होऊन पळूं लागले. पुढें पळतां पळतां ते दोघेही एका मोठ्या कड्यावरून कोसळून पडले त्यामुळें त्यांच्याही प्राणास यमलोकाचा रस्ता धरावा लागला. ह्याप्रमाणें त्या उभयतांचाही नाश झाल्यावर **हातीम** आपल्याबरोबरीच्या सर्व माणसांसह परत फिरला. पुढें मार्गक्रमीत असतां **हातीम विश्वनाथास** ह्मणालाः—पूर्वीं वचन दिल्याप्रमाणें मी आतां तुला **भारद्वाज** ऋषीच्या जागीं स्थापन करणार; परंतु माझें तुह्मां सर्वांस एक सांगणें आहे तें हें कीं, आजपासून तुह्मीं ईश्वर एक असून त्याच्याच सत्तेनें हें सर्व जग उत्पन्न झालें आहे व त्याच्या वांचून ह्या जगाचें संरक्षण करणारा दुसरा कोणी नाहीं असें समजत जा. आणि जे ईश्वराचे खरे व निःसीम भक्ति करणारे आहेत त्यांस संकटसमयीं मदत करीत जा. आपण **परमेश्वराचे** दास आहों असें समजून रात्रंदिवस त्याची भक्ति केली असतां तो तुह्मांस

कधींही विसरणार नाहीं. कारण जे त्याचे खरे भक्त आहेत त्यांजवर दुर्दैवाच्या योगानें कितीही महत् संकटें आलीं तरी तो त्यांतून त्यांस पार पाडीत असतो. असो.

हें हातिमाचें भाषण ऐकतांच ते सर्व लोक मोठ्या औत्सुक्यानें ह्मणाले:—आपण आतां जो आह्मांस सदुपदेश केला आहे त्याप्रमाणे आह्मीं नेहमीं वागत जाऊं; आणि आह्मां सर्वांवर आपण जो सत्ताधीश नेमला आहे त्याच्या आज्ञेंत सर्वदां वागूं. असें ह्मणून ते सर्व लोक हातिमाच्या पायां पडूं लागले. परंतु त्यानें तसें करण्यांची सर्वांस मनाई करून व विश्वनाथ आदि करून सर्व मंडळीची रजा घेऊन हातीम तेथून निघाला. जातां जातां कांहीं दिवसांनीं तो पूर्वीच्या सरोवराजवळ येऊन दाखल झाला. नंतर तेथें पहातो तों एक सुंदर व रमणीय महाल असून कांहीं स्त्रिया इकडे तिकडे फिरत होत्या असें दिसलें. त्यांस पाहून हातीम त्या महालाकडे जाऊं लागला. इतक्यांत एक दासी धांवत धांवत पुढें आली आणि हातिमास म्हाणाली:—आपण कोण व कोठून आलां ? हें ऐकून हातीम म्हणाला:—बाई, मी कांहीं दिवसांपूर्वीं तुमच्या या महालांत होतों; इतकेंच नव्हे तर कांहीं दिवसपर्यंत तुमच्या ऐंद्रजालांत सांपडून त्या पलीकडच्या वृक्षाच्या खांदीस तुह्मां सर्वांच्या शिरां बरोबर मी आपलेंही शिरकमळ लटकविलें होतें. असो, आतां कृपाकरून तुमची धनीन जी भुवनसुंदरी तिला माझें विचारणें सांगा. हें हातिमाचें भाषण ऐकतांच ती दासी धांवत धांवत आपल्या यजमानणीजवळ जाउन ह्मणाली:—बाई साहेब, आपली भेट घ्यावी या इराद्यानें कोणी एक फिरस्ता मनुष्य आपल्या महालाच्या दाराशीं आला असून 'मी कांहीं दिवसपर्यंत आपल्या घरीं पाहुणाही होतों' असें तो ह्मणतो. दासीचें हें भाषण ऐकतांच भुवनसुंदरी ह्मणाली:—या तुझ्या सांगण्यावरून तो हातीम असावा असें वाटतें. कारण कांहीं दिवसांमागें तो आपल्या ऐंद्रजालांत सांपडला होता. परंतु पुढें तो येथून नाहींसा झाला त्यावरून माझ्या बापाच्या येथें कदाचित् तो गेला असावा. असो, आतां तूं त्याजवळ जाऊन माझ्या पित्याचा समाचार विचार. आ-

णि त्याला जर कांहीं त्याविषयीं माहित असेल तर त्यास इकडे घेउन ये.

आज्ञेप्रमाणें दासी **हातिमा**जवळ येऊन आपल्या यजमानणीच्या पित्याची खबर विचारूं लागली. तेव्हां तो ह्मणालाः तुझ्या धनिणीचा पिता जो **भारद्वाज**ऋषि त्यास त्याच्या दुष्कर्माचरणा वरून यमराजानें आपल्या घरीं नेलें आहे. हें ऐकून दासी तेथून निघून आपल्या यजमानणी जवळ आली. आणि **हातिमा**चें भाषण तिनें तिला सांगितलें. तें ऐकतांच **भुवनसुंदरी** अतिशय शोकाकुल होऊन मोठा आक्रोश करूं लागली. हें ऐकून तिच्या सर्व सख्या धांऊन तिच्याजवळ आल्या आणि ह्मणाल्याः ज्यानें आपले अतिशय हाल केले, जो खऱ्या **परमेश्वरा**वर भरवसा न-ठेवितां भूत, पिशाच, यक्ष, राक्षस, किन्नर इत्यादिकांची उपासना करणारा असा जो आपला पिता, तो जर ह्यावेळेपर्यंत जिवंत असता तर ऐंद्रजालांतून आपली सुटका न होतां आपणांस पारतंत्र्य दुःख भोगावें लागलें असतें. असो, आतां त्याच्या विषयीं विशेष दुःख न करितां प्राप्त झालेल्या सुखांत अनंदानें कालक्रमाणा करावी हें बरें. सख्यांचें हें भाषण ऐकून **भुवनसुंदरी**नें आपला शोक थोडासा कमी केला. नंतर तिनें **हातिमास** आंत घेउन येण्याविषयीं दासीस सांगितलें. आज्ञेप्रमाणें दासींनीं जाऊन **हातिमास** आंत आणलें, तों **भुवनसुंदरी**चें स्वरूप पाहून तो बेशुद्ध होऊन जमिनीवर निश्चेष्ट पडला. हें पाहून **भुवनसुंदरी** आदिकरून सर्व स्त्रिया अतिशय घाबरून गेल्या. नंतर **भुवनसुंदरीनें** गुलावपाणी आणून **हातिमा**च्या तोंडावर थोडेसें शिंडपलें, आणि त्याचें मस्तक मांडीवर घेउन पदरानें वारा घालीत बसली. पुढें कांहींवेळानें **हातिम** जरासा शुद्धीवर आला तेव्हां दासींकडुन जडित **सिंहासन** आणवून तें आपल्या **सिंहासना** शेजारीं मांडावयास सांगितलें व **हातिमा**चा हात धरून त्यास त्या सिंहासनावर बसवून मोठ्या प्रीतियुक्त शब्दांनीं त्याच्या प्रवासाची व आपल्या पित्याच्या मरणाची हकीगत विचारूं लागली.

नंतर **हातिमानें** पहिल्यापासून संपुर्ण हकीगत **भुवनसुंदरीस** सां-

गितली, आणि ह्मणालाः—मी अनेक प्रकारचीं संकटें सोसून जे अश्रांत श्रम केले ते फक्त तुझ्या प्राप्तीकरतांच केले आहेत. तरी आतां व्यर्थ विलंब न लावतां माझे हेतू परिपूर्ण कर, ह्मणजे केलेल्या श्रमाचें सार्थक होईल. **हातिमा**चें हें भाषण ऐकून **भुवनसुंदरी**च्या सख्या ह्मणाल्याः—बाईसाहेब, हा जें ह्मणतो आहे तें कांहीं अयोग्य नाहीं. कारण, हा कोणी सामान्य पुरुष नसून **इमन** देशाचा सार्वभौम राजा आहे. प्रस्तूत आपण जें हें स्वातंत्र्यसुख अनुभवीत आहों तें केवळ ह्याच्याच कृपेनें. आतां तुह्मी असें ह्मणाल कीं, ज्यानें माझ्या पित्याचा वध केला त्याज बरोबर मी विवाह कसा करूं? तर हा आपला समज चुकीचा आहे; कारण आपला पिता जरी ऋषि होता तरी तो कठोर अंतःकरणाचा व प्राणिमात्रास अतिशय दुःख देणारा होता. सबब **हातिमा**नें जें केलें तें यथायोग्यच केलें त्याजबद्दल त्याजवर कांहीं एक दोष नाहीं.

हें त्या सख्यांचें भाषण **भुवनसुंदरीस** योग्य असें वाटल्यावरून त्या देशाच्या रीतीरिवाजाप्रमाणे थोडक्याच दिवसांनीं **हातिमा**बरोबर तिनें विवाह केला. पुढें मोठ्या आनंदानें प्राप्त झालेल्या इच्छित सुखाचा अनुभव घेत असतां एके दिवशीं **हातीम** अतिशय दिलगीर होऊन मोठ्या विचारांत पडला. कारण ज्या कार्याकरितां आपण निघालों तें करावयाचें सोडून देऊन या मोहांत आपण व्यर्थ गुंतलों असें त्यास वाटलें. ही त्याची अवस्था पाहून **भुवनसुंदरी** अगदीं चकित झाली आणि एकाएकीं अशी स्थिति कां झाली याचा ती आपल्या मनाशीं विचार करूं लागली; परंतु विचार शक्तीच्या पर्यवसानास जागा न मिळाल्यामुळें अगदीं सचिंत होऊन गेली. ही **भुवनसुंदरी**ची झालेली स्थिति **हातिमा**च्या ताबडतोब लक्षांत आल्यामुळें तो तिला ह्मणालाः—प्रिये, मी जो इतकावेळपर्यंत विचारांत होतों याचें कारण इतकेंच कीं, '**मुनीरशहा**' या नांवाचा एक राजपुत्र '**हस्नबानू**' नांवाच्या एका स्त्रीचें रूप पाहून व तिची लोकोत्तर कीर्ति ऐकून फारच आसक्त झाला आहे. परंतु तिचे जे सात प्रश्न आहेत त्यांचीं जो

उत्तरें देईल त्याजबरोबर विवाह करावयाचा असा तिचा निश्चय असल्यामुळें त्या प्रश्नाचा उलगडा करण्याकरितां तो **शहाबाद** शहराहून निघाला. परंतु जेव्हां त्याचा कांहींच इलाज चालेना तेव्हां तो वेडापिसा होऊन रानोमाळ भटकूं लागला. पुढें भटकतां भटकतां एके दिवशीं माझ्या राजधानीनजीक त्याची व माझी गांठ पडली. तेव्हां त्याचें तें दुःख पाहून मला अतिशय वाईट वाटलें ह्मणून त्यास बरोबर घेऊन मी **शहाबादे**स आलों. नंतर **हस्नबानू**ची भेट घेऊन त्या माझ्या मित्राकरितां तिच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें काम मी पतकरिलें. त्याप्रमाणें आजपर्यंत तिच्या तीन प्रश्नांचा तर उलगडा केलाच; आणि हल्लीं चौथ्या प्रश्नाचा उलगडा करण्या कारितां निघालों. परंतु तुझ्या सौंदर्यपाशाच्या योगानें माझें मन आकर्षण झाल्यामुळें मी त्या मित्राचें काम करण्याचें अगदींच विसरून गेलों; तथापि **परमेश्वरकृपेनें** प्रस्तूत ती माझी इच्छा ही परीपूर्ण झाली. सबब आतां त्या माझ्या मित्राच्या कामास मला लागलें पाहिजे. कारण तो तिकडे माझ्या येण्याची वर्षाऋतुची अपेक्षा करणाऱ्या चातकाप्रमाणें मार्गप्रतीक्षा करीत असेल. यास्तव त्याचा हेतु परिपूर्ण झाल्याशिवाय मला सुखोपभोगाकडे बिलकुल लक्ष देतां यावयाचें नाहीं. आणि जर दिलें तर व्यर्थ माझ्या किर्तीस कलंक मात्र लागेल; सबब मी आतां **काराम** शहरास जातों. **हातिमा**चें हें भाषण ऐकून **भुवनसुंदरी** ह्मणालीः— **प्राणनाथ,** तुह्मी सांगतां ही सर्व गोष्ट खरी आहे. परंतु आतां तुह्मी माझी व्यवस्था काय करणार ? **हातीम** ह्मणालाः—त्याविषयीं तूं मुळींच काळजी करूं नको. कारण माझी राजधानी जें **इमन** शहर तेथें प्रस्तुत माझा बाप आहे, त्या ठिकाणीं मी तुझी रवानगी करितों.

हें त्याचें भाषण **भुवनसुंदरीस** मान्य झाल्यामुळें **हातिमानें** आपल्या बापास एक सविस्तर हकीगतीचें पत्र लिहिलें आणि तें **भुवनसुंदरी**जवळ देऊन त्यानें तिची **इमन**शहरास रवानगी केली. नंतर आपण तेथून निघून मार्ग—क्रमूं लागला. जातां जातां कांहीं दिवसांनीं **काराम**शहरास येऊन पोंहोंचल्यावर त्यानें ते-

थील लोकांस विचारलें कीं, "**खरें बोलणारा नेहमीं सुखी असतो.**" असें बोलणारा कोणी मनुष्य या शहरांत राहतो काय? ते ह्मणालेः—येथून तीन कोशांवर प्राचीन **काराम शहर** आहे तेथें एका मनुष्यानें आपल्या घराच्या दरवाज्यावर तें वाक्य लिहिलें आहे असें आमच्या ऐकण्यांत आहे. हें ऐकतांच **हातीम** तेथून निघाला आणि त्याच दिवशीं तिसरे प्रहरीं जुन्या **काराम**-शहरास येऊन दाखल झाला. नंतर तो त्या शहरांत फिरत असतां एका महालाच्या दरवाज्यावर इच्छित वाक्य लिहिलेलें त्याच्या नजरेस पडलें. तेव्हां अतिशय आनंदित होऊन तो त्या महालाच्या ओटीवर गेला. इतक्यांत आंतून एक सेवक आला आणि 'आपण कोठून आलां? जायचें कोठें?' असें विचारूं लागला असतां **हातीम** ह्मणालाः—मी **शहाबाद** शहराहून आलों असून तुमच्या यजमानाची भेट घ्यावयाची माझी इच्छा आहे. हे ऐकतांच त्या सेवकानें आपल्या यजमानाजवळ जाऊन सर्व हकीगत निवेदन केली. ती ऐकतांच त्यानें आलेल्या मनुष्यास आंत घेऊन येण्याविषयीं सेवकास आज्ञा केली.

आज्ञेप्रमाणें सेवकानें **हातिमास** आंत आणल्यावर त्या महालाच्या धन्यानें मोठ्या सन्मानानें त्यास आपल्या शेजारीं बसविलें. इतक्यांत भोजनाची सिद्धता झाल्याची वर्दी सेवकानें दिल्यावरून त्या मनुष्यानें **हातिमास** अतिशय आग्रह करून भोजनास उठविलें. नंतर उभयांचेंही भोजन आटोपल्यावर त्या मनुष्यानें विचारलेंः—**महाराज**, आपण कोठचे राहणार? व कोणता उद्देश धारण करून येथें आलां आहां? हें ऐकतांच **हातीम** ह्मणालाः—मी **इमन**शहरचा राहणारा असून माझें नांव '**हातीम**' असें आहे; **शहाबाद** शहराची मालकीण जी **हस्नबानू** तिच्या स्वरूपास पाहून '**मुनीरशहा**' या नांवाचा एक राजपुत्र मोहित झाला आहे. पण तिच्याजवळ जे सात प्रश्न आहेत त्यांचीं उत्तरें जो कोणी देईल त्याजबरोबर विवाह करावयाचा असा तिचा निश्चय असल्यामुळें त्या राजपुत्रानें त्या प्रश्नांचा उलगडा करण्याचा बराच प्रयत्न केला. तथापि त्या कामांत त्याला बिलकुल यश

आलें नाहीं. ह्मणून त्याच्या करितां त्या प्रश्नांचीं उत्तरें मिळवून देण्याचें काम मी पत्करलें आहे. आजपर्यंत मी तिच्या तीन प्रश्नांचीं उत्तरें दिलीं व हल्लीं चौथ्या प्रश्नाच्या शोधास निघालों आहें. तो प्रश्न कोणता ह्मणाल तर आपल्या महालाच्या दरवाज्यावर जें वाक्य लिहिलें आहे त्याचा अर्थ समजणें हाच आहे.

हातिमाचें हें भाषण ऐकून तो गृहस्थ ह्मणालाः—हे उदार पुरुषा, तूं धन्य आहेस !! दुसऱ्याच्या सुखाकरिता स्वतः कष्ट सोसणारा प्राणी या जगांत सांपडणें दुर्मिळ आहे ! असो, आतां इतका लांबचा प्रवास करून व कष्ट सोसून ज्या अर्थीं आपण आलां आहां त्या अर्थीं मी त्या वाक्याचा अर्थ आपणास उद्यां सांगेन. हें ऐकतांच हातीम ह्मणालाः—आपणांला एक गोष्ट विचारावयाची आहे ती ही कीं, आज सकाळीं येथून तीन कोशांवर जें अर्वाचीन काराम या नांवाचें शहर आहे तेथें आलों, आणि आपणाविषयीं शोध करूं लागलों. तेव्हां तेथील लोक ह्मणालेः—येथून तीन कोशांवर जें जुनें काराम शहर आहे तेथें एक अतिवृद्ध मनुष्य असून त्यानें आपल्या महालाच्या दरवाज्यावर तुह्मी ह्मणतां हें वाक्य लिहिलें आहें. परंतु आपण तर चांगलें तरुण दिसतां इतकेंच नव्हे तर आपला एकही केंस अद्याप पिकलेला दिसत नाहीं; सबब त्या लोकांच्या सांगण्याचा व आपल्या स्थितीचा खरा इंगितार्थ काय आहे तो मला विदित करा. हें ऐकून तो मनुष्य ह्मणालाः—आतां बरीच रात्र झाली आहे यास्तव तुह्मी स्वस्थ निजा. उदयीक सर्व हकीगत मी आपणांस सांगेन. असें ह्मणून ते दोघेही निजावयास गेले.

पुढें प्रातःकाळ झाल्यावर हातिमानें सर्व प्रातर्विधि उरकून त्या यजमानासमवेत भोजन केलें. भोजनोत्तर पानसुपारी खात ते उभयतांही बसले असतां तो मनुष्य ह्मणालाः—हे हातिमा, येथें जें हें काराम शहर वसलें आहे त्यास आज सातशें वर्षें झालीं असून हल्लीं माझें वय आठशें वर्षांचें आहे. माझा लहानपणापासूनचा उद्योग जुगार खेळण्याचा होता. त्यामुळें एकेदिवशीं मी आपली सर्व संपत्ति त्या दुष्ट नादांत गमविली.

तेव्हां माझ्याजवळ एक फुटकी कवडीही शिल्लक उरली नाहीं. असें पाहून कोठेंतरी चोरी करावी या उद्देशानें रात्रौ आंधार पडल्यावर मी घरांतून निघालों व रस्त्यांतून जात असतां मनांत विचार केला कीं, एखाद्या गरीबाच्या घरीं चोरी करून त्यास नागवण्यापेक्षां आपल्या राजाच्याच घरीं चोरी करावी हें बरें, असा विचार करून मी राजवाड्याजवळ गेलों व दोरीच्या शिडीवरून खिडकीवाटे राजवाड्यांत प्रवेश केला. नंतर मी एका मोठ्या दिवाणखान्यांत गेलों. त्या ठिकाणीं राजकन्या स्वस्थ निजली असून तिनें आपल्या अंगावरील हिरेमाणकांचे दागिनें एका सुवर्ण ताटांत भरून तें ताट मंचकाखालीं ठेवलें होतें. राजकन्येच्यादासी निद्रासुखाच्या पूर्ण अमलांत गुंग झालेल्या असल्यामुळें निर्धास्तपणानें ते ताटासह सर्व दागिने मी एका वस्त्रांत बांधले आणि तेथें जळत असलेला रत्नदीप विझवून बगलेंत मारून आल्या मार्गानें कोणासही न समजतां बाहेर निघून पळत पळत अरण्यांत येऊन पोंहोंचलों. तेथें चोरांची एक मोठी टोळी चोरलेल्या मालाची वांटणी करीत बसली होती. त्या टोळींतील चोरांनी जेव्हां मला पाहिलें तेव्हां ते माझ्या आंगावर धांवले; हें पाहून मी भीतीनें राजवाड्यांत केलेल्या चोरीचा सर्व मजकूर त्यांस सांगितला; व ते सर्व दागिनेही त्यांस दाखविले. ते पाहून त्या चोरांस हेवा उत्पन्न होऊन माझा नाश करण्याचा ते विचार करूं लागले. इतक्यांत मेघगर्जनेप्रमाणें मोठा आवाज होऊन पृथ्वी कांपू लागली व वृक्ष उन्मळून पडूं लागले. हें पाहून ते सर्व चोर भयाभीत होऊन घाबरून पळून गेले; परंतु मी मात्र एकटाच तेथें राहिलों. पुढें कांहींवेळ गेल्यावर त्या वादळाची जराशी शांतता होऊन अकस्मात् एक सत्पुरुष माझ्या पुढें येऊन उभा राहिला आणि मला धमकी देऊन ह्मणालाः—तूं कोण आहेस? येथें कां आलास? हें खरें सांग. हें त्याचें भाषण ऐकून मी आपली साद्यंत हकीगत त्यास कळवून ते चोरून आणिलेलें दागिनेंही दाखविले. तेव्हां तो ह्मणालाः—तूं आपली खरी हकीगत सांगितलीस, हें फार चांगलें केलेंस व याकरितांच मी तुझ्या अपरा-

घांची क्षमा करून ही सर्व संपात्ति तुला बक्षीस देतों. परंतु "मी आजपासून कधींही जुगार खेळणार नाहीं" अशी शपथ मात्र तुला घेतली पाहिजे. हें त्याचें भाषण ऐकून **परमेश्वराचें** नामस्मरण करून मी त्याचवेळीं शपथ घेतली. तेव्हां तो ह्मणालाः— आतां जी तूं शपथ घेतली आहेस त्याप्रमाणें जर वागशील तर तूं९००वर्षेपर्यंत वांचशील. इतकें बोलून तो **सिद्ध** अंतर्धान पावला.

नंतर मी ह्या स्थलीं निघून अलों; व चोरलल्या द्रव्यापैकीं कांहीं खर्च करून हा महाल बांधाविला. तो पाहून माझ्या कित्येक जुन्या जुगारी मित्रांस वैषम्य वाटून त्यांनीं शहरसंरक्षणारांस सांगितलें कीं:– 'हा मनुष्य पुर्वीचा अगदीं भिकारी असून थोडक्याच वेळांत इतका श्रीमंत झाला यावरून त्यानें कोठें तरी मोठा डल्ला मारला असावा.' हें त्या मित्रांचें सांगणें कोतवालास रुचून तो माझ्या घरीं आला, आणि सर्व हकीगत विच्यारूं लागला. तेव्हां मिही आरंभापासूनची सर्व हकीगत त्यास कळविली. ती ऐकून तो-मला राजदरबारीं घेऊन गेला. पुढें तेथेंही मी आपली खरी हकीगत सांगितली. ती ऐकून राजा ह्मणालाः—ज्या अर्थीं **सिद्धानें** तुझ्या अपराधाची क्षमा केली त्या अर्थीं मीही तुझे सर्व गुन्हे क्षमा करितों. कारण आजपर्यंत मी पुष्कळ चोर पाहीले परंतु खरें बोलणारा असा एकही चोर माझ्या आढळांत आला नाहीं. आतां ज्या अर्थीं तूं खरें बाललास त्या अर्थीं माझ्या दयेस पात्र आहेस. असें ह्मणून 'याला कोणी त्रास देऊंनये अशी त्यानें सर्वांस आज्ञा केली. नंतर जेव्हां मी आपल्या घरीं परत यावयास निघालों तेव्हां राजानें बरेंच द्रव्य मला बक्षिस दिलें पुढें घरीं आल्यावर "**खरें बोलणारा नेहमीं सुखी असतो.**" असें मी आपल्या महालाच्या दरवाज्यावर लिहून ठेविलें. इतकें बोलणे झाल्यावर तो मनुष्य ह्मणालाः—हे **हातिमा,** ही मी सांगितलेली हकीगत ऐकून तुझे एक मोठेंच कार्य होणार आहे; हें पाहून मला मोठें समाधान वाटतेः इतकेच नव्हे तर तूं **इमन** देशाचा राजा असून आज आनायासानेंच तुझी व माझी भेट झाली येणेंकरून मी आपणास मोठा धन्य समजतों.

इतकें बोलणें झाल्यावर पुढें एक दोन दिवसांनीं त्या मनुष्याची परवानगी घेऊन **हाताम** तेथून निघाला व **शहाबादेस** जाण्याकरीतां मार्गक्रमूं लागला. **भुवनसुंदरीची** वारंवार आठवण होऊं लागल्यामूळें **हातीमास** चैन पडेनासें होऊन प्रथम **इमन**शहरास जाऊन आपल्या प्राणप्रियेची भेटघेऊन नंतर **शहाबादेस** जावें असा त्यानें निश्चय केला. त्याप्रमाणें मजल दरमजल करीत कांहीं दिवसांनीं **इमन**शहराच्या नजीक आल्यावर विश्रांति घेण्यांकरीतां तो एका आम्रवृक्षाखालीं बसला असतां त्या वृक्षावर एक राघू व मैना यांचें जोडपें कांहीं बोलत आहे असें त्याच्या कानीं आलें. **हातिमास** पक्ष्यांचीभाषा अवगत असल्यामुळ तें जोडपें काय बोलत आहे हें ऐकण्याची त्यास इच्छा झाली; ह्मणून चित्त देऊन तो त्यांचें भाषण ऐकूं लागला. प्रथम मैना राघूस ह्मणाली:—**प्राणनाथ**, तुह्मी मला एकटी सोडून दूरदेशीं जाऊं नका, हें मी आपणांस विनंतीपूर्वक सांगतें. हें तिचें भाषण ऐकून राघू ह्मणाला:—तूं जरी कितीही विनंती केलीस तरी ती न ऐकतां मी प्रवासास जाणार. कारण, मी ज्या कार्याकरितां जाणार आहें तें केल्यानें **परमेश्वर** माझ्यावर संतुष्ट होईल. तुमचें बायकांचें काय? कोणीकडून आपला कार्यभाग झाल्याशीं गरज. परतु तुमच्याप्रमाणें वागतां येत नाहीं. स्त्रियांच्या मताप्रमाणें वागलें असतां मोठेमोठे अनर्थ होतात. कारण एक राजा स्त्रीबुद्धीनें चालून जसा अखेर पश्चात्ताप पावला तशी कदाचित माझी स्थिति होईल.

राघूचें हें भाषण ऐकतांच मैना ह्मणाली:—त्या राजाची गोष्ट मला माहित नाहीं यास्तव एकवेळ कृपा करून ती मला सांगा. तेव्हां राघू ह्मणाला:—एकवेळीं एक राजा मृगया करण्याकरितां गेला व त्यानें तो सर्व दिवस त्या कामांत खर्च केला तरी एकही श्वापद त्याच्या तडाक्यांत सांपडलें नाहीं. पुढें रात्र होतांच इतर शिकारीलोकांची व त्याची फाटाफूट होऊन तो राजा रानोमाळ भटकूं लागला. अशा रीतीनें भटकतां भटकतां तो एका बागेजवळ आला. नंतर त्या बागेंत जेव्हां तो बराच लांब गेला तेव्हां त्याच्या दृष्टीस एक महाल पडला. त्या महालाच्या नजीकच एक विहारस्थान

असून चालण्याच्या श्रमानें राजा फारच दमला होता. सबब हस्तपाद प्रक्षालन करून थोडेसें उदक प्राशन करावें या हेतूनें तो त्या विहारस्थलीं गेला आणि हात पाय धुवून पाणी पिऊं लागला. इतक्यांत त्याचे हातास एक लोखंडी सांखळी लागली! ह्मणून तो ती वर ओढूं लागला. परंतु कांहीं केल्या ती वर येईना. हें पाहून ह्या सांखळीस कांहीं तरी जड पदार्थ बांधलेला असावा असें समजून राजानें दोन्ही हातांचा जोर करून ती वर ओढली. तों तिच्या शेवटास एक पेटी बांधलेली असून तिची किल्लीही तिच्या एका बाजूस बांधलेली त्यास आढळली. नंतर चकित होऊन ह्या पेटींत कांहींतरी अपूर्व जिन्नस असेल असें समजून त्यानें ती पेटी उघडली तों आंतून एक तेजःपुंज स्त्री बाहेर निघाली. हें पाहून राजा आश्चर्यभरीत होऊन तटस्थ उभा राहिला.

ही राजाची स्थिति पाहून ती स्त्री ह्मणालीः—**महाराज,** आपण कोणत्याही रीतीची शंका मनांत धरूं नका. कारण मी मनुष्यजातींतीलच आहें. असें ह्मणून तिनें त्या पेटींतून कांहीं फराळाचे पदार्थ काढून राजापुढें ठेवले आणि त्यास खाण्याचा आग्रह करून आपणही नानाप्रकारचीं विनोदी भाषणें करीत तेथेंच बसली. इतक्यांत राजास आपल्या घरच्या मनुष्यांची आठवण झाल्यामुळें तो तेथून उठला आणि आपल्या हातांतील एक आंगठी त्या स्त्रीस देऊन ह्मणालाः—मी तुला ह्या तलावांतून बाहेर काढलें व उभयतांनीं जो थोडासा वेळ आनंदांत घालविला त्याची आठवण राहण्याकरितां ही तूं आपल्याजवळ ठेव. हें ऐकतांच ती स्त्री ह्मणालीः—राजा, ही माझ्या जवळील आंगठ्यांची माळ पाहिली काय? आतां मी आपलें वर्तमान सांगतें तेवढें कृपा करून ऐका; राजानें तिला सांगण्याची परवानगी दिल्यावरून ती ह्मणालीः—मी एका राजाची स्त्री असून नवऱ्याला माझा विश्वास पटेना ह्मणून त्यानें या ठिकाणीं हा बाग, महाल व तळें अशीं तयार करून मला या पेटींत बंद करून ठेवलें. तो नित्य रात्रीं या ठिकाणीं येतो आणि मला बाहेर काढून सुखविलास भोगून प्रातःकाळीं कांहीं खाण्याचे पदार्थ व मला या पेटींत घालून ती

बंद करून तळ्यांत बुडवून निघून जातो. **महाराज,** आपण जसे येथें चुकून आलां त्या प्रमाणेंच आजपर्यंत पुष्कळ पुरुष चुकून येथें आले व आपल्याप्रमाणेंच कांहीं वेळ मजसमागमें **विनोदांत** घालवून आपल्या खुणेची एकेक आंगठी देऊन जातांना मला पेटींत बंद करून व ती तळ्यांत बुडवून निघून गेले. हें तिचें भाषण ऐकून राजानें त्या स्त्रीस पुर्ववत् पेटींत घातली व ती पेटी तळ्यांत बुडवून तो तेथून निघून गेला. पुढें तो आपल्या **राजधानींत** गेल्यावर त्याचा चेहरा म्लान झालेला त्याच्या आप्तांच्या नजरेस पडला. त्यावरून तशी स्थिति होण्याचें कारण त्यांनीं विचारलें. तेव्हां राजानें त्या स्त्रीची सर्व इत्थंभूत हकीगत निवेदन केली. ती ऐकून ते आप्त ह्मणाले:—स्त्रियांची जात स्वभावतःच चंचल व दुराचरण प्रवर्तक आहे. तथापि अशा चांडाळणी स्त्रियांच्या चंचलवृत्तीविषयीं शहाण्या मनुष्यानें कधींही खेद करूं नये. हें त्या आप्तांचें सुबोध भाषण ऐकून राजानें मनांतील विचार सोडून दिले आणि पूर्वीप्रमाणें आनंद वृत्तीनें तो राहूं लागला.

इतकें बोलून राघू मैनेस ह्मणाला, त्या दुष्ट स्त्रीप्रमाणें तूंही मजबरोबर बेइमानीपणानें वागत नसशील हें तरी कशा वरून! ह्या करितां मला जी गोष्ट कर्तव्य आहे ती केल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. कारण ह्या वृक्षाखालीं जो **हातीम** राजा बसला आहे त्या सारखा मी मुर्ख नाहीं. तो पहा कसा **मुनीरशहास** तुझें काम करतों असें सांगून परोपकार करणें सोडुन एका **पद्मिणी** स्त्रीच्या नादास लागला आहे ! सारांश, ज्या स्त्रीजातीनें ब्रह्मा, विष्णु व महेश इत्यादिकांससुद्धां मोहित केल्या शिवाय सोडले नाहीं त्या स्त्रीजातीच्या नादानें चालणारा मी नव्हे, हें तूं पक्के समज.

येणें प्रमाणें त्या दोघांचें भाषण ऐकून **हातीम** मनांत फारच लज्जित झाला. आणि **परमेश्वरानेंच** आपणास ह्या सुबोध केला असें समजून कांहींवेळ त्याची स्तुति करून **इमन** शहरास जाण्याचा बेत रहित करून तो **शाहाबादेस** जाण्या करितां निघाला. पुढें कांहीं दिवसांनीं तो तेथें जाऊन पोहोंचल्यावर प्रथमतः **मुनिरशहाची** भेट घेऊन त्यास आपल्या प्रवासाची सर्व हकीगत सांगून

नंतर ते दोघेही हस्नबानूच्या महालीं गेले. तेव्हां तिनें त्या दोघांसही मोठ्या सन्मानानें बसवून चौथ्या प्रश्नाची हकीगत विचारली. नंतर शहाबाद सोडल्या पासून पुन:परत येईपर्यंत झालेली सर्व हकीगत हातमान तिला सांगितली. ती एकून हस्नबानूस अतिशय आनंद झाला. तेव्हां हातिम ह्मणाला:—आतां तुझा पांचवा प्रश्न काय आहे तो मला सांग? ह्मणजे:—थोडक्याच दिवसांत त्याचाही उलगडा करीन. हें ऐकून बानू ह्मणाली:—‘ कोहनिदा ’ असा आवाज करणाऱ्या पहाडाची खबर काय आहे” ती मला कळवा. हें ऐकतांच बानूची रजा घेऊन हातिम तेथून निघाला आणि मित्राकडेस एक दोन दिवस विश्रांतिघेऊन पांचव्या प्रश्नाचा उलगडा करण्या करितां तो तें शहाबाद शहर सोडून निघाला.

**प्रश्न ४ था समाप्त.**

---

# प्रश्न ५ वा.

## “‘कोहनिदा’ असा आवाज करणाऱ्या पहाडाची गुप्त खबर काय आहे?”

पांचव्या प्रश्नाच्या तपासासांठीं हातिम, शहाबादेहुन निघाला तो दरकुच दरमजल करीत करीत चालला असतां वाटेंत जे जे लोक भेटतील त्यांच्याजवळ तो त्या पर्वताविषयीं शोध करीत असे. अशारीतीनें सुमार सहा महिनें पर्यंत प्रवास केल्यावर त्यास एक अफाट वस्तीचें शहर लागलें. परंतु तेथील सर्व रहिवासी शहराच्या तटाबाहेर एकत्र जमलेले हातिमाच्या नजरेस पडल्यावरून तो चौकशी करण्याच्या उद्देशानें त्यांजकडेस जाऊं लागला. इतक्यांत त्या एकत्र जमलेल्या मंडळीच्या नजरेस हातीम पडल्यावरून ते मोठ्यानें ओरडून ह्मणाले:—“ यावें यावें महाराज; आह्मी सर्व मंडळी आपलीच वाट पहात आहों. ” हें त्या सर्व मंडळीचें भाषण ऐकतांच हातीम अगदीं चकित होवून गेला. पुढें जेव्हां तो अगदीं जवळ आला तेव्हां पंचपक्वान्नांनीं वाढलेलीं पुष्कळ

साटें असून पलीकडच्या बाजूस एक सुंदर कफन तयार केलेलें आहे; व ज्या मृत मनुष्याचें प्रेत त्यांत ठेविलें होतें त्याचें सोहिरे संबंधी त्या सभोंवतीं बसले आहेत. हा जेव्हां अद्भुत चमत्कार त्यानें पाहिला तेव्हां तो अगदींच साशंक झाला. इतक्यांत त्या मंडळी-पैकीं एकजण पुढें होऊन ह्मणालाः—हा सर्व प्रकार आह्मीं आपल्या गांवच्या रिवाजाप्रमाणें केला आहे. कारण येथील रीत अशी आहे कीं, कोणीही मनुष्य मरण पावला, मग तो श्रीमंत असो अथवा गरीब असो, गांवांतील सर्व लोक शहरा बाहेर येतात आणि पंचपक्वान्नी भोजन सिद्ध करून ठेवितात. परंतु अशावेळीं कोणीतरी प्रवासी मनुष्य आला पाहीजे. कारण तो येऊन त्यानें अन्नाचे पांच घांस घेतल्याशिवाय आह्मी कोणीही अन्नाला शिवणार नाहीं व प्रेतासही मूठमातीं देणार नाहीं. अशी चाल असल्यामुळें आज सात दिवसपर्यंत कोणातरी प्रवाशाची आह्मी एक सारखी वाट पाहत आहों; परंतु कोणीच आला नाहीं त्यामुळें रोज नवीन अन्न तयार करावें लागतें सारांश, सात दिवस अन्नपाण्या विरहित आह्मी काढले; परमेश्वरकृपेनें आज आपण आलां त्यामुळें आह्मां सर्वांस अतिशय आनंद झाला आहे.

हें त्या मंडळाचें भाषण ऐकून हातिम ह्मणालाः—जर कोणी तुमच्या पैकीं एखादा मनुष्य मेला आणि एक महिनापर्यंत कोणीही प्रवासी येथें आला नाहीं तर तुह्मी कसें करतां? व प्रेताची व्यवस्था काय करितां? ते लोक ह्मणालेः—बहुधा अशी गोष्ट कधींच होत नाहीं; परंतु जर तसा प्रसंग आलाच तर पंधरा दिवसांनीं भोजन करण्याची आह्मांस मोकळीक आहे. परंतु प्रेत मात्र तसेंच ठेवलें पाहीजे. पुढें जर एक महिनापर्यंतही कोणी प्रवासी आला नाहीं व प्रेतास घाण येऊं लागली तर आह्मी तें प्रेत पुरतों. परंतु असें केलें असतां सहामहिनें पर्यंत आह्मांस फक्त दिवसा उपवास करावा लागतो. इतकेंच नाहीं, तर मरणारा मनुष्य पापी असल्यामुळें त्याच्या कुडीची अशी स्थिती झाली ह्मणून त्याच्या आत्म्याच्या तारणा करीतां आह्मांस भजन करावें लागतें. हें ऐकुन हातीम ह्मणालाः—एखाद्या मनुष्या साठीं तुह्मीं सहा महीनें उपवास करूं

लागला, आणि तितक्यां दुसरा कोणी मनुष्य मरून त्याच्या प्रेतास मूठ माती देण्यास कोणी प्रवासी मिळाला नाहीं तर तुह्मी कसें करतां ? ते ह्मणालेः—कोणी प्रवासी येई पर्यंत वाट पहातो; परंतु एक माहिन्याच्या मुदतींत जर कोणीं आला नाहीं तर त्याच्याही प्रेतास मूठमाती देऊन सहा महिनेपर्यंत उपवास व **परमेश्वराचें** भजन करतों. नंतर सहा माहिनें झाल्यावर शहरा बाहेर एक मोठा भोजन समारंभ करून भिक्षुक मंडळींस दक्षणा देऊन आंधळे, पांगळे मुके आणि बहिरे यांसही पुष्कळ द्रव्य देतों. मग भोजन समारंभ आटोपल्यावर सर्व मंडळी एकत्र जमून मयताच्या थडग्याजवळ जातों आणि फकिरांस दानधर्म करून आपापल्या कामास लागतों.

ही त्या शहरवासी मंडळीची चमत्कारिक रीत पाहून **हातिमास** अतिशय नवल वाटलें. इतक्यांत त्या मंडळींनें तें मृत मनुष्याचें प्रेत एका गादीवर निजवून त्यांत मौल्यवान मसाला भरला, व धूप जाळून सर्वांनीं सात प्रदक्षिणा केल्या. नंतर सर्व मंडळीचीं पात्रें वाढून तयार झाल्यावर त्या मंडळींपैकीं जो मुख्य होता तो **हातीमा**जवळ येऊन ह्मणालाः—हें जें प्रथमचें पात्र मांडलें आहे त्याजवर बसून पांच घांस घ्या ह्मणजे आह्मी सर्वजण भोजनास बसूं. हें त्याचें भाषण ऐकतांच **हातीम** त्या पानावर बसला; व पांच घांस घेतल्यावर ती सर्व मंडळी भोजन करूं लागली. भोजनोत्तर उरलेलं अन्न त्यानीं आपल्या बायका मुलांस पाठवून देउन नवीन धुपट वस्त्रें परिधान करून जुनी वस्त्रें परटाकडे रवाना केलीं. नंतर तें प्रेत उचलून ती सर्व मंडळी दुसऱ्या एका मैदानाकडे निघुन गेली. तेथें गेल्यावर प्रेतास मूठमाती देऊन जेव्हां ती मंडळी परत फिरली तेव्हां त्या मंडळीतील मुख्य **हातिमास** ह्मणालाः—कृपा करून कांहीं दिवस पर्यंत तुह्मी आमच्या येथें रहावें. हें त्याचें ह्मणणें **हातिमानें** मान्य केल्यावर तो त्या मंडळी बरोबर शहरांत गेला. तेव्हां एक सुंदर बंगला **हातिमास** राहण्याकरितां त्या मनुष्यानें दिला व मेजवानीची सर्व सिद्धता करवून वारांगनेंचें नृत्य करविलें. ही त्या लोकांची विलक्षण चाल पाहून **हातिमास** अतिशय नवल वाटलें.

नंतर भोजनाची सर्व सिद्धता झाल्यावर तेथें जमलेल्या सर्व मंडळीनें भोजन केलें. भोजनोत्तर कांहींवेळ नृत्य गायन चाललें होतें; परंतु **हातिमानें** तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. पुढें हा समारंभ आटोपल्यावर पांच सहा दिवसपर्यंत **हातीम** त्या ठिकाणीं होता. तितक्या वेळांत त्याच्या चांगुलपणाची किर्ती जिकडे तिकडे पसरून त्या शहरच्या राजाच्या कानावर गेली; त्यावरून राजानें त्यास बोलावूं पाठविलें. पुढें राजवाड्यांत गेल्यावर राजानें **हातिमाचा** मोठा सन्मान करून आपल्या शेजारीं बसविलें. कांहींवेळपर्यंत इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर राजा ह्मणालाः—आपण माझ्या राज्यांत सदोदित राहून आपल्या भेटीचा लाभ नेहमीं देत जावा; व मी आपली कन्या तुह्मांस अर्पण करतों तिचा प्रेमपूर्वक अंगिकार करावा. राजाचें हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—हें तुमचें बोलणें निरुपायामुळें मला मान्य करवत नाहीं. कारण, प्रस्तुत मी एका नाजुक कामाकरितां निघालों आहें. तें काम पुरें झाल्याशिवाय माझ्यानें कोणतीही गोष्ट करवत नाहीं. राजा ह्मणालाः—असें जें नाजुक काम आहे तें मला सांगा. ह्मणजे मीही मदत करण्याकरितां आपणांबरोबर येतों. त्यावर **हातीम** ह्मणालाः—तुह्मी ह्मणतां ह्या गोष्टीबद्दल मी आपला फार आभारी आहें. परंतु ज्या ठिकाणीं मी जाणार आहें तें ठिकाण फारच लांबचें असल्यामुळें वाटेंत महत् संकटें व दुःखें भोगावीं लागणार. यास्तव माझ्यानें ही गोष्ट कबूल करवत नाहीं. राजा ह्मणालाः—तें असो, परंतु आपण ज्या कामाकरितां इतक्या लांबीचा प्रवास करणार आहां तें कोणतें काम आहे तेवढें मेहेरबानी करून कळवा. हें त्याचें भाषण ऐकून **हातिमानें**, **हस्नबानूची** व **मुनीरशहाची** सर्व हकीगत त्यास निवेदन केली. आणि ह्मणालाः—मी तिच्या चार प्रश्नांचीं उत्तरें तर दिलींच परंतु पांचवा प्रश्न जो "**कोहनिदा, असा आवाज करणाऱ्या पहाडाची गुप्त खबर काय आहे?**" त्याचा उलगडा करण्याकरितां मी निघालों आहें. आजपर्यंत त्या पर्वताच्या संबंधानें मी पुष्कळ लोकांजवळ तपास केला. परंतु त्यांना ती गोष्ट मुळींच माहित नसल्यामुळें

मला कांहीं माहिती मिळाली नाहीं. आतां आपणांस जर त्याविषयीं कांहीं माहिती असेल तर मला सांगा; ह्मणजे माझ्याबरोबर आल्याचें श्रय अपणास मिळेल.

त्या शहरच्या राजाला इतिहासाचें बरेंच ज्ञान असल्यामुळें तो हातिमास ह्मणालाः—'ह्मलमत्' नामक एक अंधारी प्रदेश आहे, त्याच्या दक्षिणेस तुह्मी ह्मणतां हा पर्वत आहे. त्या पर्वताच्या शेजारीं जें 'नैडा' नांवाचें शहर आहे तेथील लोक अमर आहेत. कारण रोग व मृत्यु हे कसे येतात याविषयीं त्यांस बिलकुल अनुभव नाहीं. ही त्या पर्वताची हकीगत ऐकतांच हातिमास अतिशय आनंद होऊन तो ह्मणालाः—आतां मला येथून जाण्यास रजा द्या. तेव्हां राजा ह्मणालाः—आपण तेथें एकटे कसे जाल? हातीम ह्मणालाः—परमेश्वर साह्यकारी असल्यावर एकटें जाण्यास काय हरकत आहे? इतकें बोलणें झाल्यावर राजानें हातिमास पुष्कळ द्रव्य दिलें तेव्हां जरुरी पुरतें त्यांतलें कांहीं द्रव्य मात्र हातिमानें घेऊन बाकीचें द्रव्य गरीब गुरिबांस वांटून टाकलें. नंतर तो राजाची आज्ञा घेऊन तेथून मार्ग क्रमूं—लागला. जातां जातां सुमारें तीन महिन्यांनीं त्यास एक शहर लागलें; परंतु तेथें स्मशान भूमी किंवा एकही थडगें दिसेना. त्या वरून राजानें सांगितलेलें 'नैडा' शहर हेंच असावें असें हातिमास वाटलें. पुढें शहरांत गेला तेव्हां तेथील लोक त्यास 'आपण कोठून आलां? जायचें कोठें? असें विचारूं लागले. तेव्हां हातिमानें मला नैडा पर्वताकडे जावयाचें आहे असें त्यांस सांगितलें. त्याचें हें भाषण ऐकून ते लोक ह्मणालेः—अहो तुह्मी त्या पर्वताकडे जावयाची आशा सोडून द्या. कारण तिकडे जाणें अतिशय भयप्रद आहे. हातीम ह्मणालाः—तें कांहीं असो, फक्त परमेश्वराची कृपा असली ह्मणजे कितीही संकटें आलीं तरी तो त्यांतून मला सुरक्षित पोंहोंचवील. इतकें बोलणें झाल्यावर ते लोक ह्मणालेः—हे प्रवाशा, आजची रात्र या आमच्या शहरांत राहून तूं विश्रांति घे व उद्यीक आपल्या कामाला जा. हातिमानें ही त्यांची गोष्ट मान्य केल्यावर त्या मंडळींतील एका मनुष्यानें हातिमास आपल्या घरीं नेलें.

त्याच दिवशीं त्या शहरांत एक मनुष्य आजारी पडल्यावरून त्याच्या आप्तांनीं त्यास ठार मारून त्याच्या मांसाचे विभाग करून सर्वांनीं वांटून घेतले. त्यांतला एक वांटा ज्यानें **हातिमास** आपल्या घरीं नेलें होतें त्यास मिळाला होता. व तो संध्याकाळच्या भोजनाकरितां त्यानें तयार करविला होता. पुढें संध्याकाळ झाल्यावर दोन ताटांत दुसरे कांहीं पदार्थ व नरमांस सारखें वाढून त्यानें **हातिमास** भोजनास बोलाविलें; आणि ह्मणालाः—आज जें मांस मी तयार केलें आहे तशा प्रकारचें मांस आपण यावज्जन्मांत सुद्धां खाल्लें नसाल. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—जितकीं ह्मणून खाण्याचीं जनावरें आहेत त्या सर्वांचें मांस मी खाल्लें आहे. असें असतां आजच आपण असें कोणत्या जनावराचें मांस तयार केलें आहे तें सांगावें. हें ऐकतांच तो मनुष्य मोठ्यानें हांसून ह्मणालाः—आपण ह्मणतां ती सर्व गोष्ट खरी. परंतु आजपर्यंत आपल्या खाण्यांत नरमांस कधींच आलें नसेल! हें त्याचें भाषण ऐकून **हातीम** घाबरून ह्मणाला, नरबलीप्रिया देवीच्या भक्ताविषयीं ज्या गोष्टी मी ऐकल्या आहेत ते तर हे लोक नाहींत ना!! आणि जर ते हेच लोक असले तर एखाद्या प्रवाशी मनुष्यास मारल्याशिवाय कधींच चुकावयाचे नाहींत. **हातिमाचें** हें भाषण ऐकून तो मनुष्य ह्मणालाः—**महाराज,** हें नरबलि—प्रिया देवीचें स्थान असून आपणासही एखादे दिवशीं त्या देवीस अर्पण करावें लागेल.

हे त्या मनुष्याचे शब्द ऐकतांच **हातिमानें** अरण्याकडे धांव घेतली; व एकसारखा कोठेंही विश्रांति न घेतां तो दोन दिवसपर्यंत बराच मार्ग—क्रमून गेला. परंतु क्षुधेची व तृषेची अतिशय पीडा झाल्यामुळें त्याच्यानें पुढें एकही पाऊल टाकवेनासें झालें. तेव्हां त्यानें निरुपायास्तव एक हरीण मारलें व त्याच्या मांसाचा एक तुकडा, चकमकीनें विस्तव पाडून तो पेटल्यावर त्याजवर भाजूं लागला. इतक्यांत एक भुकेलेला सिंह **हातिमाजवळ** येऊन ह्मणालाः—हे परोपकारी मनुष्या, अतिशय भूक लागली आहे. यास्तव कांहींतरी खावयास दे. हें त्या सिंहाचें भाषण ऐकून **हा-**

**तिमानें** तें मारलेलें हरीण सिंहास खावयास दिलें. तें खाऊन पाणी पिऊन तो सिंह निघून गेल्यावर **हातिमानें** तो भाजलेला मांसाचा तुकडा व दुसरी कांहीं कंदमुळें खाऊन ओहोळाचें पाणी पिऊन क्षुधा आणि तृषा यांची शांतता केली. नंतर तो तेथून पुढें जाऊं लागला असतां कांहीं वेळानें त्यास एक रेतीचें मैदान लागलें. त्यांतून प्रवास करीत चालला असतां त्यास तृषेची पीडा अतिशय झाली. इतक्यांत समोर एक पाण्याचा ओढा आहे असा भास झाल्यावरून तो मोठ्या उत्सुकतेनें तेथपर्यंत गेला. परंतु तें मृगजल असल्यामुळें **हातीम** अगदीं निराश होऊन एका झाडाखालीं विश्रांति घेत बसला असतां एक पाणकोंबडा तेथें आला. त्यास पाहून तेथें जवळच कोठेंतरी पाणी असावें असें समजून **हातीम** तेथून उठला आणि आसपास तपास करूं लागला. तों एक मोठा ओढा त्याच्या नजरेस पडला. तेव्हां **हातिमानें**, मोठ्या आनंदानें तेथें जाऊन हस्तपाद—प्रक्षालन केलें आणि कांहीं वेळ परमेश्वराची अनन्य भावानें प्रार्थना करून तृषेचें शमन केलें.

पुढें तो तेथून निघून मजल दरमजल करीत करीत कांहीं दिवसांनीं एका खेड्याजवळ आला. तों एका शेतांत मोठा अग्नि प्रदीप्त करून बरीच मंडळी त्याज सभोंवतीं जमली आहे. हा प्रकार पाहून त्या लोकांचा आज कांहींतरी सणाचा दिवस असेल म्हणूनच ही मंडळी येथें जमली आहे असें प्रथमतः **हातिमास** वाटलें. तथापि याचा शोध करावा या उद्देशानें **हातीम** तेथें गेला आणि त्या लोकांस म्हणालाः—तुम्ही हा अग्नि कां पेटविला आहे? व त्याज सभोंवतीं इतके लोक जमून आक्रोश कां करीत आहां? यांचें कारण मला मेहेरबानी करून कळवा. **हातिमाचें** हें भाषण ऐकून त्या जमलेल्या मंडळीपैकीं एक मनुष्य म्हणालाः—आज आमचा एक आप्त मेला; त्यास हा मंत्राग्नि दिला असून त्याच्या पत्नीनेंही त्याज बरोबर सहगमन केलें आहे. हें ऐकून **हातीम** म्हणालाः—यावरून तुम्हीं प्रेतें पुरीत नाहीं? बरें तें असो, परंतु मेलेल्या मनुष्याबरोबर तुम्ही त्याच्या पत्नीला जिवंत जाळलेंत ही गोष्ट मात्र वाईट केलीत. त्या बापडीचा प्राण जाण्यास

तुह्मी सर्व लोक कारणीभूत आहां यांत बिलकुल शंका नाहीं. **हातिमाचें** हें भाषण ऐकून तो गृहस्थ ह्मणालाः—यावरून तुह्मी या आमच्या देशांत प्रथमतःच आलां आहां असें वाटतें. असो, या आमच्या देशास हिंदुस्थान ह्मणतात. येथील मृत्यु पावलेल्या मनुष्यास जाळण्याचाच प्रघात आहे. इतकेंच नाहीं तर मृत मनुष्याच्या प्रेताबरोबर त्याच्या बायकोनें सहगमन करण्याची इकडे चाल आहे. आतां तुह्मी ह्मणतां कीं, 'या बाईस तुह्मी जुलमानें जाळलीत' परंतु तसें नाहीं; कारण ती स्वसंतोषानेंच सती गेली आहे. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—तें कांहीं असो, परंतु मृत मनुष्याबरोबर त्याच्या स्त्रीनें गमन करणें ही चाल एकंदरीनें दुष्ट आहे यांत संशय नाहीं.

इतकें बोलणें झाल्यावर **हातीम** तेथून निघाला आणि सर्व रात्र चालून दुसरे दिवशीं भरदोनप्रहरच्या सुमारास एका गावांत येऊन पोहोंचला. त्या वेळेस त्यास अतिशय भूक लागली होती, सबब उपाहारार्थ कांहींतरी भक्ष्य मिळविण्याच्या उद्देशानें तो तेथील एका गृहस्थाच्या घरीं गेला, व घरचा मालक ओटीवर बसला होता त्याच्याजवळ त्यानें विनंती करून कांहीं खाण्यास मागितलें. हें त्याचें भाषण ऐकून घरधनी आंत गेला आणि कांहीं खावयाचे उत्तम पदार्थ आणून ते त्यानें **हातिमास** दिलें. ते खाऊन पाणी प्याल्यावर **हातिमास** जराशी हुषारी आली. नंतर तो इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलतां बोलतां ह्मणालाः—या तुमच्या देशांत मृतमनुष्याबरोबर त्याची स्त्री सती जाते; ही चाल न्यायदृष्टीनें पाहिली असतां योग्य नाहीं. कारण परमेश्वरानें जो हा नरदेह आपणांस दिला आहे त्याचा जुलमानें नाश करणें ह्मणजे एकाअर्थीं त्याच्या इच्छेविरुद्धच जाण्यासारखें आहे. हें ऐकून तो घरधनी ह्मणालाः—आपण ह्मणतां त्याप्रमाणें परदेशी लोकांची समजूत आहे. तथापि स्त्रीपुरुषामध्यें जी अवर्णनीय प्रीति असते त्या प्रीतिमध्यें एकाच्या मरणानें अंतर पडतें. सबब त्या दंपत्यापैकीं एक मनुष्य वारल्यावर राहिलेल्या दुसऱ्या मनुष्यास चैन पडेनासें होतें ह्मणूनच विधवा स्त्रिया आपल्या पती-

बरोबर मोठ्या आनंदानें सहगमन करितात. आतां जर आपणांस या गोष्टीची प्रचिती पहावयाची असेल तर कांहीं दिवस आमचे येथें रहा. इतकें त्या उभयतांचें बोलणें होत आहे तो संध्याकाळ झाली ह्मणून त्या गृहस्थानें **हातिमास** वस्तीस राहण्याचा अतिशय आग्रह केला. **हातिमानें**ही विशेष ओढाताण न करितां त्या गृहस्थाचें भाषण मान्य केलें व तो त्या रात्रीं तेथेंच स्वस्थ झोंपी गेला.

पुढें दुसरे दिवशीं सकाळीं **हातिम** त्या गृहस्थाजवळ जाण्याची परवानगी मागूं लागला. परंतु त्या दिवशीं **हातिमास** राहण्याचा त्या गृहस्थानें फारच आग्रह केला ह्मणून निरुपायास्तव तो तेथें राहिला. इतक्यांत त्या गांवांतील एक गृहस्थ पुष्कळ दिवस आजारी पडला होता तो वारला. त्या पुरुषास चार स्त्रिया असून दोघींस मुलें झालीं होतीं. पुढें दोन प्रहरच्या सुमारास त्या मृत मनुष्याच्या आप्तांनीं त्याजला ताटीवर घालून जेव्हां बाहेर काढलें तेव्हां त्याच्या चारी स्त्रिया सुंदर वस्त्रें परिधान करून व आंगावर सोन्याचे अलंकार आणि सुवासीक पुष्पांच्या माळा घालून पानाचे विडे खात त्या प्रेताबरोबर चालल्या होत्या. बरोबर जे आप्त सोयरे होते ते त्या बायांस सतीं न जाण्याविषयीं विनंती करीत होते. परंतु पतिवियोगाचें दुःसह दुःख झालें असल्यामुळें त्यांनीं कोणाच्याही बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं.

हा सर्व प्रकार **हातीम** पहात होता; तरी आपण एकवेळ त्या बायांची समजूत करून पहावी असें वाटल्यावरून तो पुढें होऊन ह्मणालाः—हे बायांनों, हा असा वेडेपणा करूं नका. पतिसमवेत सहगमन करण्याच्या अविचारी व धिःकारयुक्त चालीचें अवलंबन करून आपला प्राण-त्याग करावयाचा व मुलांबाळांस अंतरावयाचें हा तुमचा वेडेपणा नव्हे काय? **हातिमाचें** हें भाषण ऐकून त्यांतिल एक स्त्री ह्मणालीः—**मियासाहेब**, आपण या देशांतील रहिवासी नाहीं असें वाटतें. कारण, स्त्रीजातीचें ऐश्वर्य आणि सर्व सुखें केवळ पतीवरच अवलंबून असतात. आह्मी संसार सुखाचा अनुभव घेत असतां त्या दुष्ट मृत्यूनें आमच्या पतीस कां न्यावें बरें? अहो **मियासाहेब**, पतीविरहित ह्या जगांत वास करणें आह्मां **स्त्रियांस**

स्वसंतोषपरी योग्य नाहीं. नरकवास जो ह्मणतात तोही पतिविरह-दुःखापेक्षां बरा. आतां आपण परदेशीय आहां ह्मणूनच तुह्मास ह्या वेडेपणाबद्दल क्षमा केली आहे. हें त्या स्त्रीचें भाषण ऐकून हातीम निरुत्तर झाला. इतक्यांत प्रेत दहन करण्याची सर्व सिद्धता झाल्यावर त्या स्त्रियांनीं आपल्या अंगावरचे दागिनें काढून आप्तांस वांटले. नंतर त्या सर्वांचा निरोप घेऊन पतीच्या प्रेता सन्निध जाऊन बसल्या व दोघींनीं त्याचा एकेक हात व दोघींनीं एकेक पाय पोटांशीं धरून ठेविला. इतकें झाल्यावर त्या स्त्रियांनीं आपल्या आप्तांचा निरोप घेतला. त्याबरोबर लोकांनीं लांकड रचून त्या प्रेतास अग्नि लावून दिला.

इतका प्रकार जरी हातिमानें स्वदृष्टीनें पाहीला तरी त्या स्त्रिया स्वसंतोषानेंच सती जातात अशी त्याची खात्री होईना. परंतु अग्नी भडकला तरी जेव्हां त्या स्त्रिया बाहेर पडेनात तेव्हां मात्र त्याची पुरी खात्री झाली. पुढें प्रेतासह त्या चारही स्त्रिया जळून गेल्यावर हातिमाचें मन सद्गदित होऊन नेत्रावाटें जलधारा येऊं लागल्या व त्या स्त्रियांच्या पतिप्रेमाविषयीं त्यास पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. नंतर जेव्हा ते सर्वलोक आपापल्या घरोघर जाऊं लागले तेव्हां हातिमही आपल्या मित्राबरोबर त्याच्या घरीं जात असतां तो ह्मणालाः—कां मियासाहेब, हिंदु स्त्रियांना सती जाण्याविषयीं कोणीहि आग्रह करीत नाहीं अशी तुमची खात्री झालीच असेल. पतिसमवेत सहगमन करणें हें एक उभयतांचें प्रीतिदर्शक लक्षण आहे. हें त्यांचें भाषण ऐकून हातिम ह्मणालाः—स्त्रियांनीं नवऱ्याच्या मागें पातिव्रत्य-धर्मानें राहून नवऱ्याच्या प्रीतीविषयीं लोकांचीं खात्री करून द्यावी; हा विचार सती जाण्यापेक्षां मला बरा वाटतो. कारण ईश्वरानें दिलेल्या नरतनूचा उपयोग त्याच्या सेवेकडे न करितां तिला व्यर्थ जाळून टाकणें हा शुद्ध वेडेपणा व पाप आहे. हिंदुशास्त्राप्रमाणें अग्नि हा पुरुष असतां त्याचा संसर्ग स्त्रियांनीं करणें ह्मणजे पाप नव्हे काय? परंतु सती जाण्यांत पुण्य आहे अशी तुमची समजूत असल्यामुळें या गोष्टीचा विचार तुह्मी करीत नाहीं. इतकें त्या उभयतांचें बोलणें होत आहे तोंच

ते वरीं येऊन पोहोंचले. नंतर संध्याकाळचें भोजन वगैरे आटोप-ल्यावर ते उभयतांही निद्रिस्त झाले. दुसरे दिवशीं उजाडल्यावर **हातीम** त्या गृहस्थाजवळ **नैडा**पर्वताकडे जाण्यास रजा मागूं लागला. तेव्हां तो ह्मणालाः—अहो **मियासाहेब, नैडा**पर्वताकडे जाण्याचा विचार तुह्मी सोडून द्या; कारण रस्ता अतिशय लांबचा असून वाटेनें फारच भीति आहे. हें ऐकून **हातीम** ह्मणलाः—त्याविषयीं तुह्मी बिलकुल काळजी करूं नका. कारण जर मी **परमेश्वरा**वर भरंवसा ठेवला आहे तर तो मला तेथून सुखरूप परत आणील. इतकें बोलणें झाल्यावर **हातीम** त्या मनुष्याची रजा घेऊन तेथून निघाला आणि मजल दरमजल करीत अनेक शहरें पहात पहात एका भयानक अरण्याजवळ येऊन पोहोंचला. त्या अरण्यांतून जात असतां खाण्यापिण्याचा संबंधानें **हातिमास** फारच हाल भोगावे लागले. तथापि **परमेश्वर** कृपेनें पंधरादिवस पर्यंत त्या अरण्यांतून मार्गक्रमण केल्यावर त्याचे दृष्टीस एक शहर पडलें. तेव्हां **हातिमा**नें कांहीं वेळ **परमेश्वर**-स्तवन केलें. नंतर त्या शहराकडे जात असतां पुष्कळ लोकांचा एक मोठा जमाव पाहून तो त्यांजकडेस गेला. तेव्हां ते लोक ‘मोठ्या आवेशानें आपापसांत वादविवाद करीत आहेत’ असें त्याच्या दृष्टीस पडलें. मग तो त्या जमावाच्या अगदीं नजीक गेल्यावर एका मनुष्यास ह्मणालाः—तुह्मी कोणत्या गोष्टीच्या संबंधानें वादविवाद करीत आहां ? तो ह्मणालाः—आज आमच्या गावांतील एका मनुष्याची स्त्री मरण पावली; परंतु शास्त्राप्रमाणें तिचा पती तिज समवेत समाधी घेण्यास राजी नाहीं सबब त्या गोष्टीचा आह्मी निवाडा करीत आहों. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—मृतमनुष्याबरोबर दुसऱ्या मनुष्यानें आपला प्राण देणें ही गोष्ट फारच वाईट व कृतघ्नपणाची आहे. कारण जन्म आणि मरण हीं **परमेश्वरा**च्या हातचीं असल्यामुळें मनुष्यमात्रास त्याच्या इच्छेविरुद्ध जाण्याचा अधिकार नाहीं. हें ऐकतांच त्या मृतस्त्रीचा बाप पुढें होऊन ह्मणालाः—महाराज, आह्मी ज्या मनुष्याच्या संबंधानें विचार करीत आहों तो माझा जांवई आहे. तो मनुष्य आमच्या

गावांत परदेशाहून येऊन राहिला होता. पुढें त्याची व माझ्या मुलीची प्रीति जमल्यावर त्या उभयतांचें लग्न करून देण्यास मी कोणत्याही रीतीची हरकत घेतली नाहीं. परंतु ज्या वेळेस कन्या दान करावयाचें त्या वेळेस मी सर्व लोकांसमक्ष त्यास बजाऊन सांगितलें कीं, आमच्या देशाच्या रीतीप्रमाणें तुह्मां दोघांतून एक मनुष्य मरेल तेव्हां दुसऱ्यानें त्याजबरोबर आपला प्राण देण्यास सिद्ध असलें पाहिजे. त्या वेळेस हें माझें ह्मणणें ह्यानें मोठ्या संतोषानें कबूलही केलें होतें.

ही हकीगत ऐकतांच **हातीम** त्या मृतस्त्रीच्या नवऱ्यास ह्मणाला:—आयुष्य हें जरी सर्वांत प्रिय आहे तरी प्रत्येक मनुष्यानें आपलें वचन राखण्याकरितां प्राणाची सुद्धां पर्वा करूं नये. तूं जर लग्नसमयीं आपल्या सासऱ्यास बचन दिलें होतेंस तर तें आतां तुला पाळलें पाहिजे. कारण हें आयुष्य क्षणभंगूर असून त्याच्या करितां आपल्या कीर्तीस वचन—भंगाचा कलंक लावून घेणें चांगलें नाहीं. हें ऐकून तो ह्मणाला:—**महाराज**, तुह्मीही माझ्या शत्रूस सामिल झालांना? प्रथम तुह्मी माझा पक्ष स्वीकाराल अशी माझी खात्री होती. परंतु आतांच्या तुमच्या भाषणावरून माझा अगदींच धीर सुटला. आतां प्रत्येक प्राण्यास जीविताहून प्रिय कांहींच नाहीं, ह्मणून समाधी घेण्यास मी कधींही कबूल होणार नाहीं. हें त्याचें निराशेचें भाषण ऐकून व त्या गांवकरी लोकांचा हेका पाहून **हातिमानें** त्या मनुष्यास एका बाजूस बोलावलें, आणि सांगितलें कीं, तूं सध्यां समाधी घेण्यास कबूल हो. मग पुढें संधि पाहून मी तुझी सुटका करीन. हें ऐकून तो ह्मणाला:—तुह्मी ह्मणतां ही गोष्ट खरी. परंतु माझी सुटका आपण कराल तोंपर्यंत त्या खाचेंत मी जिवंत कसा राहीन? **हातीम** ह्मणाला:—त्याविषयीं तूं बिलकुल काळजी करूं नकोस; मी सर्व बंदोबस्त करतों. असें ह्मणून त्या जमलेल्या लोकांस ह्मणाला:—हा गृहस्थ समाधि घेण्यास कबूल आहे. परंतु त्याचें ह्मणणें असें आहे कीं, मला जी समाधि देणार ती आमच्या देशाच्या चालीप्रमाणें द्या. ह्मणजे कबरीस हवा व उजेड येण्याकरितां कांहींतरी तजवीज करा. हें त्याचें ह्मणणें जर

तुह्मांस कबूल असेल तर तुह्मी सांगाल त्याप्रमाणें वागण्यास तो कबूल आहे. **हातिमाचें** हें भाषण ऐकून ते लोक ह्मणाले:—आमच्या गांवच्या न्यायाधिशास कळविल्याशिवाय ही गोष्ट आमच्यानें कबूल करवणार नाहीं. तरी आपण सर्वजण न्यायाधीशाकडे जाऊं आणि तो सांगेल त्याप्रमाणें करूं. हें ऐकतांच **हातिमा**सह्वर्तमान ती सर्व मंडळी न्यायाधीशाकडे गेली व त्यास त्यांनीं सर्व हकीमत सांगितली. तेव्हां त्यानें पोक्त विचार करून असें ठरविलें कीं, मरणाऱ्या मनुष्याच्या देश रिवाजाप्रमाणें कबर बांधणें योग्य आहे. कारण ह्या बाबदचें कायद्याचें कलम जरी आपल्या देशरिवाजाप्रमाणें आहे तरी मरणारा मनुष्य परदेशांतील असल्यामुळें त्याजवर जुलुम करणें योग्य नाहीं. हा न्यायाधीशाचा ठराव ऐकून त्या मंडळीनें **हातिमाच्या** सांगण्याप्रमाणें कबर बांधण्यास सुरवात केली; पुढें ती बांधून तयार होतांच चालीप्रमाणें त्या उभयतां नवराबायकोस समाधि देऊन ते सर्व लोक **हातिमास** बरोबर घेऊन आपापल्या घरीं गेलें.

ज्या गृहस्थानें **हातिमास** आपल्या घरीं नेलें होतें, त्यानें त्याची खाण्यापिण्याची वगैरे व्यवस्था उत्तम प्रकारची राखिली होती. भोजनोत्तर कांहींवेळ त्या उभयतांच्या इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर **हातिमाची** निजावयाची सोय करून तो मनुष्य निजावयास गेला. परंतु 'मी तुझी लवकरच मुक्तता करीन' असें **हातिमानें** त्या समाधि दिलेल्या पुरुषास वचन दिलेलें असल्यामुळें त्यास झोंप लागली नाहीं. पुढें मध्य-रात्र होतांच **हातीम** तेथून गुप्तपणानें निघून स्मशानांत आला. तों मृतस्त्रीचे आप्त तिच्यासमाधीजवळ जप करीत बसलेले त्याच्या नजरेस पडले. तेव्हां **हातिमास** अतिशय चिंता पडली. पुढें कांहींवेळ गेल्यावर त्यानें विचार केला कीं, मित्राची मुक्तता करण्याची संधि आज जरी सांपडली नाहीं तरी उदईक रात्रीं सवड साधून वचन दिल्याप्रमाणें त्यास समाधींतून बाहेर काढल्याशिवाय रहावयाचें नाहीं. असा जरी त्यानें विच्चार केला होता तरी तो व्यर्थ झाला. कारण 'मृतमनुष्याच्या आप्तांनीं त्याच्या समाधी जवळ तीन दिवस पर्यंत ए-

कसारखा जप करीत असावें अशी त्या देशाची चाल असल्यामुळें **हातिमास** आपले हेतू सिद्धीस नेण्यास बिलकुल सवड सांपडली नाहीं. पुढें चौथे दिवशीं त्या मृतस्त्रीचे आप्त घरीं आल्यावर रात्रीच्या समयीं **हातीम** समाधी जवळ गेला आणि उजेड व हवा आंत जाण्याकरीतां ठेवलेल्या खिडकींतून आपल्या मित्रास हांक मारूं लागला. परंतु चार दिवसांत अन्नपाणी न मिळाल्यामुळें तो मनुष्य अगदीं मरणोन्मुख होऊन आपल्या स्त्रीच्या प्रेताजवळ बे-शुद्ध स्थितींत पडला होता. काय करील बिच्यारा!! त्यानें **हाति-माची** एक दोन दिवस वाट पाहिली परंतु जेव्हां तो आला नाहीं तेव्हां निरुपाय होऊन आपला वचन देऊन घात केला असें ह्मणून **हातीमास** दोष देत व शोककरीत अचेतन हो ऊन पडला होता. पुढें **हातीम** आल्यावर जेव्हां हांका मारूं लागला तेव्हां तो बेशुद्धअवस्थेंत होता ह्मणून त्याची हांक त्यास ऐकूं आली नाहीं त्यामुळें **हातीमास** वाटलें कीं चार दिवस अन्नपाणी न मिळाल्यामुळें कदाचित् हा मरणपावला असेल; तरी समाधी उकरण्याची खटपट करणें व्यर्थ असें समजून वचनभंग झा-ल्याबद्दल पश्चाताप होऊन तो जावूं लागला. इतक्यांत त्याला वा टलें कीं, कोणत्याही गोष्टीचा पूरता शोध केल्याशिवाय जाणें हें आपणास योग्य नाहीं असा विचार करून **हातीम** पुनः त्या स-माधि जवळ गेला आणि मोठ्यानें हांका मारूं लागला. एक दोन हांका मारतांच तो मनुष्य थोडासा शुद्धीवर आला, आणि **हाति-माचा** शब्द ओळखून शक्ती नव्हती तरी मोठ्या कष्टानें रांगत रांगत गवाक्षाजवळ येऊन ह्मणालाः—ज्यानें मला मुक्त करण्या-विषयीं वचन दिलें होतें ते आपणच काय? **हातीम** ह्मणालाः—मीच तो. नंतर त्या मनुष्यास क्षणभर थांबावयास सांगून **हातिमानें** ती समाध उकरली; आणि तो मनुष्य बाहेर निघेल असा मार्ग करून **हातिमानें** त्यास आंतून बाहेर काढलें. पुढें वायूची झुळूक लागून जराशी हुषारी आल्यावर **हातीम** त्यास ह्मणालाः—मित्रा आतां तूं येथें क्षणभर ही थांबूं नकोस. कारण मी तुझी मुक्तता केली हें जर ह्या शहरांतील लोकांस समजलें तर ते तुला व मला

यम लोकाचा रस्ता दाखविल्या शिवाय कधींही राहणार नाहींत. तो ह्मणालाः—तुह्मी ह्मणतां ही गोष्ट खरी, परंतु माझा गांव येथून बराच लांब असल्यामुळें तेथपर्यंत जाण्यास माझ्याजवळ एक फुटकी कवडीही नाहीं. हें ऐकून **हातिमानें** आपल्या खिशांतून काहीं मोहोरा काढून त्या मनुष्यास दिल्या. नंतर **हातिमाचे** अतिशय आभार मानून तो मनुष्य आपल्या गांवाकडे जाण्याकरितां निघून गेला.

इकडे **हातिमानें** समाधीवरील दगड जशाच्यातसे बसविले, आणि कोणासही न समजुं देतां घरीं येऊन स्वस्थ झोंपीं गेला. नंतर दुसरे दिवशीं भोजन वगैरे झाल्यावर **नैडा**पर्वताकडे जाण्या करतां **हातीम** रजा मागूं लागला. तेंव्हां घरधनी ह्मणालाः— ज्या अर्थीं आपण नैडा पर्वताकडे जाण्याच्या उद्देशानें निघालां आहां त्या अर्थीं तुह्मी कोणी तरी प्रतापीं पुरुष आहां असें आह्मांस वाटतें. आतां आह्मांलाही त्या पर्वताच्या संबंधानें थोडीशी माहीती आहे ती अशी कीं येथून सुमारें एक महिन्याच्या वाटेवर नैडा पर्वत असून त्याच्या पायथ्याशींच 'नैडा' नामक एक विस्तीर्ण शहर आहे. तेथील लोकांस त्या पर्वताविषायीं माहिती विचारली असतां ते तुह्मांस सर्व हकीगत सांगतील. नंतर जेंव्हां **हातीम** सर्वांची रजा घेऊन जावयास लागला तेंव्हां ते लोक ह्मणालेः— **महाराज,** नऊ किंवा दहा दिवस एकसारखें चालल्यावर आपणांस दोन रस्ते लागतील; तेंव्हां उजव्या हाताच्या रस्त्यानें जा. कारण तो रस्ता **नैडा**शहराकडेसच जातो. हें त्याचें भाषण ऐकून **हातीम** तेथून निघाला आणि दहा दिवस एकसारखा चालल्यावर त्यास दोन रस्ते लागले; तेंव्हां उजव्या हाताच्या रस्त्यानें जावयाचें सोडून विस्मृतीनें डाव्या हाताच्या रस्त्यानें मार्ग क्रमूं लागला. पुढें जातां जातां सुमार चार दिवसांनीं त्यास एक भयंकर अरण्य लागलें. त्यांत सिंह, वाघ, हत्ती इत्यादि भयंकर श्वापदें पुष्कळच असल्यामूळें तीं जेंव्हां इकडून तिकडे फिरूं लागलीं तेंव्हां **हातिमाची** अगदीं पांचावर धारण बसली. इतक्यांत मेघगर्जने प्रमाणें एक भयंकर आरोळी त्याच्या कांनीं आल्यावरून तो तेथून एका

वृक्षावर चढून आसपास पाहूं लागला. या गोष्टीस थोडा वेळ गेला नाहीं तोंच सिंह, वाघ, हत्ती व गेंडे वगैरे कित्येक प्राणी जीव घेऊन पळत असून त्यांच्या मागें साधारण आकृतीचें परंतु दिसण्यांत फारच भयंकर असें एक जनावर लागलेलें **हातिमाच्या** दृष्टीस पडलें. ह्या प्राण्याचे डोळे मोठे व तेजदार असून हिंगळाप्रमाणें लाल होते. शेंपूट पाठीवरून डोक्यापर्यंत कमानीप्रमाणें वांकलेलें होतें. सारांश अशा प्रकारचा भीतिप्रद प्राणी **हातिमाच्या** आजपर्यंत पाहण्यांत आलेला नव्हता. इतक्यांत त्या जनावराचा रोंख आपणाकडेसच आहे असें पाहून त्यानें कांहींवेळ **पमेश्वराची** स्तुति केली आणि आपली तरवार म्यानांतून बाहेर काढून स्वसंरक्षणार्थ धैर्य धरून राहिला.

या गोष्टीस थोडावेळ गेला नाहीं तोंच तें जनावर ज्या वृक्षावर **हातीम** बसला होता त्या खालीं आलें आणि **हातिमास** वृक्षावर बसलेला पाहून त्यानें आपल्या शेंपटीच्या एका तडाक्यानें तो वृक्ष जमीनीवर पाडला. त्याच वेळेस **हातिमाची इतिश्री** व्हावयाची; परंतु वृक्षाच्या खांद्या **हातिमाच्या** आड आल्यामुळें त्याचा बचाव झाला. पुढें जेव्हां तें जनावर **हातिमाच्या** अंगावर उडी मारूं लागलें तेव्हां त्यानें मोठ्या चलाखीनें त्याची झडप चुकवून आपली तरवार त्या दुष्ट जनावराच्या पोटांत भोंसकली. हा वार अपुरा लागल्यामुळें तें जनावर पुनः **हातिमावर** झडप घालण्याचा प्रयत्न करूं लागलें. परंतु ह्या वेळीं **हातिमानें** मोठी शिताफी करून एक जोराचा वार केला. त्यासरसें तें जनावर मूर्छित होऊन जमीनीवर निश्चेष्ट पडलें. थोड्या वेळानें जराशी हुषारी आल्यावर त्यानें मेघगर्जनेंप्रमाणें पुष्कळ आरोळ्या मारल्या. तरी उठण्याची शक्ति नसल्यामुळें क्रोधानें तें तडातड शेंपूट आपटूं लागलें. ह्या वेळीं त्याच्या तोंडांतूत व नाकपुड्यांतून ज्या ज्वाळा निघाल्या, त्या योगानें सर्व अरण्यपेटूं लागलें. नंतर **हातिमानें** त्या भयंकर जनावरास आपल्या तरवारीनें यम लोकींचा मार्ग दाखविला आणि इतकें जबरदस्त जनावर मारल्याची कांहीं तरी खूण असावी

ह्मणून त्यानें त्या जनावराचे पंजे, शेंपूट, दांत व कान कापून घेऊन मार्ग–क्रमण करण्यास सुरवात केली.

पुढें कांहीं दिवसांनीं तें अरण्य उल्लंघन केल्यावर त्याचे दृष्टीस एक मैदान पडलें. त्या मैदानांत असलेलें एक मजबुत तटबंदीचें शहर पाहून त्यास अतिशय आनंद झाला. परंतु थोडक्याच वेळानें त्या शहरानजीक पोंचल्यावर सर्वत्र सामसूम पाहून तो अगदीं खिन्न झाला. पुढें शहरच्या मोठ्या दरवाज्यांतून आंत गेल्यावर व्यापाराचें सामान भरलेल्या मोठमोठ्या वखारी बाजार पाहून येथें लोक वस्ती असावी अशी त्याची पक्की खात्री झाली. तथापी एकही प्राण्याचा शब्द ऐकूं येत नसल्यामुळें हा काय प्रकार असावा याचा विचार करीत करीत तो राजवाड्याजवळ आला. हा राजवाडा ह्मणजे एक मजबूत किल्लाच होता. त्यांत तेथील राजा आपल्या परीवारासह लपून राहीला होता. त्यानें **हातिमास** पाहतांच आपल्या सेवकास आज्ञा केली कीं, हा जो परदेशी मनुष्य इकडे येत आहे त्यास आंत घेऊन या. आज्ञेप्रमाणें सेवकानीं **हातिमास** महालाच्या दरवाज्या जवळ आणलें तोंच राजानें त्यास रामराम केला. **हातिमानें**ही उलट सलाम केल्यावर राजा ह्मणालाः—आपण कोठचें राहणार व इकडे कोणीकडे आलां? **हातिम** ह्मणालाः—मी **इमन**-देशचा राहणारा असून **नैडा**शहराकडे जाण्याच्या इराद्यानें इकडे आलों आहे. हें ऐकून राजा ह्मणालाः—आपण **नैडा** शहराकडे जाण्याचा मार्ग चुकलां. असो, होणार भविष्य कांहीं चुकत नाहीं आणि त्यामुळेंच आपणास ह्या आडमार्गानें येऊन प्राण धोक्यांत घालण्याची बुद्धि झाली.

हें त्याचें भाषण ऐकून **हातिम** ह्मणाला;—आपण ह्मणतां त्या प्रमाणेंच जर **परमेश्वरा**ची इच्छा असली तर ती कोणाच्यानेंही मोडवणार नाहीं. परंतु आपण एखाद्या भीतिग्रस्त मनुष्या प्रमाणें वाड्याचे सर्व दरवाजे बंद करून बसलां आहां याचें कारण काय? तें कृपा करून कळवा. राजा ह्मणालाः—मी ह्या देशाचा राजा आहें. परंतु कांहीं दिवसांपूर्वीं एक मोठें अक्राळ विक्राळ जनावर आमच्या ह्या सुंदर राजधानींत येऊन त्यानें विघ्न उपस्थित केलें.

तें जनावर मनुष्यभक्षक असल्यामुळें ह्या शहरांतील सर्व लोक प्राण रक्षणार्थ येथून पळून गेले. त्याप्रमाणें मीही जावयाचाच परंतु, अवकाश मिळाला नाहीं ह्मणून **परमेश्वरावर** भरंवसा ठेवून येथेंच राहिलों. आतां त्या **दुष्ट** जनावराचें पारिपत्य करण्याचें सामर्थ्य आमच्या अंगीं नाहीं ह्मणून त्यानें ह्या शहराचा अगदीं नाश करून टाकिला. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—ज्या राक्षसी जनावरानें तुमच्या शहराचा विध्वंस करून टाकला त्याचा आकार कसा होता? राजा ह्मणालाः—तें जनावर फारच भयंकर असल्यामुळें मी त्याचें नांव '**रणसिंह**' असें ठेवलें आहे. तें **काफ्** पर्वताकडून येथें आलें असून दररोज या शहरांत येऊन सांपडतील तितकीं मनुष्यें भक्षण्याचा त्यानें नित्यक्रम मांडला होता; ह्मणूनच माझी सर्व प्रजा पळून गेली; व मी जरी इतक्या बंदोबस्तानें राहिलों आहें तरी प्रत्यहीं तें दुष्टजनावर तटावर चढण्याचा प्रयत्न करितें. परंतु माझें दैव बलवत्तर असल्यामुळें त्याचा तो प्रयत्न निर्फळ होत असतो. ही राजानें सांगितलेली हकीगत ऐकतांच **हातिम** ह्मणालाः—**राजाधिराज,** आपण त्या जनावराविषयीं बिलकुल काळजी करूं नये. कारण **परमेश्वर**-कृपेनें तुमच्या शत्रूचा थोड्या दिवसांपूर्वीं मी वध केला आहे. मला दोन दिवसां मागें जें अरण्य लागलें त्यांतून येत असतां त्यानें मला भक्षण्याचा प्रयत्न केला होता; परंतु नशीब शिकंदर ह्मणूनच वांचलों. असें ह्मणून त्यानें सर्व हकीगत निवेदन केली. ती ऐकतांच राजानें मोठ्या सन्मानें **हातिमास** दिवाणखान्यांत आणून बसविलें. इतक्यांत भोजनाची सिद्धता झाल्याची वर्दी सेवकानें दिल्यावरून राजानें **हातिमासह** पंचपक्वान्नीं भोजन केलें. भोजनोत्तर पानसुपारी खात बसले असतां राजा ह्मणालाः—आपण माझ्या शत्रूचा वध केलात असाल, या विषयीं मला मुळींच शंका नाहीं. परंतु माझ्या प्रजेची खात्री करण्याकरितां आपणाजवळ त्याविषयीं कांहीं पुरावा असल्यास कृपा करून दाखवा; ह्मणजे त्यांची संशयनिवृति करण्यास फारसे श्रम पडणार नाहींत. राजाचें हें भाषण ऐकून **हातिमानें** त्या जनावराचें शेंपूट, पंजे, व दांत व-

गैरे राजास दाखविले. ते पाहून त्यास अतिशय आनंद झाला.

नंतर दुसरे दिवशीं राजानें आपल्या सेवकांबरोबर प्रजेस पत्रें लिहून देऊन गांवोगांवीं त्यांची रवानगी केली. त्यांत "ज्या दुष्ट जनावराच्या भीतीनें तुह्मी शहर सोडून गेलां होतां तें जनावर मरण पावलें; सबब आतां तुह्मीं कांहींएक भीती न धरितां परत या." असा मजकूर लिहिला होता. पुढें त्या पत्राप्रमाणें कांहीं दिवसांनीं पूर्वीप्रमाणें त्या शहरांत लोकवस्ती झाली. नंतर **हातीम नैडा**पर्वताकडे जाण्याकरितां राजाजवळ आज्ञा मागूं लागला. तेव्हां तो ह्मणाला:—आपण मला सोडून जातां हें फार वाईट आहे. कारण हें राज्य तुमच्याच कृपेनें मला प्राप्त झालें असून प्रस्तुत माझा वृद्धापकाळ झाल्यामुळें तें मी तुह्मांसच देण्याचा विचार केला आहे. शिवाय माझी जी एकुलती एक कन्या आहे तिचाही आपण अंगिकार करावा. हें ऐकून **हातीम** ह्मणाला:—मला तुमचें ह्मणणें प्रस्तूत कबूल करवत नाहीं. कारण माझ्या एका मित्राचें मोठें महत्वाचें काम करून देण्याविषयीं मी त्यास शपथपूर्वक वचन दिलें आहें; तेव्हां तें पुरें झाल्याशिवाय या जगांतील कोणत्याही वस्तूचा उपभोग माझ्यानें घववत नाहीं. **हातिमा**चा हा परोपकारीपणा पाहून राजास फार आश्चर्य वाटलें. मग त्यानें आपल्या एका हुषार सेवकास **हातिमास** मार्ग दाखविण्याकरितां बरोबर देऊन त्याची रवानगी केली. नंतर मजले मजलेनें पूर्वीच्या दोनरस्ते एकेठिकाणीं मिळालेल्या जागीं ते दोघेही येतांच तो सेवक ह्मणाला:—**मियासाहेब**, आपण या उजव्या हाताच्या रस्त्यानें जा ह्मणजे थोडक्याच दिवसांत **नैडा** शहरास जाऊन पोंहोंचाल. असें ह्मणून तो सेवक निघून गेला; आणि **हातिम**ही उजव्या हाताच्या रस्त्यानें मार्ग—क्रमूं लागला. जातां जातां सुमार दहा दिवसांनीं एक मोठें अफाट वस्तीचें शहर त्याच्या दृष्टीस पडलें. पुढें शहरांत येऊन दाखल झाल्यावर **हातीमास** तेथील लोकांनीं आपल्या राजाकडे नेलें. तेव्हां त्यानें मोठ्या सन्मानानें **हातिमास** आपल्याजवळ बसवून, कोठून आलां? कोठचें राहणार? येण्याचा उद्देश काय? वगैरे प्रश्न केले; आणि ह्मणाला:—पुष्कळ वर्षा-

मागें आमच्या या शहरीं एक प्रवासी आला होता. तेव्हा पासून आजपर्यंत एकही वाटसरू या देशांत आला नाहीं. हें राजाचें भाषण ऐकून हातीमानें **मुनीरशहाची** व **हस्नबानूची** सर्व हकीगत त्यास विदित करून आपलें राहण्याचें ठिकाण व आपण केलेलीं सर्व कृत्यें कळविलीं. तीं ऐकून राजा ह्मणालाः—आपण कांहीं दिवसपर्यंत या शहरांत रहावें ह्मणजे **नैडापर्वता**विषयींची सर्व हकीगत कळून येईल. आतां मी त्या पर्वताचें वर्तमान सांगितलें असतें, परंतु आपली समजूत होणार नाहीं. हें राजाचें बोलणें **हातिमानें** मान्य केल्यावर राजानें त्याची खाण्यापिण्याची व राहण्याची वगैरे योग्य व्यवस्था करून दिली.

**हातीम** तेथें राहिल्यावर मोठमोठ्या लोकांत त्याची ओळख झाली. तेणेंकरून त्याचा वेळ मोठ्या आनंदांत जाऊं लागला. पुढें ऐके दिवशीं **हातीम** व दुसरी कांहीं मंडळी गोष्टी बोलत बसली असतां '**नैडा**पर्वत कोठें आहे, असें **हातिमानें** एकास विचारलें; तेव्हां तो ह्मणालाः—ज्याचीं शिखरें नभोमंडलास जाऊन पोहोंचलीं आहेत असा जो हा समोरचा पर्वत त्याला '**नैडा**पर्वत' असें ह्मणतात. इतकें त्या उभयतांचें बोलणें होत आहे तोंच त्या पर्वतामधून एक मोठा ध्वनि झाला. तो ऐकतांच त्या मंडळीपैकीं एक मनुष्य कांहींवेळ चित्रासारखा स्वस्थ उभा राहून एकाएकीं कोणाजवळ न बोलतां त्या पर्वताचा रोंख धरून जाऊं लागला. त्यास धरण्याकरितां कांहीं मंडळी गेली परंतु त्या मनुष्याच्या हट्टी स्वभावामुळें त्यांस निरुपायानें परत यावें लागलें. हें पाहून **हातीम** ह्मणालाः—कायहो या मनुष्याला झालें तरी काय? व तो असा वेड्या सारखा धांवत कां चालला आहे? मंडळी ह्मणालीः—त्याजला काळाचें आमंत्रण आल्यावरून तो **नैडा**पर्वताकडे जात आहे. कारण मघाशीं जो "**कोहनिदा**" असा मोठा ध्वनी झाला तोच त्याचा काळ!! हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—त्या पर्वतामधून असा आवाज कोणी केला? मंडळी ह्मणालीः—तें आह्मांस ठाऊक नाहीं. आतां तुह्मांला चौकशी करावयाचीच तर जो मनुष्य धांवत चालला आहे त्यास विचारा. हें ऐकून **हातीम** धांवत धांवत त्या

मनुष्याजवळ गेला आणि ह्मणालाः—मित्रा, मी जें विचारणार आहें त्याचा जबाब देण्यास अनमान करूं नकोस. कारण तो ऐकण्याची मला व सर्व मित्र मंडळीस फारच उत्कंठा झाली आहे. तरी मधांशीं नैडापर्वता मधुन जो ध्वनि निघाला तो कोणी केला? हातिमानें प्रीतियुक्त शब्दांनीं इतकें जरी विचारलें तरी त्या मनुष्यानें मुळींच उत्तर दिलें नाहीं इतकेंच नाहीं तर **हातिमा**च्या हातास हिसका मारून वायुवेगानें तो तेथून निघाला आणि थोड्या वेळानें पाहतांपाहतां अदृश्य झाला. या गोष्टीस थोडावेळ झाला नाहीं तोंच तो पर्वत नाहींसा होऊन त्याचे जागीं इंद्र—धनुष्याप्रमाणें निरनिराळ्या सप्त रंगांची एक धोंड मात्र राहिली. हा अद्भुत चमत्कार पाहून **हातीम** परत शहराकडे आला. तों तें पूर्वींचें मित्रमंडळ ज्या दिशेस तो पर्वत होता तिकडे तोंड करून कांहीं संस्कार करीत होते. पुढें तो आटोपल्यावर सर्व मंडळी एकही शब्द न बोलतां आपापल्या घरोघर निघून गेली. दुसरे दिवशीं **नैडापर्वता**कडे गेलेल्या मनुष्याच्या आप्तांनीं दुःख करावयाचें सोडून गांवकरी लोकांस एक मोठें प्रयोजन दिलें. हें पाहून **हातिमास** अतिशय वाईट वाटून त्याच्या नेत्रांतून जल-धारा वाहूं लागल्या. त्या पाहून एक मनुष्य ह्मणालाः—मृत मनुष्याबद्दल शोक करणें ही आमच्या देशांत चाल नाहीं. तथापि तुह्मी परदेशीय आहां यास्तव या गुन्ह्याबद्दल एकवेळ क्षमा केली आहे. परंतु पुनः जर अशी गोष्ट केलींत तर या गांवातून आह्मी तुह्मांस हांकून देऊं. हे त्याचे शब्द ऐकतांच **हातिमानें** शोकत्याग केला. पुढें पांच सहा महिनेपर्यंत **हातीम** त्या गावांत होता; तितक्यावेळांत सुमार दहा बारा मनुष्यें त्या दुष्ट पर्वताच्या भक्षस्थानीं पडलीं. त्यावरून या चमत्काराबद्दल **हातिमानें** पुष्कळ तपास केला, परंतु कोणीही समाधान होण्यासारखें उत्तर दिलें नाहीं.

पुढें एके दिवशीं **हातीम** व '**यूसफ**' या नांवाचा एक स्नेही हे बोलत बसले असतां **नैडापर्वतांतून** पूर्वीप्रमाणें आवाज झाला. त्याबरोबर **यूसफ** कांहींवेळ स्तब्ध राहून कांहीं एक न बोलतां **नैडापर्वताकडे** जावूं लागला. हें पाहून **हातिमानें** निश्चय केला

कीं, आजपर्यंत बरेच लोकांना मी **नैडा**पर्वताकडे जातांना पाहिलें परंतु ते तिकडे कां जातात हें कोणीही मला सांगितलें नाहीं. तेव्हां या गोष्टीचा पुरता शोध केल्याशिवाय परत यावयाचें नाहीं. असा विचार करून तो **यूसफा**च्या मागोमाग जावूं लागला. **यूसफा**चे सोयरेधायरेही त्यास पोंचवावयास बरेच लांब पर्यंत आले; परंतु पुढें ते परत शहराकडे निघून गेले. **हातिम** मात्र **यूसफा**चा हात घट्ट धरून चालला होता. वाटेनें जात असतां **हातीम** ह्मणालाः—मित्रा, तूं असा स्तब्ध कां? दोन शब्द तरी मज बरोबर बोल. अरे ज्या अर्थीं मी तुझ्या दुःखाचा वांटेकरी होऊन प्राणाचीही पर्वा न करितां तुजबरोबर येण्यास सिद्ध झालों आहें त्या अर्थीं तूं मजबरोबर दोन शब्द तरी बोलावेस. इतकें जरी तो बोलला तरी **यूसफा**नें एकही शब्द उच्चारिला नाहीं. यावेळेस तो अगदीं थंडगार होऊन **हातिमा**नें मारलेली मिठी सोडविण्याचा प्रयत्न करीत होता. पुढें कांहीं वेळानें त्यानें एक जोराचा हिसडा मारून **हातिमास** जमीनीवर पाडलें आणि पर्वताकडे धांव ठोकली. तेव्हां **हातिमा**नेंही त्वराकरून पुनः धांवत जाऊन **यूसफा**च्या कमरेला मिठी मारली. नंतर विशेष हिसडाहिसडी न करितां ते दोघेही **नैडा**पर्वताच्या मध्यभागापर्यंत चढले. त्या ठिकाणीं तो पर्वत दुभांगून एक भेग पडली होती. त्या भेगेंत ते उभयतांही शिरल्यावर ती बंद झाली. इकडे **यूसफा**च्या आप्तांनीं शहरांत गेल्यावर आपल्या राजास **हातिमा**विषयींचें सर्व वर्तमान निवेदन केलें. तें ऐकून राजा अतिशय दिलगिर होऊन त्या **यूसफा**च्या आप्तांस रागाऊन ह्मणालाः—तुह्मीं त्या थोर गृहस्थास तिकडे कां जावूं दिलेंत? ह्याबद्दल तुह्मांस मोठें शासन केलें पाहिजे. कारण तो तिकडे प्राणास मुकेल हें तुह्मांस कसें समजलें नाहीं; असो.

इकडे **हातीम** व **यूसफ** भेगेंत गेल्यावर त्यांस एक हिरव्या रंगाचें अफाट मैदान लागलें. तें क्रमून गेल्यावर त्यांस एक कृष्णवर्णाचें विस्तृत मैदान लागलें. त्यांत **कबरे**च्या आकाराचा एक मोठा चिरा असून सभोंवतालची जागा ओसाड होती. तेथें गेल्या-

वर **यूसफ** त्या चिऱ्यावर उताणा निजला. त्याबरोबर त्याचें प्राणोत्क्रमण होऊन चिऱ्याखालची जमीन दुभागली व त्यांत तो **कबरे**सह गुप्त झाला; तोंच ती कृष्णवर्ण जमीन हिरवीचार दिसूं लागली. हा अद्भुत चमत्कार पाहून **हातिमानें परमेश्वरा**ची बराच वेळ प्रार्थना केली नंतर तो परत येण्या करितां निघाला. परंतु आपण कोणत्या रस्त्यानें येथें आलों व आतां जावयाचें कोणत्या रस्त्यानें हें त्यास कांहींच समजेना. कारण ज्या ज्या ठिकाणीं **हातिम जाई** त्या त्या ठिकाणीं विस्तीर्ण मैदानें दिसत असत. ह्याप्रमाणें तो एकसारखा सात दिवसपर्यंत फिरत होता, तरी तितक्या वेळांत एक पांखरूंसुद्धां त्याच्या दृष्टीस पडलें नाहीं. त्यामुळें आपली येथून कशी सुटका होईल याची त्यास मोठी चिंता पडली. तथापि दैवावर भरंवसा ठेवून मार्गक्रमण करीत असतां एके दिवशीं समुद्राच्या लाटांचा आवाज त्याच्या कानीं आला. तेव्हां अति हर्षित होऊन त्या आवाजाच्या रोंखावर तो जाऊं लागला. जातां जातां थोड्या वेळानें तो समुद्राच्या किनाऱ्यावर जाऊन पोहोंचला. परंतु त्यावेळीं **समुद्र** अतिशय खवळलेला होता ह्मणून आसपास एखादा प्रदेश आहे किंवा नाहीं हें त्यास समजेना.

पुढें बराच वेळ गेल्यावर समुद्र जरासा शांत झाला असतां लाटांच्या तडाक्यानें एक गलबत किनाऱ्याकडे येतांना त्याच्या नजरेस पडलें. तेव्हां **हातिमास** अतिशय आनंद होऊन बराचवेळपर्यंत त्यानें **परमेश्वर**–स्तवन केलें. इतक्यांत तें गलबत किनाऱ्यास येऊन पोहोंचलें. त्याबरोबर **हातीम** त्या गलबतावर चढला. परंतु आंत कोणी नाहीं हें पाहून त्यास फारच आश्चर्य वाटलें. मग तो इकडे तिकडे फिरत असतां एक ताट त्याच्या नजरेस पडलें; त्यांत दोन भाकरी व थोडेसें लोणचें होतें. त्यावेळीं **हातिमास** अतिशय क्षुधा लागली होती ह्मणुन त्यानें **परमेश्वर**–स्तवन करून तें अन्न ग्रहण करण्याचा बेत केला.परंतु थोडासा विचार केल्यावर त्यास असें वाटलें कीं, हें वाढलेलें ताट ह्या जहाजावरच्या नावाड्याचें असून कांहीं कामाकरितां तो समुद्रकिनाऱ्यावर गेला असेल तरी तो आल्याशिवाय या अन्नास आपण स्पर्शही

करूं नये. आसा विचार करून तो काहींवेळ स्वस्थ बसला असतां एक जलदेवता तेथें उत्पन्न झाली; आणि **हातिमास** ह्मणाली:— हें अन्न तुजकरतांच ठेविलें आहे, तरी कोणत्याही प्रकारची शंका मनांत न आणतां तूं तें ग्रहण कर; इतकें बोलून ती अदृश्य झाली. मग **हातिमानें** तें अन्न भक्षण करून जवळच एक पाण्यानें भरलेलें भांडें होतें त्यांतून थोडेसें पाणी घेउन प्राशन केलें, त्यामुळें त्यास बरीच हुषारी वाटली. नंतर **हातिमानें** शीड सोडून तें जहाज हांकारलें. त्यावेळीं **नैडा** शहरीं जाऊन तेथील लोकांस **यूसफा**ची झालेली अवस्था कळवावयाचें त्याच्या मनांत होतें. परंतु त्या शहराकडे जाण्याचा रस्ता माहीत नसल्यामुळें जिकडे जहाज नेईल तिकडे जाणें **हातिमास** भाग पडलें.

पुढें **हातिमास** सहा दिवसपर्यंत अन्नोदकाशिवाय वर आकाश आणि खालीं पाणी यांजकडे पहात स्वस्थ बसावें लागलें. सातव्या दिवशीं मात्र त्याच्या दृष्टीस एक पर्वत पडला. हा पर्वत अतिशय उंच असून त्याच्या तळाजवळ जाऊन पोहोंचण्यास त्यास आणखीं तीन दिवस लागले. मग तो त्या पर्वतावर चढूं लागला असतां ठिकठिकाणीं रक्ताचे प्रवाह त्याच्या दृष्टीस पडले ! ! हा अद्भुत चमत्कार पाहून तो ह्मणाला:—ईश्वरी लीला किती विलक्षण आहे पहा? आतां ह्या पर्वतावरील दगडांतील जे रक्ताचे झरे वहात आहेत त्याचे कारण मला कोण सांगेल ? असा मनाशींच विचार करीत करीत तो त्या पर्वताच्या शिखरापर्यंत जाऊन पोहोंचला. नंतर तेथें पहातो तों सर्व प्रदेश रक्तवर्ण असून तेथें असलेले प्राणी हिरव्यारंगाचे आहेत. हा अपूर्व देखावा पाहून आश्चर्यभरीत होत्साता भूक तहान विसरून तो सुमार तीन चार कोस जमीन चालून गेला. तेव्हां त्याच्या दृष्टीस एक रक्तवर्णी समुद्र पडला ह्या समुद्रकिनारीं जे पक्षी होते ते चमत्कारिक रंगाचे असून अतिमोहक होते. ह्या समुद्राकिनाऱ्यावर **हातिमानें** सुमार एक महिनापयत प्रवास केला. तितक्या मुदतींत भूक लागली ह्मणजे कांहीं पक्षी मारून चकमकीनें विस्तव पाडून व त्यावर ते पक्षी भाजून तो आपल्या क्षुधेचें शांतवन करीत असे. परंतु पिण्यायोग्य पाणी

त्या प्रदेशांत मुळींच नसल्यामुळें आस्वलकन्येनें दिलेलें मोतीं त्यास तोंडांत धरावें लागे. हें मोतीं तोंडांत धरलें ह्मणजे तृषेची फारशी पीडा होत नसे. पुढें फिरत फिरत तो एका जांभळ्या रंगाच्या समुद्राजवळ जाऊन पोहोंचला. त्या ठिकाणीं एकही पक्षी हातिमाच्या दृष्टीस पडला नाहीं, त्यामुळें आतां आपली क्षुधा कशी निवारण होईल याची त्यास मोठी काळजी पडली. परंतु सर्व संकटांतून पार पाडणारा **परमेश्वर** आहे अशी मनाची समजूत करून तो किनाऱ्यावरून मार्ग—क्रमण करूं लागला. पुढें जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एका किरमिजी रंगाच्या समुद्र—किनाऱ्यावर येऊन पोहोंचला. त्यावेळीं तो अगदीं निराश होऊन ह्मणालाः— येथून मी स्वदेशीं परत जाईन असा भरंवसा वाटत नाहीं. कारण आज बरेच दिवस मी एक सारखा फिरत आहें तरी मनुष्य वस्तीची जागा माझ्या नजरेस बिलकुल पडत नाहीं. यावरून आजन्मपर्यंत मी या निर्जन प्रदेशांत भटकत फिरावें अशी **परमेश्वराचीच** इच्छा आहे असें सिद्ध होतें ! हाय हाय !! केवढा मी अभागी !!! ज्या **मुनीरशहाला** ‘ मी तुझी इच्छा तृप्त करतों’ असें वचन दिलें आहे तो माझी वाट पाहून निराश होईल, आणि शेवटीं कदाचित प्राणत्यागही करील. मग हें सर्व पातक माझ्याच माथीं बसणार !! असो, परमेश्वराची इच्छा जर तसें व्हावें अशी असली तर आपलें त्यापुढें कांहीं चालावयाचें नाहीं. असा विचार करीत तो कांहींवेळ स्वस्थ उभा आहे इतक्यांत आपणाकडे येत असलेलें एक लहानसें तारूं त्याच्या दृष्टीस पडलें. त्याबरोबर **हातिमास** अतिशय आनंद होऊन कांहींवेळपर्यंत त्यानें **परमेश्वराची** स्तुति केली. तोंच तें तारूं अगदीं किनाऱ्यास येऊन लागलें. तेव्हां त्याचा आनंद गगनीं मावेनासा होऊन तो परमेश्वर—स्तवन करून ताबडतोब त्या तारवावर चढला. नंतर इकडे तिकडे न्याहाळून पहातो तों पूर्वीप्रमाणें एका ताटांत दोन भाकरी व थोडेसें लोणचें असलेलें त्याच्या नजरेस पडलें. तेव्हां त्यानें एका क्षणाचाही विलंब न लावितां जलदेवतेचा प्रसाद ह्मणून तें अन्न भक्षण केलें, आणि पाणी पिऊन पुष्कळ दिवसांच्या क्षुधेचें व तृषेचें शांतवन केलें.

पुढें तें तारूं किरमिजी रंगाच्या समुद्रांतून मोठ्या वेगानें चालूं लागल्यावर सात दिवसांनीं **हातिमा**च्या नजरेस जमीन पडली. तेव्हां मोठ्या आनंदानें तारवावरून उतरून किनाऱ्यावर जाऊन पहातो तों तेथील जमीन वगैरे सर्व पदार्थ किरमिजी रंगाचे असून जागजागीं रक्ताचे मोठमोठे प्रवाह वाहत आहेत. अशावेळीं **परमेश्वर**स्तवन करून पुढें जात असतां फारच लखलखीत असें एक स्थळ त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां आश्चर्यभरित होऊन तो तिकडे जाऊं लागला. नंतर जसजसा तो पुढें गेला तसतसें तें स्थळ अधिक लखलखीत दिसूं लागलें. मग तो अगदीं जवळ जाऊन पाहतो तों तेथें एक समुद्र असून त्याच्या लाटा रुप्याच्या तेजाप्रमाणें झळकत आहेत. हें पाहून तर त्यास फारच नवल वाटलें. पुढें तो त्या समुद्राची शोभा पहात तेथेंच उभा राहिल्यावर तृषेनें पंचप्राण अगदीं कासावीस होऊं लागले ह्मणून थोडेसें उदक प्राशन करण्याच्या इराद्यानें त्यानें आपला हात पाण्यांत बुडवला; त्याबरोबर त्याचा तो हात रुप्याचा झाला. हें पाहून **हातीम** अगदीं भयाभीत झाला. व ' प्रारब्धहीनतेचें हें एक चिन्ह आहे ' असें समजून त्या किनाऱ्यावर बसून अतिशय शोक करूं लागला. इतक्यांत एक जहाज आपणाकडे येतांनां त्यानें पाहिलें. तेव्हां संकटसमयीं **परमेश्वरा**नें आपलें रक्षण केलें ह्मणून त्यानें त्याची स्तुति केली. पुढें तें जहाज अगदीं किनाऱ्यास येऊन लागल्यावर **हातीम** त्यांत जाऊन बसला; व पहातो तों नानाप्रकारचे खाण्याचे पदार्थ व गोडें पाणी विपुल असलेलें त्याच्या नजरेस पडलें. मग त्यानें तेथें बसून त्यांतील पदार्थ पोटभर खाल्ले व पाणी पिऊन थोडी हुषारी आल्यावर गलबताचें शीड चढवलें. त्याबरोबर तें मोठ्या सपाट्यानें चालूं लागलें. पुढें अकरा दिवसपर्यंत एकसारखा प्रवास केल्यावर एका चांदीच्या पर्वताच्या पायथ्याशीं त्याचें गलबत लागलें. नंतर तो जहाजावरून खालीं उतरून पर्वतावर चढावयास लागला. चढतां चढतां जेव्हां तो अगदीं शिखरावर जाऊन पोहोंचला तेव्हां दुसरें एक शिखर त्याच्या दृष्टीस पडलें. त्यावरही चढण्याच्या उद्देशानें मार्ग-क्रमीत असतां वाटेनें जीं चित्रविचित्र रंगाचीं पा-

खरें व तेथें उत्पन्न होणारीं कंदमुळें सांपडत त्यावर तो आपलें उपजीवन चालवीत असे. ह्यावेळीं त्याच्या हाताचें मात्र त्यास निरर्थक ओझें झालें होतें. कारण तो फार जड झालेला असून त्याच्या बिलकुल उपयोगीं पडत नसे; असो.

पुढें चौथ्या दिवशीं चमत्कारीक रंगाचे पुष्कळ खडे त्याच्या नजरेस पडले. त्यांचें तेज फारच लखलखित असल्यामुळें सूर्य तेजाच्या योगानें त्यांमधून अनेक रंगाचें परावर्तन होत असे. हा अपूर्व चमत्कार पाहून ज्या जगन्नियंत्यानें ही चमत्कारिक सृष्टी उत्पन्न केली त्याच्या अगाध लिलेविषयीं तो विचार करूं लागला. नंतर कांहींवेळ त्या खड्यांकडे एकाग्रदृष्टीनें निरखून पहात असतां ज्यांस आपण खडे असें समजतों ते धोंडे नसून हिरे, माणकें, पांच वगैरे उत्तम प्रकारचें उंची जवाहीर आहे असें त्यास वाटलें. पुढें त्या जवाहिरापैकीं थोडेसे बरोबर घ्यावें असें वाटल्यावरून त्यानें जें उत्तम दिसलें तें आपल्या पदरांत बांधून घेऊन मार्गक्रमण्यास सुरवात केली. नंतर जसजसा तो वर जाऊं लागला तसतसें त्याच्या नजरेस पहिल्यापेक्षां मोठीं व मौल्यवान अशीं रत्नें पडूं लागली. तेव्हां प्रथमचीं गोळाकेलेलीं टाकून देऊन तो नवीं घेऊं लागला. असें होतां होतां शेवटीं सर्वांत मोठें व अति मौल्यवान असें जवाहीर त्यानें आपल्या पदरांत बांधून घेतलें. पुढें जातां जातां तो मनांत विचार करूं लागला कीं, ह्या पृथ्वीवर जेवढे ह्मणून राजे आहेत त्यापैकीं एकाच्याही जामदारखान्यांत असें अमोलिक जवाहिर नसेल. इतकेंच नाहीं तर त्यांच्या सर्व राज्याच्या किंमतीपेक्षांही तें अधिक मौल्यवान होईल. असा विचार करीत करीत एका पर्वतावरून दुसऱ्यावर, व दुसऱ्यावरून तिसऱ्यावर अशा प्रकारें जात असतां एके दिवशीं तो एका ओढ्याजवळ येऊन पोहोंचला. त्यावेळीं हातिमास फारच तहान लागली होती ह्मणून तो पाणी पिण्याकरितां ओढ्यावर गेला आणि पाणि पिऊं लागला. तों त्याच्या हातावरचा रुपेरी मुलामा उडून जाऊन तो अगदीं पहिल्याप्रमाणें झाला !!! हा विलक्षण प्रकार पाहून

**हातिमानें** कांहींवेळ ईशस्तवन केलें. नंतर अतिशय श्रम झाले होते ह्मणून तो तेथेंच झोंपीं गेला.

पुढें झोंप पुरी झाल्यावर उठून पहातो तों ओढ्याच्या पलीकडच्या आंगास दोन **राक्षस**-रूपी प्राणी उभे असून त्यांच्या अंगाचा रंग अगदीं काळा होता. त्यांचीं शिरें मनुष्याप्रमाणेंच होतीं; परंतु हात व पाय मात्र सिंहा सारखे होते. त्यांस पाहतांच **हातीम** उठून उभा राहिला आणि आपला तिरकमठा सज्ज करून त्यावर त्यानें बाण लाऊन सोडला, परंतु तो त्याच्या शरिरास न लागतां खालीं पडला. तेव्हां ते डोळेवटारून ह्मणालेः—अरे **हातिमा,** आपलें संरक्षण करण्याकरितां तूं निरपराधी प्राण्यांचा जीव घेण्यास सिद्ध झालास खरा; परंतु हें तुला योग्य नाहीं. कारण जसा तूं **परमेश्वर** निर्मित प्राणी आहेस तसेच आह्मीही आहोंत. हें त्या दोघांचें भाषण ऐकून **हातिमानें** आपला तिरकमठा खालीं टाकून दिला. आणि 'आपण अनुचित कर्म करण्यास प्रवृत्त झालों' याबद्दल त्यास मोठाच पश्चात्ताप झाला. पुढें जेव्हां त्या दोघांनां आपणाकडे येतांना **हातिमानें** पाहिलें तेव्हां ह्या विचित्र प्राण्यांच्या भेटीमुळें काय परिणाम होईल तो पाहण्याकडे त्याचें सर्व लक्ष वेधलें. इतक्यांत ते दोघेही **हातिमा** समोर उभे राहून ह्मणालेः—ह्या पृथ्वीमध्यें औदार्य आणि परोपकार यांची तू केवळ खाण असून तुझ्या कीर्तीचा डंका त्रिभुवनांत गाजला आहे. इतर जे मानवी प्राणी आहेत त्यांची व तुझी गोष्ट निराळी असून सर्व लोकानीं कित्ता घेण्यासारखें तुझें वर्तन आहे; परंतु तूं स्वतः होऊन येथील अमोल्य रत्नावर लोभ ठेवला आहेस यावरून तुझ्या कीर्तीचा आजच लोप झाला असें समजलें पाहिजे. इतकेंच नाहीं तर जें कार्य तूं हातीं घेतलें आहेस त्याची पूर्तता न होतां तुझें स्वदेशीं जाणेंही दुर्घट होईल. त्यावर **हातीम** ह्मणालाः—तुह्मी ह्मणतां ही गोष्ट खरी. परंतु मी कोणाच्या धनाचा लोभ धरला आहे तें तर सांगा ! हें ऐकून ते राक्षस ह्मणालेः—कोणाच्या ह्मणून काय विचारतोस ? हीं जीं तूं त्या पर्वतावरील रत्नें आणलीं आहेस त्याचा मालक तूंच आहेसनां ? **हातीम** ह्मणालाः—

सृष्टिकर्त्या **परमेश्वरानें** ह्या जगांत अनेक पदार्थ निर्माण केले आहेत. तेव्हां त्याणें उत्पन्न केलेले जिन्नस घेतले ह्मणून मी कांहीं गुन्हेगार होत नाहीं. नंतर ते ह्मणालेः—तूं ह्मणतोस ती गोष्ट खरी. परंतु ह्या पर्वतावर जे राहणारे आहेत ते त्या द्रव्याचे मालक आहेत. **हातीम** ह्मणालाः—**परमेश्वरानें** ह्या सृष्टींत जेवढे प्राणीं निर्माण केले आहेत त्यां सर्वांत मनुष्यप्राणी श्रेष्ठ असून ह्या भूमंडलावर जितके पदार्थ आहेत त्या सर्वांचा स्वामी तोच आहे. आतां मीं जीं रत्नें बरोबर घेतलीं आहेत तीं अगदींच थोडीं असून त्यांचा उपयोग मित्रांस बक्षीस देण्याकडे मी करणार आहें! आणि दुसरें असें कीं, महासागरांतलें जसें ओंजळभर पाणी घेतलें ह्मणून तो आटत नाहीं, तसेंच येथलें थोडें जवाहीर घेतले ह्मणून कमतरता येईल असें नाहीं. हें ऐकून ते ह्मणाले:–हीं रत्नें अमोल्य आहेत ह्मणून आह्मीं तीं टाकून देण्याविषयीं सांगतों असें नाहीं. फक्त तुझ्या हिताचीच गोष्ट आह्मी सांगतों. आतां ती कोणती ह्मणशील तर येथील कोणत्याही वस्तूवर तूं लोभ ठेवूं नकोस.

हें त्या दोघांचें हिताचें व उपदेशपर असें भाषण ऐकून मनांत अतिशय विरस होऊन **हातिमानें** तीं सर्व रत्नें फेंकून दिलीं; आणि ह्मणालाः—तुह्मी ह्मणतां ही गोष्ट खरी; परंतु आजपर्यंत मी जें हें ओझें वाहिलें तें व्यर्थ गेलें एवढ्याबद्दल थोडेसें वाईट वाटतें. हें त्याचें भाषण ऐकून त्या दोघांनीं तेथें पडलेल्या जवाहीरांतून एक माणीक, सतेज हिरा व एक पाच अशीं तीन रत्नें **हातिमास** दिलीं; आणि सांगितलें कीं,आह्मीं हीं जीं तीन रत्नें दिलीं आहेत त्या शिवाय दुसऱ्या कोणत्याही जिनसांचा अभिलाष तूं करूं नकोस. परंतु जर जास्ती हेवा करशील तर व्यर्थ तुझी अपकीर्ति मात्र होईल. हें त्यांचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—तुह्मी सांगितलेली गोष्ट मला मान्य आहे; पण जर तुह्मीं माझ्या देशाचा रस्ता दाखवाल तर मजवर अतिशय उपकार होतील. हें ऐकून ते ह्मणालेः—अरे **हातिमा,** आजपर्यंत जो तूं प्रवास केलास त्यांत ज्यानें तुला संकट–मुक्त केलें तोच तुला मार्ग दाखवील त्या विषयीं बिलकुल काळजी करूं नकोस. आतां आमची एक

गोष्ट ऐकः—ती ही कीं, जगाच्या उत्पत्तीपासून ह्या वेळपर्यंत या देशांत अनेक मनुष्यें आलीं; परंतु त्यांपैकीं तीन इसम मात्र परत आपल्या देशीं गेले व बाकीचे यम लोकीं रवाना झाले. आतां तुझीही त्याप्रमाणेंच अवस्था व्हावयाची. परंतु तुझ्या नशीबीं ब्रह्मदेवानें पुष्कळ आयुष्य लिहिलेलें असल्यामुळें प्राणाचें बिलकुल भय न धरितां येथून तूं पुढें गेलास म्हणजे सुवर्ण—सागरा जवळ जाऊन पोहोंचशील. नंतर जसे इतर सागर उल्लंघन केलेस त्याप्रमाणें तोही सागर ओलांडून गेल्यावर दुसरा एक तांबडा समुद्र तुला लागेल. व तो उल्लंघन केल्यावर थोडक्याच दिवसांत तूं इमन शहरास जाऊन पोहोंचशील. आतां आमचें तुला इतकेंच सांगणें आणें आहे कीं, वाट चालत असतां कांहीं चमत्कारिक वस्तु आढळल्यास त्यांचा बिलकुल हेवा करूं नकोस. म्हणजे कोणत्याही प्रकारचें संकट तुजवर येणार नाहीं, असें बोलून ते दोघेही गुप्त झाले. नंतर सर्व शक्तिमान् प्रभूचें नामस्मरण करून हातीम मार्ग-क्रमावयास लागला. जातां जातां सुमार तीन दिवसांनीं तो एका नदी किनारीं आला व तेथें असलेलीं रंगी बेरंगी उंची मोत्यें बरोबर घेण्याच्या इराद्यानें गोळा करूं लागला. परंतु इतक्यांत मागील उपदेशाचें स्मरण होऊन त्यानें आपल्या मानासिक वृत्तीचें विचार रज्जूनें आकलन केलें. नंतर त्या नदींतलें थोडेंसें पाणी पिऊन तृषा शांत केल्यावर तो मार्ग—क्रमावयास लागला.

पुढें जातां जातां कांहीं दिवसांनीं सोनेरी रंगाचा चकचकाट त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां हा उजेड सुवर्ण-पर्वताचा असावा असा त्यानें तर्क केला. नंतर सुमार एक महिनापर्यंत प्रवास केल्यावर तो त्या पर्वताच्या पायथ्याशीं जाऊन पोहोंचला. त्यावेळीं त्या पर्वताची विलक्षण शोभा पाहून तो अगदीं चकित झाला, कारण त्या पर्वतावर जे वृक्ष होते तेही सुवर्ण रंगाचे असून त्यावरचीं फुलें व फळेंही सोन्याचींच होतीं. पर्वताच्या खिंडींतून जे उदक प्रवाह वाहत होते त्यांचा वर्णही सुवर्णासारखाच होता. अशी ती विलक्षण प्रकारची शोभा पहात पहात तो तिसरे दि-

वरी त्या पर्वताच्या शिखरावर जाऊन पोहोंचला. तेथें एक अति उत्कृष्ट व रमणीय बाग होता. तो पाहून **हातिमास** फारच समाधान वाटलें. नंतर आजचा दिवस येथेंच मुक्काम करावा, असा निश्चय करून तो त्या बागेंतील एका सुवर्ण कोंचावर जाऊन बसला. पुढें रात्र होतांच तेथें कांहीं **गंधर्वस्त्रिया** आल्या. त्यांत जी मुख्य होती तिचें सौंदर्य केवळ रतीस लाजविण्याजोगें होतें. त्यांस पहातांच **हातिमास** अतिशय आनंद होऊन तो ह्मणालाः— हे स्त्रियांनों, तुह्मीं कोण ? व कोठून आलांत ? हें मला कृपा करून सांगा. तेव्हां त्यांतील एक स्त्री ह्मणालीः—**शृंगारसुंदरी** ह्या नांवाची राणी येथें राज्य करीत असते; तिच्या आह्मीं दासी आहोंत. आज राणी साहेब या बागेंत फिरावयास येणार असून त्यांची स्वारी थोडक्याच वेळांत ह्या रस्त्यानें येईल. पुढें थोडक्याच वेळानें **शृंगारसुंदरी**ची स्वारी आपल्या परिवारासह त्या रस्त्यानें आली. तिचें मुखकमल **चंद्रास** लज्जित करणारें असून भृकुटी धनुष्याकार होत्या, दंत कुंद कळ्यांसमान असून हृदयभागावरील अवयव सुवर्ण कुंभाप्रमाणें होतें, कटिप्रदेश सिंहास लज्जित करणारा असून हस्तपाद इत्यादि अवयव कमलपुष्पांप्रमाणें होतें, जंघा कर्दली स्तंभाप्रमाणें होत्या, नेत्र हरिणींनां लज्जा उत्पन्न करणारे होते, सारांश अशी ती लोकोत्तर सौंदर्यवति **शृंगारसुंदरी** गजगतीनें चालत असलेली पाहून **हातीम** मोहित झाला आणि देहभान विसरून मूर्छित होऊन पडला. ही त्याची अवस्था पाहून शृंगारसुंदरीनें दासीहस्तें थोडेंसें गुलाब पाणी त्याच्या शरीरावर सिंचन केलें. तरीही तो सावध होत नाहीं असें पाहून तिनें त्यास आपल्या महालांत नेवविलें. पुढें आणखी शीतोपचार केल्यावर बऱ्याच वेळानें तो सावध झाला. तेव्हां राणीनें त्यास एका रत्नजडित **सिंहासनावर** बसवून आपणही त्याच्या जवळ दुसऱ्या एका **सिंहासना**वर बसली आणि ह्मणालीः—**महाराज,** आपण कोण व इकडे कोणीकडे आलां ? हें ऐकून **हातीम** आपली सर्व हकीगत तिला विदित करून ह्मणालाः—राणीसाहेब, ह्या प्रदेशाचें नांव काय ? येथें कोण अधिकारी राहतो ? हा **हातिमाचा** प्रश्न

ऐकून **शृंगारसुंदरी** ह्मणालीः—ह्या प्रदेशास '**अमरावती**' असें ह्मणतात. येथें '**चित्रसेन**' या नांवाचा गंधर्व राज्य करीत असून मी त्याची अर्धांगी आहें. ह्या उपवनांत वसंतऋतु आला ह्मणजे मी रहावयास येत असत्यें; व पर्जन्य काळाच्या सुमारास परत राज—गृहीं जात असत्यें. आतां ह्या पर्वताविषयीं विचाराल तर हा मेरुपर्वताचाच एक भाग असून यास '**सुवर्णाचल**' असें ह्मणतात.

नंतर पांच दिवसपर्यंत त्या राणीनें **हातिमास** आपल्या येथें ठेऊन घेतलें. तितक्यावेळांत त्याची खाण्यापिण्याची बरदास्त तिनें उत्तम प्रकारची राखली होती. पुढें सहाव्या दिवशीं तो राणीची रजा घेऊन तेथून निघाला. जातांजातां सुमार तिसरे दिवशीं पर्वत उतरू तो एका सपाट मैदानांत आला, नंतर त्या मैदानांतून एक महिनापर्यंत प्रवास केल्यावर तो सुवर्णसागरापाशीं येऊन पोहोंचला. ह्या समुद्रकिनाऱ्यावरची रेती बावनकशी सोन्याप्रमाणें होती; व सागराच्या लाटा आकाशा पर्यंत उसळत होत्या. असा तो सुवर्ण-सागर पाहून **हातीम** कांहींवेळ ईशस्तवन करूं लागला. इतक्यांत एक जहाज किनाऱ्यावर येऊन पोहोंचलें. त्यांत **हातीम** जाऊन बसला आणि तेथें असलेले खाण्याचे पदार्थ क्षुधाशमनार्थ त्यानें सेवन केलें. परंतु पाण्याची त्यास फारच पंचाईत पडली. कारण त्या जहाजांत पाण्याचा एकही थेंब नसून **हातिमास** तृषेनें अगदीं व्याकुळ करून सोडलें होतें. तथापि सुवर्ण सागराच्या पाण्यांत हात घालण्यास त्यास धैर्य होईना. कारण मागें जसा रुप्याचा हात झाला होता तसाच आतांही होईल कीं काय अशी त्यास भीति वाटली. मग त्यानें एक भांडें घेतलें, आणि तें सागराच्या पाण्यानें भरून काढून तृषेचें शांतवन केलें. इतक्यांत वाऱ्याच्या अनुकूलतेनें तें जहाज मोठ्या वेगानें जाऊं लागलें.

पुढें जातां जातां सुमार दोन महिन्यानीं **हातीम** जमीनीवर उतरला. नंतर **परमेश्वरस्तवन** करून त्या प्रदेशांतून तो मजल करूं लागला. परंतु तो रेताड मुलूख नेहमीं विस्तवाप्रमाणें तापलेला असे व चोहोंकडून अग्नीच्या ज्वाळांप्रमाणें उष्णतेच्या

ज्वाळा येत. त्यामुळें **हातिमाच्यानें** एकही पाऊल पुढें टाकवेनासें झालें. ह्यावेळीं त्यानें **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतींही तोंडांत धरलें होतें, परंतु त्यापासून कांहींच उपयोग झाला नाहीं. सारांश, अशी स्थिति झाल्यामुळें क्षुधा, तृषा, व उष्णता यांच्या पीडेनें तो अगदीं गर्भगलित झाला; आणि फारच व्याकुळ होऊन जला–विर-हित जसा मासा तडफडतो तसा तो तडफडूं लागला. इतक्यांत रौप्यपर्वताच्या पायथ्याशीं ज्या दोघां राक्षसरूपी प्राण्यांनीं **हातिमास** तीन रत्नें दिलीं होतीं ते तेथें उत्पन्न झाले आणि **हातिमास** उठवून ह्मणालेः—हें भारलेलें मोतीं तोंडांत ठेव ह्मणजे क्षुधेची, तृषेची, किंवा उष्णतेची पीडा न होतां तूं हा अग्निप्रदेश व अग्निसमुद्र ओलांडून जाशील. परंतु सागर ओलांडून गेल्यावर मात्र हें मोतीं सागरांत फेंकून दे ह्मणजे झालें, इतकें सांगून ते अदृश्य झाले. नंतर तें मोतीं तोंडांत धरून मार्ग—क्रमण करावयास लागला.जातां जातां सुमार पांच दिवसांनीं तो अग्निसमुद्राजवळ आला. त्याच्या लाटा ह्मणजे केवळ अग्नीच्या ज्वाळाच होत. असा तो भयानक समुद्र पाहून **हातिमाचे** हात पाय अगदीं गळून गेले. कारण हा समुद्र ओलांडून कसें जातां येईल याची त्यास अतिशय चिंता पडली. इतक्यांत एक लहानसें तारूं त्यानें किनाऱ्याकडे येतांनां पाहिलें. तेव्हां अतिशय आनंदित होऊन **परमेश्वराच्या** अगाध लीलेचें थोडेसें वर्णन त्यानें केलें. पुढें तारूं किनाऱ्याजवळ आल्यावर तें अगदीं लहान आहे असें पाहून **हातीम** आपल्या मनाशींच ह्मणालाः—ह्या लहानशा तारवांत बसून भयंकर अग्निसमुद्रांतून माझा प्रवास सुरक्षितपणें होईल असें वाटत नाहीं. परंतु करावयाचें काय? ह्या तारवांत बसल्याशिवाय ह्या अग्निप्रदेशांतून आपली सुटका होण्यास दुसरा मार्गच राहिला नाहीं. असो, असा विचार करून तो त्या तारवांत बसला. इतक्यांत अतिशय झपाट्यानें तें चालूं लागलें. पुढें सुमार आठ दहा दिवसांनीं तें तारूं समुद्रांत एकाएकीं गिरक्या खाऊं लागलें. तेव्हां येथेंच आपली **इतिश्री** होते असें वाटून तो फारच भयाभीत झाला; व सर्व शक्तिमान **प्रभूवर** भरंवसा ठेवून एकसारखा त्याचा नामोच्चार करूं

लागला; इतक्यांत तें जहाज एका खडकावर आपटून त्याचे शतशः तुकडे झाले व **हातीम** पाण्यावर तरंगूं लागला. तेव्हां नशीबावर भरंवसा ठेवून तो हलनचलना विरहित स्वस्थ पडला असतां लाटांच्या जोरानें तिसरे दिवशीं तो एका सपाट मैदानावर जाऊन आपटला. नंतर नेत्र उघडून पहातो तों आपण कोरड्या जमीनीवर पडलों असून उष्णतेची वगैरे बाधा आपणांस बिलकुल होत नाहीं असें त्यास वाटलें. तेव्हां त्यानें उठून आपल्याजवळचें भारलेलें मोतीं समुद्रांत फेंकून दिलें आणि मार्ग–क्रमण्यास सुरवात केली.

जातां जातां थोडक्याच वेळानें आपण आपल्या जन्मभूमीच्या अगदीं नजीक आलों आहों असें त्यास वाटून तेथें जवळच एक शेतकरी आपल्या शेतांत कांहीं काम करीत होता त्याचेजवळ तो गेला; आणि ह्मणालाः—अहो दादा, या देशाचें नांव काय ? व येथें कोणता राजा राज्य करीत आहे ? हें **हातिमाचें** भाषण ऐकून हा आपल्या राजाच्या मुलासारखाच दिसतो असें त्या शेतकऱ्यानें पाहून **हातिमाच्या** प्रश्नाचा जबाब दिला नाहीं. तेव्हां **हातीम** पुनः ह्मणालाः—मी जें तुह्मांस विचारलें आहे त्याचें उत्तर तुह्मीं कां देत नाहीं ? तेव्हां शेतकरी ह्मणालाः—या देशाचा राजा जो '**ताई**' त्याच्या पुत्रा सारखे आपण दिसतां ह्मणून मी उत्तर दिलें नाहीं; याजबद्दल मला माफी असावी. हें त्या शेतकऱ्याचें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—तुह्मीं ज्याला ओळखलेंत तो कोण आहे ? शेतकरी ह्मणालाः—ह्या **इमन** देशाच्या **ताई**राजाचा तो पुत्र असून त्याचें नांव **हातीम** असें आहे. तो परोपकारी व दानशूर असल्यामुळें एका राजपुत्राच्या कामाकरितां आज सातवर्षें तो प्रवास करीत आहे. एकवेळ त्यानें आपल्या स्त्रीबरोबर **ताई**राजास आपल्या कुशलपणाचें वृत कळविलें होतें. परंतु तेव्हां पासून त्याचा कांहींच समाचार आह्मास समजला नाहीं. शेतकऱ्याचें हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—ज्याला तुह्मीं ओळखलेंत तोच मी **ताई**राजाचा पुत्र **हातीम.** असो, आतां मला फारच तहान लागली आहे, यास्तव थोडें पाणी प्यावयास द्या. हें ऐकून शेतकऱ्यानें **हातिमास** आपल्या झोपडींत नेलें

आणि दोन भाकरी त्यास खावयास दिल्या. त्या खाऊन पाणी प्याल्यावर **हातीम** ह्मणालाः—आतां माझी आपणांस इतकीच विनंति आहे कीं, मी खुशाल आहें हें वर्तमान माझ्या बापास तुह्मीं कळवा; व मी येथपर्यंत आलों असतांही त्याची भेट घेतली नाहीं याचें कारण इतकेंच कीं, मी जें काम हातीं घेतलें आहे त्यास विलंब लावतां कामा नये; सबब मी सध्यां आपल्या भेटीस येत नाहीं. परंतु थोडक्याच दिवसांत तें काम पुरें करून मी आपल्या दर्शनास येईन; नंतर कधींही प्रवासास जाणार नाहीं. इतकें बोलून त्या शेतकऱ्याची रजा घेऊन **हातीम** तेथून निघाला. पुढें **शहाबादे**स गेल्यावर **मुनीरशहा**ची भेट घेऊन तो **हस्नबानू**कडे गेला. थोडा वेळ उभयतांचेंहीं क्षेमकुशल झाल्यावर **हातिमानें** पांचव्या प्रश्नाची सर्व हकीगत **बानू**स कळविली; आणि बरोबर आणलेलें माणीक, हिरा व पाच हीं तीन रत्नें त्यानें तिला बक्षीस केलीं. पुढें **बानू**कडेच तीन चार दिवस विश्रांती घेतल्यावर सहाव्या प्रश्नाच्या तपासासाठीं तो जाऊं लागला. तेव्हां **बानू** ह्मणालीः—"**जें मोती पाण्यांत राहणाऱ्या कोंबड्याच्या अंड्या येवढें असून, हल्लीं माझ्याजवळ आहे त्याच्या जोडीचें दुसरें आणणें.**" हा माझा सहावा प्रश्न आहे हें ऐकतांच **हातीम** ह्मणालाः—तुमच्याजवळ जें मोतीं आहे तें मला दाखवा. नंतर **बानूनें** तें दाखवितांच **हातिमानें** त्याच्या आकाराचा एक चांदीचा नमुना करून आपल्या जवळ घेतला आणि **बानूची** रजा घेऊन तो **मुनीरशहा**कडे आला. पुढें दोनचार दिवस विश्रांति घेतल्यावर मित्राची आज्ञा घेऊन सहाव्या प्रश्नाचा उलगडा करण्याकरितां तो **शहाबादे**हून निघाला.

# प्रश्न साहवा.

**" जें मोतीं पाण्यांत राहणाऱ्या कोंबड्याच्या अंड्या एवढें असून, हल्लीं माझ्याजवळ आहे त्याच्या जोडीचें दुसरें आण."**

सहाव्या प्रश्नाचा उलगडा करण्याच्या इराद्यानें **हातीम, शहाबादेहून** निघाला; तो एका घोर अरण्यांत पोहोंचला. त्यावेळीं सूर्यास्ताचा समय झाला होता; सबब एका वृक्षा खालीं दगडी चौथरा पाहून तेथें त्यानें वस्तीस राहण्याचा निश्चय केला. पुढें सूर्यास्त होऊन रात्र पडल्यावर **हातिमाच्या** मनांत कार्यसिद्धी कशी होईल या विषयीं अनेक प्रकारचे विचार घोळूं लागले. इतक्यांत एक राजहंसपक्ष्याचें जोडपें वस्ती करण्याच्या उद्देशानें त्या वृक्षावर येऊन बसलें. नंतर थोडावेळ गेल्यावर मादी ह्मणालीः— प्राणनाथ, हा प्रदेश उष्ण कटिबंधांतील असल्यामुळें येथील हवा माझ्या प्रकृतीस मानत नाहीं. यास्तव आतां फार दिवस या ठिकाणीं राहूं नये असें मला वाटतें. तेव्हां नर ह्मणालाः—प्रिये, तुझी जर तशी मर्जी आहे तर आपण उदयीकच मानस सरोवरावर जाण्याकरितां निघूं मग तर कांहीं हरकत नाहीं ना ? मादी ह्मणालीः—ठीक आहे. पण वृक्षाच्या तळांशीं खिन्नवदन झालेला हा मनुष्य कोण बसला आहे ? नर ह्मणालाः—मृत्युलोकांतील सर्व लोक ज्याला मान देतात तो हा **हातीम** नांवाचा **राजपुत्र** आहे. ह्यानें आजपर्यंतचें आपलें सर्व आयुष्य परदुःख निवारण करण्यांत घालविलें असून प्रस्तुत हा परोपकारा करितांच अंड्या येवढें मोतीं मिळविण्याकरितां जात आहे. परंतु तें कोठें मिळेल हें त्याला माहीत नसल्यामुळें चिंताक्रांत होऊन बसला आहे. आतां तें मोतीं कोठें मिळेल हें ऐकण्याची जर तुझी इच्छा असेल तर मी सांगतों. मादीनें ताबडतोब आपली मनीषा दाखविल्यावरून **नर** ह्मणालाः—प्राणसखे, **ब्रम्हदेवानें** जगदुत्पत्ति केल्यावर मोत्यांसारखीं अंडीं घालण्याचें बीज त्यानें आपल्या **राजहंसपक्ष्यांच्या** शरीरांत उत्पन्न केलें. परंतु अंडीं घालण्याचें सामर्थ्य

हें कलियुग लागतांच नष्ट झालें. ह्या पूर्वीं **राजहंस** पक्ष्यांनीं जीं अंडीं घातलीं तीं सप्त समुद्रांत बुडून गेलीं; तथापि दोन मौक्तिकें मात्र प्रस्तुत आहेत. आतां तीं अंड्यां एवढीं मौक्तिकें कशीं राहिलीं असें जर विचारशील तर सप्त सागराजवळ जें गंगापूर या नांवाचें शहर आहे तेथल्या **सूर्यकांत** राजानें सागराची प्रार्थना केल्यावरून त्यानें तीं मोत्यें राजास दिलीं. पुढें त्या राजाचा **चंद्रहंस** नामक एक राजा अतिशय स्नेही होता त्यास त्यानें त्या दोन मोक्तिकांपैकीं एक मोतीं नजर केलें. नंतर कांहीं वर्षांनीं **चंद्रहंस** राजाबरोबर दुसऱ्या राजांनीं युद्ध करून त्याचा प्राण घेतला; त्यावेळीं तें मोतीं त्या राजांनीं नेलें. पुढें एकाजवळून दुसऱ्याजवळ, दुसऱ्याजवळून तिसऱ्याजवळ, अशा रीतीनें जातां जातां शेवटीं तें **बरझाक** व्यापाऱ्याजवळ गेलें आणि प्रस्तुत तें मोतीं त्याची लावण्यलतिका कन्या **हस्नबानू** हिच्याजवळ आहे.

आतां दुसऱ्या मोत्याची हकीगत अशी आहे कीं, **सूर्यकांत** राजा भरज्वानींत असतांनांच मरण पावला व त्याच्या राज्याचा दुसरा अधिकारी झाला, त्यावेळेस **सूर्यकांता**ची स्त्री गरोदर होती. सबब अब्रूच्या भयास्तव तिला पळून जाणें भाग पडल्यावरून तिनें फक्त तें आंड्या येवढें मौक्तिक बरोबर घेतलें. पुढें मजले मजलेनें घोर काननें फिरत फिरत जेव्हां ती समुद्र किनारीं आली तेव्हां पुढें प्रवास करण्याचा उपाय खुंटला ह्मणून आक्रोश करूं लागली. इतक्यांत कोणी एक व्यापारी जाहाजांत गोडें पाणी भरण्याकरितां समुद्र किनारीं आला. तेव्हां **सूर्यकांता**ची राणी दीन स्वरानें सहाय्य करण्याविषयीं त्या जहाजांतील लोकांस हांका मारूं लागली. त्यावेळीं त्या गलबतांतील व्यापारी एका होडींत बसून किनाऱ्यावर आला. नंतर **सूर्यकांता**च्या राणीनें आपली दीन स्थिति विदित करतांच तो तिला आपल्या जहाजावर घेऊन गेला. ह्या व्यापाऱ्याचें नांव '**कृपासागर**' असें होतें; व तें त्याच्या स्वभावाप्रमाणें त्यास शोभतही होतें. कारण त्यानें पुष्कळ लोकांस संकटमुक्त केलें होतें. त्याप्रमाणें ह्या **सूर्यकांता**च्या राणीसही त्यानें आश्रय देऊन काळजी विरहित केलें. पुढें **कृपा-**

**सागर** स्वदेशी गेल्यावर थोडक्याच दिवसांनीं **सूर्यकांताची** राणी पुत्ररत्न प्रसवली. तेव्हां **कृपासागरास** अतिशय आनंद झाला. कारण त्यावेळीं त्याचा वृद्धापकाळ झाला असून पोटीं पुत्रसंतान नसल्यामुळें **परमेश्वर** कृपेनें आपणांस हें पुत्र रत्न अनायासानें प्राप्त झालें असें तो समजत होता.

पुढें शुक्लेंदुवत् तो पुत्र वाढत असतां जेव्हां पांच वर्षांचा झाला तेव्हां त्याची राजलक्षणें पाहून **कृपाघनानें** त्यास एका विद्वन्मुकुटमणीच्या स्वाधीन केलें. तेव्हां थोडक्याच दिवसांत तो कुशाग्र बुद्धी राजपुत्र सर्व विद्येंत निपुण झाला. हें पाहून **कृपासागरानें** त्यास आपल्या सर्व संपत्तीचा वारस केला. या गोष्टीस कांहीं दिवस गेल्यावर तो परोपकारी **कृपाघन** वयोवृद्धतेच्या योगानें स्वर्गवासी झाला. तेव्हां अर्थातच त्याची सर्व संपत्ति व स्थावर मिळकत राजपुत्रास प्राप्त झाली आणि दुसरें असें कीं, **कृपाघन** हा जरी व्यापार धंदा करीत असे तरी तो मूळचा एक मांडलिक राजा होता; त्यामूळें त्याच्या पश्चात् सर्व लोकांनीं ह्या राजपुत्राचे गुण, व हुषारी पाहून त्यास राज्याभिषेक केला. नंतर बरींच वर्षें पर्यंत राज्य केल्यावर जेव्हां **पैगंबराचा शक** चालू होऊन त्यानें सर्व राजे पादाक्रांत करून त्यांचीं राज्यें बळकाविलीं तेव्हां ह्याही राजाचें राज्य त्यानें खालसा केलें. ह्या गडबडींत तें अमोल्य मोतीं एका **गंधर्वस्त्रीच्या** हातीं लागलें व तें हल्लीं तिच्या **विरूपाक्ष** नामक पुत्राजवळ आहे. गंधर्वपुत्र **बराझक्** नांवाचें एक प्रख्यात शहर आहे. तेथें राज्य करीत असतो. ह्या राजाला एक सप्त वार्षिकी कन्या असून त्यानें असा पण केला आहे कीं, “ जो कोणी मनुष्य आपणाजवळ असलेल्या अंड्या एवढ्या मौक्तिकाच्या उत्पत्ती विषयीं पूर्वापार हकीगत सांगेल त्याजला ती कन्या विवाह रज्जूनें बद्ध करून देऊन तें मोतीं आंदण द्यावयाचें. ” असा त्याचा निश्चय झाला आहे. प्रिये, कलियुगाला आरंभ झाल्यापासून तशा प्रकारचें एकही मौतिक नवीन उत्पन्न झालें नसून त्याच्या पूर्वापार उत्पत्तिची हकीगत ह्या पृथ्वीवर फक्त **विरूपाक्ष** गंधर्वासच माहित आहे, व तीही त्याच्याजवळ असलेल्या **रमल** विद्ये-

च्याप्रभावानें त्यास समजली आहे. ह्या **रमल**विद्येचा असा विलक्षण प्रभाव आहे कीं, ती विद्या जो शिकेल त्याला भूत, भविष्य आणि वर्तमान ह्या तिन्हीं काळीं अनुक्रमानें झालेल्या, होणाऱ्या व घडत असलेल्या सर्व गोष्टींचें ज्ञान असावयाचें. आतां ही जी हकीगत मी तुला सांगितली ती एवढ्याच करतां कीं, वृक्षाखालीं बसलेल्या परदुःख निवारक **हातिमा**ची विशेष आयास न करितां कार्य सिद्धी व्हावी व त्या योगानें **मुनीरशहास** सुख व्हावें. नाहीं पेक्षां ही हकीगत सांगण्याचें ह्या वेळीं मला कांहींच प्रयोजन नव्हतें.

हें त्या **राजहंस** पक्ष्याचें भाषण ऐकून मादी ह्मणाली:—तुह्मी सांगतां हें सर्व खरें आहे. परंतु **बरझाक्** देशास जाण्याचा रस्ता त्यास कोण दाखवील? कारण तिकडे जातांना वाटेंत **क्रूर** राक्षसांचीं राज्यें फार लागतात, तेव्हां हा निर्भयरीतीनें तेथें कसा जाऊन पोहोंचेल? नर ह्मणाला:—आजपर्यंतच्या प्रवासांत ज्या **परमेश्वरानें** त्याचें संरक्षण केलें तोच ह्यावेळीं त्यास सुरक्षित रीतीनें **बरझाक**शहरास पोंहोचवील. तथापि त्याच्या संरक्षणाकरितां मी आपल्या पंखांतील कांहीं पिसें देतों, त्याचा त्यास मोठा उपयोग होईल; तो असाकीं, "ज्यावेळेस तो प्रसिद्ध **काफ्**पर्वताजवळ जाईल तेव्हां त्यास तेथें एक भयंकर अरण्य लागेल. त्या अरण्यांतील क्रूर प्राण्यांपासून इजा होऊं नये ह्मणून त्यानें अरण्यांत प्रवेश करण्यापूर्वीं मी दिलेल्या पिसांतून हिरव्या रंगाचीं जितकीं पिसें असतील तितकीं जाळून त्याची राख करावी. आणि ती थोड्याशा पाण्यांत कालवून त्या पाण्यानें त्यानें स्नान करावें. ह्मणजे ह्याच्या आंगाला एका प्रकारचा उग्र वास येईल व त्यामुळें अरण्यांतील भयप्रद जनावरां पैकीं एकही जनावर ह्याच्या वाऱ्यास सुद्धां उभें राहणार नाहीं. इतकेंच नव्हें तर ह्याची ही मानवी काया पालटून राक्षसरूप प्राप्त होईल. आणि त्यायोगानें दैत्यांच्या राज्यांतून प्रवास करण्यास कोणतेही रीतीचा प्रतिबंध होणार नाहीं. पुढें तें अरण्य व दैत्यांचीं राज्यें संपल्यावर **बरझाक्** शहराजवळ तो जाऊन पोहोंचेल, तेव्हां त्याणें माझ्या पां-

ह्या पिसांची राख करून ती पाण्यांत कालवावी व त्या पाण्यानें स्नान करावें ह्मणजे ह्यास पूर्वरूप प्राप्त होईल. नंतर त्यानें कोणत्याही प्रकारची भीति न धरितां बेधडक **बरझाक** शहरांत प्रवेश केला असतां तेथील गंधर्वपहारेकरी ह्यास आपल्या राजाकडे घेउन जातील. तेथें गेल्यावर ह्यानें येण्याचा उद्देश **विरूपाक्षास** कळवावा. ह्मणजे तो आपली प्रतिज्ञा सांगेल. नंतर मी जी हकीगत सांगितली आहे ती त्याला सांगितल्यावर तो सत्यवादी **विरूपाक्ष** आपल्या कन्येबरोबर ह्याचें लग्न करील आणि तें अमोल्य मोतीं आंदण देईल, इतकें बोलून त्या **राजहंस** पक्ष्यानें आपले पंख झाडले. त्याबरोबर बरींच पिसें **हातिमा**च्या सभोंवतीं पडलीं, तीं त्यानें गोळाकरून ठेवलीं.

इकडे मादी नरास ह्मणाली:—ही जी मला आपण हकीगत सांगितलीत ती तुह्मांस कशी कळली व ह्या **हातिमा**च्या हातून अशीं मोठमोठीं कृत्यें घडावयाचीं आहेत हें आपणांस कसें समजलें? नर ह्मणाला:—सदर्हू दोन मोत्यांची हकीगत आपले पूर्वज एकमेकांस सांगत आले त्यामूळें ती मलाही समजली. आतां **हातिमा**च्या भविष्य कृत्यांविषयीं ह्मणशील तर माझ्या एका गुरूनें ही हकीगत मला सांगितली त्यावरून समजली. इतकें त्या उभयतांचें भाषण होत आहे तोंच पहाट झाल्यामुळें ते त्या वृक्षावरून उडून गेले. नंतर थोड्यावेळानें **हातीम**ही **परमेश्वर** स्मरण करून दक्षिण दिशेचा रोंख धरून मार्गक्रमण करूं लागला. पुढें एके दिवशीं रात्रीं एका वृक्षाच्या आश्रयास **हातीम** निजला असतां मध्यरात्रीच्या सुमारास “ हे परमेश्वरा, अशा संकटसमयीं साह्य करणारा असा एकही प्राणी येथें नाहीं काय? ” असे शब्द कोणी रडत रडत उच्चारीत आहे असें त्याच्या कानीं आलें. त्यावरून तो शब्दाच्या रोंखावर जाऊं लागला. पुढें थोडक्याचा वेळांत एक कोल्ही दगडावर आपलें डोकें आपटून वरील शब्द उच्चारीत आहे असें त्यानें पाहिलें. तेव्हां तो तिला ह्मणाला:—तुला कोणी दुःख दिलें तें मला सांग. कोल्ही ह्मणाली:—एक पारधी माझ्या पतीस व पोरांस पकडून मारण्याच्या उद्देशानें सांपळ्यांत घालून घेउन

गेला. त्यामुळें विरहव्यथेनें माझें काळीज एकसारखें तुटत आहे ह्मणून मी येथें शोक करीत बसलें आहें. **हातीम** ह्मणालाः—तुझ्या नवऱ्यास व लेंकरांस धरून नेणारा पारधी कोठें राहतो हें तुला माहीत आहे काय? कोल्ही ह्मणालीः—येथून दोन कोशांवर त्याचें घर आहे; तेव्हां **हातीम** ह्मणालाः—मला त्या पारध्याच्या घरापर्यंत घेऊन चल ह्मणजे तुझ्या पतीच्या व लेंकरांच्या मुक्तते विषयीं होईल तितका प्रयत्न मी करीन.

**हातिमाचें** हें भाषण ऐकून कोल्ही ह्मणालीः—हे मनुष्या, तुजवर मला विश्वास ठेवतां येत नाहीं. कारण ज्या पारध्यानें मला दुःखव्यापी केलें तोही तुझ्याच जातीचा आहे. तस्मात् तूंही माझ्या रक्ताचा भुकेलेला नसशील ह्मणून कशावरून ? त्यांतून मी तुजवर भरंवसा ठेवून आलें असतें. परंतु एका दुर्दैवी वानरीच्या स्थितीप्रमाणें जर माझी अवस्था झाली तर कसें करूं ? **हातीम** ह्मणाला, त्या दुर्दैवी वानरीची काय स्थिति झाली ती मला सांग. तेव्हां कोल्ही ह्मणालीः—**गोदावरी**तटाकीं एक वानर आणि एक वानरी अशीं दोघेंजणें राहत होतीं. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांस संतति झाल्यावर एके दिवशीं एक पारधी आला आणि त्यानें वानरीला शिवाय करून बाकीं सर्वांस आपल्या जाळ्यांत पकडलें; कारण ती वानरी दूर पळून गेल्यामुळें त्याचे हातीं लागली नाहीं. इकडे त्या पारध्यानें वानरांस व पोरांस नेऊन एका गृहस्थास विकलें. वियोगजन्य दुःखानें व्याप्त होऊन ती वानरी अगदीं वेड्यासारखी झाली, व त्या स्थितींत मनुष्यप्राण्याचें भय न बाळगतां कोतवाल कचेरींत गेली. नंतर आपली सर्व हकीगत विदित करून ह्मणालीः—**कोतवालसाहेब,** जसें **परमेश्वरानें** संकटसमयीं दया करावी. असें प्रत्येक प्राणी इच्छितो तसेंच माझ्यावर आपण दया कराल अशी मी इच्छा करितें. कारण एका पारध्यानें माझ्या पतीस व मुलांस पकडून नेऊन एका गृहस्थास विकलें आहे. तरी त्यांस बंधमुक्त करून मला वियोग दुःखापासून मुक्त कराल अशी मी आशा करित्यें. हें त्या वानरीचें भाषण ऐकून पारध्याजवळून आपणच तीं वानरें घेतलीं आहेत या गोष्टीचें भान न राहून को-

तवाल वानरीस ह्मणाला, ज्या पारध्यानें तुला विरहव्यथेंत टाकलें आहे त्याच्या घरीं माझ्या शिपायांस घेऊन जा व त्यास पकडून आण; असें ह्मणून त्यानें आपल्या दोन शिपायांस वानरी बरोबर जाण्यास आज्ञा केली. त्याप्रमाणें शिपायांनीं जाऊन पारध्यास पकडून आणलें. तेव्हां कोतवाल रागावून ह्मणालाः—हे पारध्या, ह्या वानरीच्या पतीस व मुलांस जर तूं पकडून आणलें असशील तर एका क्षणाचाही विलंब न लावतां त्यांस सोडून दे. हें ऐकून पारधी ह्मणालाः—**महाराज**, एक दोन दिवसांमागें आपण जीं वानरें खरेदी केलींत तींच ह्या वानरीचीं नातलगें आहेत. आतां आपणांस जर हिची दया येत असेल तर त्यांस बंधमुक्त करा; ह्मणजे मीही मोबदला घेतलेलें पैसे परत देतों. पारध्याचें हें भाषण ऐकून कोतवाल थोडासा चकित झाला. नंतर कांहींवेळ विचार करून ह्मणालाः—न्याय दृष्टीनें सूक्ष्म विचार केला असतां ह्या वानरीसही तिच्या मुलाबाळांबरोबर पिंजऱ्यांत कोंडून ठेवावी असें मला वाटतें. कारण जीं वानरें मी तुझ्याजवळून विकत घेतलीं आहेत तीं मला प्राणापेक्षांही प्रिय आहेत- असें ह्मणून त्यानें आपल्या शिपायाकडून त्या वानरीसही पिंजऱ्यांत कोंडून ठेवविलें. सारांश स्वतंत्रेतचा उपयोग घेणारी ती वानरी मनुष्यप्राण्यावर विश्वास ठेवून पारतंत्र्यजाळ्यांत अडकून गेली.

इतकी गोष्ट सांगून कोल्ही **हातिमास** ह्मणालीः—कदाचित् तूंही मला त्या वानरी सारखें फसवून विपत्तींत पाडशील या गोष्टीचें फार भय वाटतें, सबब तुजवर विश्वास ठेववत नाही. हें ऐकून **हातिम** ह्मणालाः—तूं मजपासून यत्किंचितही भय बाळगूं नकोस. कारण ज्या मनुष्याची गोष्ट तूं सांगितलीस त्या प्रमाणें सर्वच दगेबाज असतात असें समजूं नकोस. ह्या **हातिमाच्या** विचारी भाषणावरून ती कोल्ही तितक्या अपरात्रीं व काळोखांतून **हातिमास** बरोबर घेऊन पारध्याच्या घरीं जाण्यास निघाली. पुढें पाहांटेच्या सुमारास तीं उभयतां पारध्याच्या घराजवळ येऊन पोहोंचलीं. तेव्हां उजाडेपर्यंत **हातीम** एका वृक्षाखालीं बसला व कोल्ही एका झाडींत जाऊन लपून राहीली. नंतर कांहीं वेळानें उजाडल्यावर **हातीम** त्या

पारध्याच्या घरीं गेला व दार वाजवूं लागला. तेव्हां पारधी दार उघडून ह्मणालाः—आपल्या चेहेऱ्यावरून आपण कोणी तरी परदेशी मनुष्य आहां असें वाटतें. तरी माझ्याजवळ आपलें काय काम आहे तें कळवा. त्यावर **हातीम** ह्मणालाः—मी जातीचा मुसलमान असून येथून बऱ्याच लांबीवर जें **इमन** शहर आहे तेथील राहणारा आहें. आतां इतक्या सकाळीं तुमच्या येथें येण्याचें कारण हेंच कीं, माझ्या शरीराचे सांधे दुखत आहेत, सबब वैद्यानें सांगितलें आहे कीं, 'जर तूं कोल्ह्याच्या ताज्या रक्तानें आंघोळ करशील तर बरा होशील.' पुढें कोल्ह्याच्या शोधास्तव फिरत असतां आपणांकडे तीं मिळतील असें समजल्यावरून मी येथें आलों आहें. तरी कृपा करून आपणांजवळ असतील तीं कोल्हीं मला द्या, त्याबद्दल जी मगाल ती किंमत मी देइन. **हातिमाचें** हें भाषण ऐकून पारधी ह्मणालाः—अशा जरूरीच्या कामास आपण द्याल ती किंमत घेईन. मजजवळ असलेलीं सात कोल्हीं मी खुषीनें देण्यास सिद्ध आहें. हें ऐकून **हातिमानें** पारध्यास बऱ्याच मोहरा दिल्या. त्या घेऊन पारध्यानें घरांत जाऊन एक मोठा कोल्हा व सहा पोरें आणून **हातिमाच्या** स्वाधीन केलीं. तीं घेऊन पारध्याचे उपकार मानून **हातिम** तेथून निघाला, आणि ज्या जाळींत कोल्ही लपून राहिली होती तेथें आला. इतक्यांत ती कोल्ही पुढें आली आणि **हातिमाचे** अतिशय आभार मानूं लागली. नंतर ज्या पाटींत **हातिमानें** तीं कोल्हीं आणलीं होतीं ती खालीं ठेविली, आणि एकेक कोल्ह्यास तो बाहेर काढूं लागला. परंतु त्यांत जो मुख्य कोल्हा होता त्याला पारध्यानें गच्च बांधल्यामुळें व चारा पाणी न मिळाल्यामुळें तो अगदीं मरणोन्मुख झाला होता. ही त्या कोल्ह्याची स्थिति पाहून **हातिमास** फार वाईट वाटलें. तेव्हां कोल्ही ह्मणालीः—हे उदार पुरुषा, माझा पती बरा होण्याला एक उपाय आहे. **हातिमानें** तो कोणता असें विचारल्यावरून कोल्ही ह्मणालीः—जर ह्याला मनुष्याचें ताजें रक्त एक पेलाभर प्यावयास मिळेल तर हा थोडक्याच वेळांत बरा होईल. हें ऐकून **हातिमानें** आपल्या हाताची शीर कापली आणि एक पेलाभर रक्त काढून त्यानें कोल्ह्यास प्यावयास दिलें. तें पिऊन थो-

डावेळ झाला नाहीं तोंच तो अगदीं हुशार झाला. नंतर **हातिमानें** आपल्या हाताची कापलेली शीर घट्ट बांधली आणि तो तेथून जावयास निघाला. तेव्हां त्या उभयतांनीं **हातिमाचे** फार फार आभार मानले.

पुढें दक्षिण दिशेचा रोंख धरून जात असतां कांहीं दिवसांनीं तो एका रेतीच्या ओसाड मैदानांत येऊन पोहोंचला. ह्या मैदानांतून प्रवास करितांना तृषेनें बेजार केल्यावरून तो पाण्याचा शोध करीत फिरत असतां कांहीं अंतरावर एक हिरवी जागा त्याच्या दृष्टीस पडली. ह्मणून जवळ आसपास कोठें तरी पाणी असेल अशा आशेनें तो त्या ठिकाणापर्यंत गेला. तेव्हां पाण्याचा एक लहानसा ओहोळ त्याच्या नजरेस पडला. इतक्यांत त्या ठिकाणीं एक मोठा भुजंग उत्पन्न होऊन त्या ओहोळा सभोंवतीं आपल्या अंगाचें वेटोळें देऊं लागला. हें पाहून **हातिम** प्रथमतः थोडासा घाबरला. परंतु जेव्हां तो भुजंग मनुष्य वाणीनें बोलूं लागला तेव्हां **हातिमास** मोठें आश्चर्य वाटलें. ही **हातिमाची** स्थिति पाहून भुजंग ह्मणालाः—हे **इमन** देशाच्या परोपकारी राजपुत्रा, तूं कोणत्याही प्रकारची भीति न बाळगतां आपल्या तृषेचें शांतवन कर; व मी जेथें जाईन तेथें माझ्या मागोमाग बेधडक ये. हें ऐकून **हातिमानें** त्या ओहोळांतील पाण्यानें आपली तहान भागविली, व प्रालब्धावर भरंवसा ठेवून त्या सर्पाच्या मागोमाग तो जाऊं लागला. पुढें कांहीं वेळानें ते एका उपवनाजवळ येऊन पोहोंचले. त्या उपवनांत नानातऱ्हेचे अनेक वृक्ष फळाफुलांनीं अगदीं ओथंबलेले होते, व मध्यभागीं एक मोठा वृक्षसमुदाय असून तो आपली शीतल छाया सर्व उपवनभर पसरीत होता. त्या छायेंत रंगी बेरंगी गालिचे आंथरलेले असून जागजागीं तक्ये मांडलेले होते. ह्या ठिकाणापर्यंत ते दोघे आल्यावर भुजंगानें, त्या बैठकीवर बसून कांहीं वेळ विश्रांति घेण्याचा **हातिमास** अतिशय आग्रह केला. व तेथें जवळच एक लाल रंगाच्या दगडांनीं बांधलेला तलाव होता त्यांत त्यानें उडी मारली. हा अद्भुत चमत्कार पाहून त्या विषयींचा विचार करीत व श्रम परिहारार्थ विश्रांति घेत **हातिम** त्या बैठकीवर बसला असतां ज्या तलावांत भुजंगानें

उडी टाकली होती त्या तलावांतून रतीसही लाजविणाऱ्या अशा कित्येक गंधर्वस्त्रिया बाहेर आल्या. त्या प्रत्येकीच्या हातांत रत्नांनीं भरलेलें असें एकेक सुवर्णपात्र होतें. पुढें ज्या ठीकाणीं **हातीम** बसला होता त्या ठिकाणीं त्या गंधर्वस्त्रिया येऊन ह्मणाल्याः—ज्या गृहस्थानें आपणांस येथपर्यंत आणलें त्यानें हीं तुह्मांस भेट पाठविली आहे; तरी कृपाकरून हिचा अंगिकार करावा. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—ज्या गृहस्थानें अत्यादरानें मला ही भेट पाठविली त्याचे मी फार फार आभार मानितों; परंतू ही भेट पाठविण्याचें त्या गृहस्थास कांहींच प्रयोजन नव्हतें. कारण ह्या अमोल्य रत्नांचा मला कांहींच उपयोग नाहीं.

हें त्याचें बोलणें होत आहे तों आणखीं कांहीं स्त्रिया त्या तलावांतून बाहेर आल्या. त्यांच्याही हातांत सुवर्ण पात्रें असून त्यांत पूर्वी पेक्षां मौल्यवान रत्नें होतीं. पुढें त्या स्त्रिया जवळ आल्यावर **हातीम** ह्मणालाः—तुह्मीं कोठून आलां आहां व हें तुमच्या हातांत काय आहे? स्त्रिया ह्मणाल्या; पृथ्वींत जीं दुर्मिळ रत्नें तीं तुह्मांस भेट देण्याकरितां आमच्या राजेसाहेबांनीं पाठविलीं आहेत. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—मला ह्या सोन्याची व रत्नांची बिलकुल जरूर नाहीं. हें इतकें तो बोलत आहे तोंच हातांत सुवर्णाचीं ताटें असून त्यांत मधुर फळें व मिठाई आहे अशा कित्येक स्त्रिया त्या तलावांतून बाहेर आल्या. त्यांस पाहून **हातीमास** जरी बरेंच दिवस पर्यंत अन्न खाण्यास मिळालें नव्हतें तरी ज्यानें ही सामुग्री अपल्या करितां पाठविली, तो आल्याशिवाय ह्या पदार्थास स्पर्श करावयाचा नाहीं असा त्यानें निश्चयकेला. इतक्यांत सर्व अलंकारांनीं मंडित असा एक देदीप्यमान व सुंदर पुरुष कित्येक गंधर्व सेवकांसह त्या तलावांतून बाहेर आला. पुढें तो अगदीं जवळ आल्यावर परस्परांनीं परस्परांस अभिवंदन केलें; व तेथें असलेल्या बैठकीवर ते उभयतांही बसले. नंतर तो गंधर्वराज, ह्मणालाः—हे **हातीमराजा** मला ओळखलेंस काय? कारण ही तुमची आमची प्रथमची भेट आहे असें नाहीं. **हातीम** ह्मणालाः—ह्यामागें तुमची व माझी भेट झाल्याचें मला बिलकुल स्मरण नाहीं. गंधर्वराज ह्मणालाः—कांहीं वेळापूर्वी ज्या

ओहोळावर अपण पाणीं पिण्यासाठीं गेला होतां त्या ओहोळाव-रून ज्यानें तुम्हांस ह्या बागेपर्यंत आणलें तोंच मी. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—मगाच्या व आतांच्या स्थितींत जमीन अस्मानाचें अंतर दिसतें, तरी अशी स्थिति होण्याचें कारण कळावें अशी माझी म-नापासून इच्छा आहे. गंधर्वराज ह्मणालाः—आपणांस बहुत दिव-सपर्यंत उपहाराचे पदार्थ खाण्यास न मिळाल्यामुळें अतिशय क्षुधा लागली असेल, तरी प्रथमतः आपण थोडासा फलाहार करावा, नंतर मी सर्व हकीगत आपणांस निवेदन करीन.

इकडे सेवकांनीं रुप्याचे पाट मांडून, पाणी पिण्याकरितां सुवर्ण कलश ठेवून रत्न जडित ताटांत उपहाराचे अनेक पदार्थ वाढून तयार ठेविले होते. ही सर्व तयारी पाहून ते उभयतांही फराळास बसले. पुढें फराळ वगैरे आटोपून पान सुपारी गुलाब वगैरे झा-ल्यावर **हातीम** ह्मणालाः—मघांशीं आपण जी हकीगत सांग-ण्याचें वचन दिलें होतें तें पूर्ण करण्यास ही संधी उत्तम आहे. हें ऐकून तो गंधर्वराज हांसून ह्मणाला, “ मी एका गंधर्वराजाचा मुख्य सेनापति असून माझें नांव **विरासिंह** असें आहे. पुढें एके दिवशीं मी आपल्या रमणीय उद्यानांत बसलों असतां अशी दुष्ट-इच्छा उत्पन्न झाली कीं, आपल्या ताब्यांत इतकी सेना असून राजाच्याताब्यांत वागावें हें ठीक नाहीं. असा विचार माझ्या मनांत येऊन राजाला पदच्युत करून त्याचें राज्य बळकाविण्याचा मी निश्चय केला. नंतर आपल्या ताब्यांतील सैन्यांतल्या मुख्यांस बोलावून आणण्याकरितां मी तावडतोब जासूद रवाना केले, ते सर्व आल्यावर मी आपला हेतु त्यांस कळविला; आणि सांगितलें कीं, माझ्या इच्छेप्रमाणें सर्व सिद्धि करण्याकरितां जर तुह्मी काया वाचा मनेंकरून झटाल तर हल्लीं जें वैभव भोगीत आहां त्यापेक्षां जास्त वैभव तुह्मीं भोगाल. हें माझें सांगणें त्यानीं तावडतोब मान्य केलें. नंतर “ **शुभस्यशीघ्रं** ” या न्यायानें मी त्यांस दुसरेच दि-वशीं आपल्या ताब्यांतील लोक घेऊन युद्ध **सामुग्रीनिशीं** राज वाड्यासमोर तयार असण्याचा हुकूम केला; त्या प्रमाणें ते दुसरे दिवशीं तयार होते. मीही सूर्योदय होतांच सायुध होउन राज-

वाड्या समोर जाऊन उभा राहिलों. इकडे ही बातमी माझ्या **राजास** समजल्यावरून त्याला अतिशय क्रोध आला, व त्यानें आपल्या मंत्र सामर्थ्यानें मला व सर्व सेनेला भुजंगरूपी केलें. त्यावेळीं माझी जी स्थिति झाली ती कांहीं आतां सांगतां येत नाहीं, असो.

पुढें कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन मी त्या ठिकाणाहून निघालों आणि वनोपवनें हिंडत हिंडत एका स्वामीच्या मठाशीं येऊन पोहोंचलों. त्यावेळीं पूर्व स्थितीचें मला थोडेंसें स्मरण होतें. पुढें जेव्हां स्वामीची भेट झाली तेव्हां त्यांना माझी अशी अवस्था होण्याचें कारण समजलें. त्यावरून त्यांनीं सांगितलें कीं, पुष्कळ वर्षांनीं ह्या प्रांतामध्यें **इमन**देशाचा परोपकारी राजपुत्र येईल व त्याच्या दर्शनानें तूं पूर्व स्वरूप पावशील; व त्याच वेळीं तुझ्या सर्व सेनेचाही उद्धार होईल. परंतु जेव्हां तो तुला भेटेल तेव्हां त्यासह येथें ये; ह्मणजे तुला मी पूर्व स्थितीप्रत पोहोंचवीन. हें त्या सत्पुरुषाचें बोलणें संपत आहे तोंच माझी बुद्धी भ्रष्ट झाली व सर्प योनींत होणारें सुखदुःख मला समजूं लागलें. नंतर मी त्या ठिकाणाहून निघून ह्या माझ्या स्वतःच्या बागेंत येऊन राहिलों.

पुढें कित्येक वर्षें लोटल्यावर आपल्या आगमनाला जेव्हां वीस वर्षें बाकी राहीलीं तेव्हां मला पूर्व स्थितीचें ज्ञान झालें. त्या वेळेपासून मी आपली एकसारखी वाट पहात राहिलों असतां आज तो सुदिन दैवयोगानें प्राप्त झाला. तरी आतां विशेष विलंब न करितां आपण दोघेही मला पूर्वस्थिति प्राप्त करून देणाऱ्या सत्पुरुषाकडे जावूं. हें त्या **वीरसिंहा**चें भाषण ऐकतांच **हातीम** निघण्यास सिद्ध झाला, नंतर ते दोघेही त्या स्वामिच्या मठांत गेले. तेथें गेल्यावर त्या उभयतांचीही स्वामीनीं मोठ्या औत्सुक्यानें भेट घेतली. पुढें एक दोन दिवस राहिल्यावर स्वामीनीं आपल्या मंत्रसामर्थ्यानें गंधर्वास पूर्वस्थिति प्राप्त करून दिली. नंतर ते उभयतांही स्वामीची आज्ञा घेऊन परत बागेंत आले. पुढें एकदोन दिवस आदारातिथ्य सुखाचा अनुभव घेतल्यावर गंधर्व ह्मणाला:—हे परोपकारी पुरुषा, आपले जे मजवर उपकार झाले आहेत ते कालत्रयींहीं फि-

टावयाचे नाहींत. सबब कांहीं तरी आपली सेवा करावी असें माझ्या मनांत आहे, तरी कोणत्या उद्देशानें आपण हा इतक्या लांबीचा प्रवास केलात तें मला कृपाकरून कळवावें. हें ऐकून **हातीम** ह्मणालाः—माझ्या जवळ एका प्रकारच्या मोत्याचा नमुना आहे त्याच्या जोडीचें मोतीं आणण्या करीतां मला **बरझाक** शहरास जावयाचें आहे. असें ह्मणून त्यानें आपल्या जवळचा मोत्याच्या आकाराचा नमुना दाखविला. तेव्हां **वीरसिंहानें** तो हातांत घेऊन कांहींवेळ लक्षपूर्वक पाहील्यावर तो ह्मणालाः—आपण सांगतां तशा प्रकारचें मोतीं **बरझाक** शहरच्या राजाजवळ आहे खरें. परंतु जो त्या मोत्याच्या उत्पतिची पूर्वापार हकीगत सांगेल त्याला आपली कन्या देऊन तें मोतीं आंदण देण्याचा त्याचा निश्चय आहे. तथापि त्या शहरापर्यंत जाणें अतिशय धोक्याचें आहे. कारण वाटेनें नरमांसभक्षक अशा राक्षसांचीं राज्यें आहेत, त्यामुळें निर्भय रीतीनें जातां येणार नांहीं. हें ऐकून हातीम ह्मणालाः—मी जें काम हातीं धरलें आहे तें पुरें केल्याशिवाय सोडावयाचें नाहीं असा माझा निश्चय आहे. आतां **बरझाक** शहरास जाण्यास मार्गांत अनेक प्रकारचीं भयें आहेत असें तुह्मीं सांगतां; परंतु **परमेश्वराची** कृपा असल्यावर त्याही संकटांतून मी पार पडेन. त्यावर **वीरसिंह** ह्मणालाः—तुह्मी ह्मणतां ती गोष्ट खरी आहे. परंतु मार्गांत संकटें येऊं नयेत ह्मणून मी आपल्या बरोबर कांहीं शूर व निवडक असे इसम देतों त्यांस घेऊन जावें. असें ह्मणून त्यानें आपल्या कित्येक सरदारांस बोलाऊन आणलें.

पुढें ते आल्यावर **वीरसिंह** त्यांस ह्मणालाः—ज्यावेळेस आपण सर्वांनी राजद्रोह केला, त्यावेळीं आपली काय अवस्था झाली होती हें सर्व तुह्मी जाणतच आहां. त्या स्थितींतून आपली सर्वांची मुक्तता ह्या पुण्यपुरुषाच्या कृपावलोकनेवरून झाली. तस्मात् माझ्यावर मेहेरबानी करून तुह्मी ह्या पुण्यपुरुषाबरोबर जा. हें त्या गंधर्वाचें भाषण ऐकून ते सरदार ह्मणालेः—आपण जी आज्ञा करीत आहां ती आह्मांस शिरसामान्य आहे. परंतु हे गृहस्थ कोठें जाणार व ह्यांच्या बरोबर जाऊन आह्मी काय करावें तेवढें मात्र

कृपा करून कळवा, ह्मणजे ह्यांचें साह्य करण्यास आम्ही मनःपूर्वक झटूं.

हें त्यांचें भाषण ऐकून गंधर्वानें **हातिमास** ज्या ठिकाणीं जावयाचें होतें तें ठिकाण व मार्गांत येणाऱ्या अडचणी त्या सरदारांस सांगितल्या. त्या ऐकून ते जरी जात्या शूर होते तरी अगदीं गभंगलित होऊन निरुपायास्तव म्हणालेः—आम्ही याज बरोबर जाण्यास सिद्ध आहों. परंतु वाटेंत कांहीं विपरीत प्रकार घडल्यास आपण मात्र मदतीस जरूर यावें. हें ऐकून गंधर्वानें सर्व सेना सिद्ध करवून त्या सरदारांस पुढें जाण्याविषयीं सांगितलें, व एक सुवर्णाचें विमान आणवून त्यांत **हातिमास** बसवून तें वाहून नेण्याविषयीं चौघां दूतांस आज्ञा केली. त्या प्रमाणें तीन दिवस पर्यंत कोठेंही न थांबतां ते **हातिमास** घेऊन चालले असतां अन्न पाणी न मिळाल्यामुळें तो अगदीं व्याकुळ झाला; तेव्हां निरुपायामुळें त्यांस विमान थांबविणें भाग पडलें. परंतु ज्या स्थलीं त्यांनीं मुक्काम केला होता तें स्थान क्रूर राक्षसांचें होतें हें त्या दूतांस मुळींच माहीत नसल्यामूळें चौघां दूतांपैकीं दोन इसम **हातिमा**च्या संरक्षणास राहिले व दोघे अन्न पाण्याच्या शोधास निघून गेले.

या गोष्टीस फारसा वेळ झाला नाहीं तोंच कित्येक क्रूर राक्षस तेथें आले व सुवर्णाच्या विमानांत एक मनुष्य बसला असून त्याचें रक्षण दोन गंधर्व करीत आहेत, असें त्यांनीं पाहीलें. तेव्हां मनांत फारशी शंका न धरीतां त्यांनीं तें विमान आपल्या हस्तगत करून घेतलें. ह्या राक्षसांची संख्या बरीच असून ते अवचित आल्यामुळें **हातिमा**चें संरक्षण करणारे ते दोघे गंधर्व प्रथमतः घाबरले व पळून जाण्याचा विचार करूं लागले. परंतु थोडक्याच वेळांत असें करणें आपणांस योग्य नाहीं असें वाटून त्यानीं जिवावर उदार होऊन त्या क्रूर राक्षसांबरोबर दोन हात केले. परंतु राक्षसांची संख्या फार असल्यामुळें गंधर्वांचा पराजय झाला. तेव्हां **हातिमास** व दोघां गंधर्वांस कैद करून त्या राक्षसांनीं आपल्या राजाजवळ नेलें. नंतर राजानें तुह्मी कोठून आलां व जायचें कोठें? अशी चौकशी केली असतां गंधर्वांनीं **हातिमा** विषयींची सर्व ह-

कीगत त्यास सांगितली. आणि जर तुह्मी ह्या पुण्यपुरुषाच्या शरीरास धक्का लावला तर तुमची अवस्था कठीण होईल अशी धमकी दिली. ती ऐकून राजास अतिशय क्रोध येऊन त्या तिघांस प्रतिबंधांत ठेवण्याविषयीं त्यानें कोतवालास आज्ञा केली. त्याप्रमाणें एका मोठ्या तळघरांत त्यानें तिघांसही कोंडून ठेविलें.

इकडे अन्नपाण्याच्या शोधा करितां गेलेले गंधर्व पूर्वस्थलीं येऊन पाहतात तों छिन्न विछिन्न झालेलीं राक्षसांचीं प्रेतें व रक्त या शिवाय तेथें कांहींच दिसेना. हें पाहून त्यांस मोठें आश्चर्य वाटलें. नंतर त्यांनीं **हातिमा**चा व आपल्या दोघां मित्रांचा पुष्कळ ठिकाणीं शोध केला. परंतु कांहींच ठिकाण लागला नाहीं; हें पाहून ' ह्या प्रांतांत राहणाऱ्या राक्षसांनीं तर त्यांस पकडून नेलें नसेलना ?' असा विचार त्यांचे मनांत आला. मग पुरी चौकशी करून जो काय शोध लागेल तो आपल्या राजास कळवावयाचा बेत करून ते चोहोंकडे तपास करूं लागले. पुढें घायाळ झालेला व मरणाच्या पंथास येऊन पोहोंचलेला एक राक्षस आढळल्यावरून त्यांनीं थोडेंसें पाणी त्याच्या तोंडांत घातलें व शरीरावर पडलेले घाय बांधले. त्यामुळें कांहीं वेळानें तो चांगला सावध झाल्यावर ह्मणालाः—आजरोजीं आमची एक टोळी शिकार करण्या करितां ह्या अरण्यांत फिरत असतां एक सुस्वरूप मनुष्य व दोन गंधर्व आह्मांस आढळले. आह्मी त्यांस धरूं लागलों असतां गंधर्वांनीं आमच्या बरोबर झगडा केला. त्यांत आमच्या पैकीं कित्येक राक्षस प्राणास मुकले व कित्येक पळून गेले, त्यापैकींच मी आहें. पुढें आमच्या पैकीं तेथें जे शिल्लक राहिले होते त्यांनीं मोठा पराक्रम करून गंधर्वांचा पराभव केला व त्या तिघांस चतुर्भूज करून राजाकडे नेलें.

राक्षसाच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच गंधर्वांनीं त्यास चतुर्भुज करून तीन दिवसांनीं परत **वीरसिंहा**कडे नेलें. त्यांस पहातांच **वीरसिंह** क्रोधानें ह्मणालाः—कायरे, तुह्मांला मी **बरझाकशहरास** जाण्याची आज्ञा केली असतां अजून पर्यंत तुह्मी ह्या ठिकाणीं कसे राहिलांत ? हीं **वीरसिंहा**च्या तोंडचीं अक्षरें ऐकतांच ते दोघे

गंधर्व भयाभित होऊन ह्मणाले:—आपल्या आज्ञेप्रमाणें आकाश-मार्गानें विमानांतून **हातीम** महाराजांस घेऊन जात असतां क्षुधेच्या व तृषेच्या योगानें त्यांचा जीव कासाविस झाला ह्मणून आह्मी विमान खालीं उतरलें. पुढें आमच्या पैकीं दोघांस त्यांचें संरक्षण करण्यास ठेऊन आह्मी दोघे अन्नपाण्याचा तपास करण्याकरितां गेलों असतां कित्येक भयंकर राक्षसांची टोळी त्या ठिकाणीं आली, आणि **हातीम** महाराजांस व त्यांचें रक्षण करणाऱ्या दोघां गंधर्वांस चतुर्भुज करून घेऊन गेली. त्या नराधमांस तसें न करूं देण्याविषयीं गंधर्वांनीं जिवापाड श्रम केले, परंतु राक्षसांची संख्या पुष्कळ असल्यामुळे त्यांचा निरुपाय झाला. पुढें आह्मी आल्यावर जिकडे तिकडे राक्षसांचीं प्रेतें पडलीं असून रक्ताचे मोठे पाट चालले आहेत, हा प्रकार पाहून आमचीं मनें अतिशय भयाभीत झालीं. परंतु पुढें शोधाअंतीं एक घायाळ झालेला राक्षस आह्मांस सांपडला; व त्यानेंच **हातीम** महाराजांस व दोघां गंधर्वांस पकडून नेल्याची खबर सांगितली. आतां ह्या गोष्टींत आमचा कांहींच अपराध नाहीं. कारण जर तें ठिकाण राक्षसांच्या वस्तीचें आहे असें पूर्वींच समजलें असतें तर त्या ठिकाणीं आह्मी मुक्काम केला नसता. परंतु ईश्वरी–संकेत तसें घडण्याचा असल्यामुळें त्याच्या इच्छेविरुद्ध आमच्यानें तरी कसें जाववेल? असें ह्मणून त्या पकडून आणलेल्या राक्षसास राजापुढें उभें केलें. त्यास पहातांच **वीरसिंह** क्रोधायमान होऊन ह्मणाला:—तुमच्या राजानें आमच्या मनुष्यांस उपद्रव कां दिला ? राक्षस भयाभीत होऊन ह्मणाला, ते मनुष्य आपले आहेत असें जर आमच्या राजास माहीत असतें तर त्याच्या हातून हा प्रमाद कधींही घडला नसता. कारण पुष्कळ वर्षांमागें आपली देहभिन्नता झालेली त्यांस समजली असल्यामुळें हल्लीं आपण ह्या भूतलावर पूर्वस्थितींत वास्तव्य करीत आहां हें त्यास कळलें नाहीं.

हें त्या राक्षसाचें भाषण ऐकून **वीरसिंहानें** आपल्या पदरच्या दुसऱ्या कित्येक सरदारांस बोलावून आणवून चतुरंग सेना सिद्ध करण्याची आज्ञा केली. त्या प्रमाणें सेनेची कडेकोट

तयारी होतांच तो विद्युल्लतेप्रमाणें सर्व परिवारासह आकाशमार्गानें तीन दिवसांच्या आंत **राक्षस**–भुवनाजवळ येऊन दाखल झाला नंतर त्यानें कित्येक गुप्त हेर शत्रूच्या राज्यांत रवाना करून त्यांस राजदरबार कोठें आहे? व राजा हल्लीं काय करीत आहे वगैरे खुलासा फारच गुप्त रीतीनें मिळवून आणण्यास सांगितलें. पुढें थोडक्याच वेळानें जासुदांनीं येऊन सांगितलें कीं, ह्या वेळीं **राक्षसराज** आपली सर्व सेना बरोबर घेऊन मृगया करण्या करितां गेला आहे. हें त्यांचें भाषण ऐकतांच **वीरसिंहानें** आपल्या सर्व सेनेचें राक्षसांबरोबर निकरानें युद्ध करण्याविषयीं वचन घेतलें; व रणदुंदुभी वाजविण्याचा हुकूम करून सर्व सेनेसह तेथून निघून ज्या अरण्यांत राक्षसराज शिकार कारण्या करितां गेला होता तेथें जाऊन त्या अरण्यास वेढा दिला, व मागें पुढें न पाहतां त्यांनीं राक्षसांची एक सारखी कत्तल चालविली. त्यामुळें असंख्यात राक्षस यमलोकास गेले व जे शिल्लक राहिले होते ते शरण आले. नंतर **वीरसिंहानें** राजास कैद करून आपणापुढें आणविलें; आणि ह्मणालाः–हे नराधमा, माझ्या सेवकांनीं मी पूर्वस्थितींत आल्याचें तुला सांगितलें असून बेपर्वाईनें तूं त्यांचा छल केलास याबद्दल तुला मी योग्य शिक्षा करणार; नाहीं तर ते हल्लीं कोठें आहेत तें सांग. हें ऐकून राक्षसराज ह्मणालाः– त्या सर्वांची आह्मी केव्हांच चटणी करून टाकली. तेव्हां **वीरसिंह** ह्मणालाः— तुझ्या वाडवडिलांनीं आमच्या लोकांस त्रास न देण्याविषयीं घेतलेल्या शपथा तूं विसरलास काय? राक्षसराज ह्मणालाः– माझ्या वडिलांनीं जरी शपथा घेतल्या होत्या तरी मी त्या बिलकुल पाळणार नाहीं.

हें त्या राक्षसराजाचें उर्मटपणाचें भाषण ऐकून **वीरसिंहास** फारच क्रोध येऊन त्यानें आपल्या सेवकांस मोठा अग्नी प्रदीप्त करण्याविषयीं सांगितलें. त्याप्रमाणें अग्नी प्रदीप्त होतांच त्यांत राक्षसराजास टाकण्याचा त्यानें हुकूम केला. **वीरसिंहाचें** हें भाषण ऐकून आतां आपली धडगत नाहीं असें पाहून राक्षसराजा काकुळतीस येऊन ह्मणालाः– तुमच्या मनुष्यांची जर मी मुक्तता केली तर मला जीवदान द्याल काय? **वीरसिंह** ह्मणालाः– माझी मनुष्यें, सुखरू-

पतेनें मिळाल्यावर तुझ्यांत आणि माझ्यांत बिलकुल वैरभाव राह-णार नाहीं. राक्षसराजा ह्मणाला:—असें जर आहे तर तुह्मी आपले कांहीं लोक माझ्या शहरांत पाठवा ह्मणजे राजवाड्याच्या तळघरांत मी त्यांस प्रतिबंधांत ठेविलें आहे; तेथून घेऊन येतील. हें ऐकतांच **वीरसिंहानें** आपल्या कित्येक सरदारांस शहरांत जाण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें त्यांनीं जाऊन तळघराच्या दरवाजा फोडून **हातिमास** व दोघां गंधर्वांस बाहेर काढून **वीरसिंहाजवळ** आणलें. त्यांस पाहतांच **वीरसिंहानें** मोठ्या प्रेमानें **हातिमास** आलिंगन देऊन आपल्या शेजारीं बसविलें. कांहीं वेळ उभयतां चेंक्षेमकुशल झाल्यावर **वीरसिंह** आपल्या सरदारांस ह्मणाला:— ह्या कुकर्मी व चांडाळ राक्षसराजास जिवंत ठेविलें तर पुढेंही हा आपणांस त्रास दिल्या शिवाय राहणार नाहीं. यास्तव याला एका क्षणाचाही विलंब न लावितां अग्निमुखांत फेंकून द्या, ह्मणजे झालें. **वीरसिंहाचें** हें भाषण ऐकून राक्षसराजानें त्याची अतिशय विनवणी केली. परंतु त्यानें तिकडे लक्ष न दिल्यामुळें सरदारांनीं तत्काळ त्याची **अग्निनारायणास** आहुती दिली. नंतर त्या रिक्तराज्यावर अधिकार चालविण्याकरितां आपल्या एका मुख्य सरदाराची नेमणूक करून **वीरसिंहानें** आपल्या सेवकांपैकीं निवडक अशा चार सेवकांस **हातिमास बरझाक्** शहरापर्यंत सुखरूपतेनें पोंचविण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें त्या चार असामींनीं विनाम सिद्ध केल्यावर **हातीम वीरसिंहास** मोठ्या प्रेमानें भेटून विमानारूढ झाला. त्याबरोबर पवनगतीनें तें विमान चालूं लागलें.

जातां जातां एके दिवशीं ते एका पर्वतावर विश्रांति घेण्याकरितां उतरले असतां त्या टिकाणीं **बरझाक्** शहरच्या राजकन्येचें सौंदर्य पाहून लोलुप झालेला एक गंधर्वराजपुत्र आपल्या प्रीतिपात्रास उद्देशून शोक करीत होता. त्याचे दुःखोद्गार **हातिमानें** ऐकले, तेव्हां तो विमानवाहक गंधर्वांस ह्मणाला:—आसपास कोठें तरी दुःखानें व्याप्त झालेला कोणी मनुष्य शोक करीत आहे असें वाटतें, तरी आपण त्याचा शोध करूं असें ह्मणून ज्या दिशेकडून ते शब्द येत होते त्या दिशेचा रोंख धरून तो चालला असतां

थोडक्याच वेळानें त्या दुःखी राजपुत्रासमोर जाऊन उभा राहिला; आणि ह्मणालाः—हे सुंदर व तरुण पुरुषा, तूं कोण आहेस व येथें शोक करीत कां बसला आहेस ? **हातिमाचे** हे शब्द ऐकून राजपुत्रानें आपले नेत्र उघडून पाहिलें तों आपणासमोर एक सुंदर पुरुष उभा असून तो आपल्या दुःखाचें कारण विचारीत आहे. हें पाहून तो ह्मणालाः—आपण कोणत्या उद्देशानें ह्यास्थलीं आलां आहां व आपलें नांव काय ? **हातीम** ह्मणालाः—मी **इमन**शहरचा राहणारा असून माझें नांव **हातीम.** बदकाच्या आंड्याएवढें मोतीं आणण्याच्या इच्छेनें मी **बरझाक्**शहरास जात असतां विश्रांतिस्तव ह्या पर्वतावर उतरलों, तों आपला शोक ऐकून त्याचें कारण समजून घेण्याच्या इराद्यानें येथें आलों आहें. **हातिमाचें** हें भाषण ऐकून राजपुत्र ह्मणालाः—आपण सांगतां त्याप्रमाणें **बरझाक्**शहरच्या राजाजवळ आंड्याएवढें मोतीं आहे खरें. परंतु त्या मोत्याची जो पूर्वापार हकीगत सांगेल त्यालाच तें मोतीं देण्याचा त्याचा निश्चय आहे. त्या मोत्याची हकीगत जरी आह्मी गंधर्व आहों तरी आह्मासही माहीत नाहीं; मग तुह्माला कोठून असणार बरें ? सबब या कामांत तुह्मास यश मिळणें कठीण आहे. **हातीम** ह्मणालाः—परमेश्वर साह्यकर्ता असल्यावर सर्व गोष्टी सुरळीत होतात. परंतु तुह्मी जो ह्या पर्वतावर बसून शोक करीत आहां त्याचें कारण काय ? गंधर्व ह्मणालाः—एके दिवशीं मी आपल्या बापाच्या दरबारांत बसलों असतां एका प्रवाशानें **बरझाक्**शहरच्या राजकन्येच्या स्वरूपाची व गुणांची फारच तारीफ केली. ती ऐकतांच माझ्या शरीरांत कामदेवानें तात्काळ प्रवेश केला. नंतर मी तेथून निघून **बरझाक्**शहरास गेलों, आणि तेथील राजास सांगून पाठविलें कीं, तुझ्या उपवर झालेल्या कन्येबरोबर विवाह करण्याच्या हेतूनें मी आलों आहें. ह्या माझ्या निरोपाप्रमाणें त्यानें आपला दरबार भरवून मला अमंत्रण पाठविलें. त्याप्रमाणें दराबरांत जातांच सर्व लोकां समक्ष त्यानें बदकाच्या आंड्याएवढ्या मोत्याची पूर्वापार हकीगत विचारली. परंतु त्या विषयींचें कांहींच वर्तमान मला माहीत नसल्यामुळें निरुत्तर होऊन

स्वस्थ बसावें लागलें. हें पाहून राजा ह्मणालाः—तुह्मांला विचारलेल्या प्रश्नाचें जो कोणी उत्तर देईल त्याजबरोबर माझ्या कन्येचें लग्न करावयाचें व त्याला तें मोतीं आंदण द्यावयाचें असा माझा निश्चय आहे.

हें त्याचें भाषण ऐकतांच मी तेथून निघून राजवाड्यावरून जात असतां ज्या सुंदरीनें आपल्या लोकोत्तर गुणांनीं माझें मन आकर्षण करून घेतलें होतें ती वाड्याच्या गच्चीवर उभी असलेली मी पाहिली. मित्रा, त्यावेळीं माझी, जी स्थिती झाली त्या स्थितींतच मी ह्या पर्वतावर येऊन सुंदरीच्या प्राप्तीसाठीं शोक करीत राहिलों. हें त्या गंधर्व राजपुत्राचें भाषण ऐकून हातीम ह्मणालाः—मित्रा, तूं निराश होवूं नकोस. कारण मी जो दीर्घ प्रयत्न करण्याचें मनांत आणलें आहे त्यांत जर यश आलें तर ती सुंदरी तुलाच प्राप्त करून देईन. हातिमाचें हें भाषण ऐकून गंधर्वपुत्र ह्मणालाः—आपण स्वभावानें जरी उदार दिसत आहां तरी हें काम आपल्या हातून तडी जाणें दुर्घट आहे. हातीम ह्मणालाः—त्या विषयीं तूं मुळींच काळजी करूं नकोस. फक्त माझ्या बरोबर बरझाक शहरास चल ह्मणजे झालें. हें ऐकून गंधर्व-पुत्र ताबडतोब उठला आणि हातिमास वंदन करून त्याजबरोबर जावयास निघाला. नंतर हातीम व गंधर्वपुत्र विमानांत बसल्यावर सेवकांनीं तें पवन गतीनें चालूं केलें. पुढें विकर्ण, या नांवाच्या क्रूर राक्षसाच्या राज्यावरून ते जात असतां त्याची नजर विमानावर गेली. तेव्हां तो आपल्या सेवकांस ह्मणालाः—हे कोणी गंधर्व विमानारूढ होऊन आपल्या राज्यावरून चालले आहेत तरी त्यांस धरून मजकडे आणा. ही राजाज्ञा होतांच सेवकांनीं तात्काळ आकाशांत उड्डाण करून विमान पकडून सर्वांस घेऊन ते आपल्या राजाजवळ आले. त्यांस पाहून वीकर्ण राजानें तुह्मी आलां कोठून वगैरे चौकशी केली. तेव्हां सेवक ह्मणालेः—आह्मी वीरसिंह नामक गंधर्व श्रेष्ठाचे दूत असून त्यांच्या आज्ञेवरून ह्या दोघांस बरझाक शहरास घेऊन जात आहों. हें त्याचें भाषण ऐकून विकर्ण हांसून ह्मणालाः—वीरसिंह व त्याची सर्व सेना यांस सर्प-

रूप प्राप्त झाल्याला आज हजारों वर्षें झालीं असून त्यांतून त्याची मुक्तता झाल्याचें आमच्या ऐकण्यांत नाहीं; सबब तुह्मी सांगतां ही सर्व गोष्ट खोटी आहे. सेवक हातिमाकडे बोट करून ह्मगाले:—ह्या विमानांत जी ही सत्पुरुषाची मूर्ति बसली आहे त्यांच्याचें कृपादृष्टीनें आह्मां सर्वांचा उद्धार झाला. हें ऐकून **विकर्ण** ह्मणालाः—परंतु त्याच्या शेजारी हा दुसरा कोण बसला आहे? इतक्यांत गंधर्वपुत्र पुढें होऊन ह्मणालाः—मला आपण ओळखलें नाहीं काय? **विकर्ण** थोडा विचार करून ह्मणालाः—हो हो, मी तुला ओळखलें. परंतु तूं ह्या मानवाबरोबर मैत्री केलीस या गोष्टीचें मात्र मला मोठें नवल वाटतें. आतां तुझ्या बापाचा व माझा जिवश्चकंठश्च स्नेहभाव असल्यामुळें मी तुला मात्र उपद्रव करणार नाहीं. परंतु हा जो मनुष्य आहे त्याची चटणी केल्याशिवाय मी कधींही राहणार नाहीं. **विकर्णा**चें हें भाषण ऐकतांच गंधर्वपुत्रानें आपल्या मनाशीं विचार केला कीं, "ह्या क्रूर राक्षसाला सामोपचारानें सांगितलें असतां हा आपला हेका कधींही सोडणार नाहीं. तर युक्ति युक्तीनें आपलें कार्य करून घ्यावें हें बरें?" असा विचार करून तो म्हणालाः—हे राज श्रेष्टा, ह्या मनुष्याच्या हातून माझें एक मोठें महत्वाचें काम व्हावयाचें आहे म्हणूनच मी ह्याज बरोबर स्नेह संपादला आहे. आतां मनुष्य भक्षणकरण्याची जर तुमची इच्छा असेल तर ह्याच्या बद्दल मी दुसरे दहा मनुष्य तुम्हास आणून देतों.

गंधर्व पुत्राचें हें भाषण ऐकून **विकर्ण** म्हणालाः—तुझा व माझा स्नेह आहे सबब मी ही गोष्ट कबूल करितों. परंतु तूं दहा मनुष्य घेऊन येईपर्यंत मी ह्यास कधींही जावूं देणार नाहीं. गंधर्वपुत्र ह्मणालाः—ठीक आहे. आजपासून पांच दिवसांच्या आंत मी दहा मनुष्यें घेऊन येतों. परंतु तोंपर्यंत ह्यास तुह्मी प्रतिबधांत ठेवूं नका. त्यावर **विकर्ण** ह्मणालाः—तुझ्या मर्जीस वाटेल त्या प्रमाणें याच्या राहण्याची व्यवस्था कर; परंतु जेथें हा राहील तेथें फक्त मी आपल्या रखवालदारांचा पाहरा मात्र ठेवीन. नंतर उभयतांच्या सल्यानें शहराबाहेर जो **विकर्ण** राजाचा बाग

आहे त्यांतील मंदिरांत **हातिमास** ठेवण्याची योजना झाली, व गंधर्व दहा मनुष्यें घेऊन येई पर्यंत राक्षसराजाचे पहारेकरी **हातिमास** रक्षण करण्यास ठेवण्याचें ठरलें. या प्रमाणें व्यवस्था झाल्यावर गंधर्वपुत्र विमानारूढ होऊन सेवकांस ह्मणालाः—येथून थोड्या अंतरावर जें अरण्य आहे तेथें मला घेऊन चला.

आज्ञेप्रमाणें जवळच्याच एका अरण्यांत सेवकांनीं विमान उतरलें. नंतर गंधर्वपुत्र एका झाडाखालीं बसला आणि आतां पुढें काय तजवीज करावी याविषयीं विचार करूं लागला. प्रथमतः त्याला वाटलें कीं, **विकर्णानें** आपल्याला जो प्रतिबंध केला आहे तो **वीरसिंहास** जाऊन कळवावा ह्मणजे तो सर्व सेनेसहित येऊन राक्षसराजाची चांगली खोड मोडील. असा विचार त्याचे मनांत आला, परंतु थोडावेळ विचार केल्यावर मी **विकर्णाजवळ** दहा मनुष्यें घेऊन येण्याची जी मुदत केली आहे तितक्या मुदतींत हा सर्व खटाटोप उरकणार नाहीं; व एकदां मुदत टळल्यावर **हातिमाची** चटणी केल्याशिवाय **विकर्ण** कधींही राहावयाचा नाहीं. तरी ह्या ठिकाणींच राहून ज्यावेळीं **हातिमाचें** रक्षण करणारे पहारेकरी गाफल असतील त्यावेळीं गुप्तरीतीनें विमानासह बागेंत उतरून **हातिमास** घेऊन पळून जावें हें बरें. असा विचार करून समय–प्रतिक्षा करण्याकरितां विमानासह तेथून निघून ज्या बागेंत **हातिमास** ठेविलें होतें त्या बागेच्या आसपास तो गुप्त रीतीनें राहिला. नंतर त्या दिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास बागेचे सर्व दरवाजे बंद करून जेव्हां ते पहारेकरी स्वस्थ झोंपी गेले तेव्हां गंधर्वपुत्र सेवकांसह विमानांतून बागेंत उतरला आणि ज्या ठिकाणीं **हातीम** निजला होता त्या ठिकाणीं जाऊन निद्रिस्त स्थितींच त्यास विमानांत घालून तेथून पवनगतीनें निघून गेला. पुढें शेषरात्र मोठ्या झपाट्यानें क्रमिल्यावर उजडावयाच्या सुमारास एका निर्भय स्थळीं त्यांनीं मुक्काम केला.

इकडे उजाडल्यावर बागेचे दरवाजे जशाच्या तसेच लावलेले कायम आहेत असें पाहून पहारेकऱ्यांनीं **हातिमाची** चौकशी केली नाहीं. ह्याप्रमाणें चारी दिवस निघून गेल्यावर पांचव्या दिव-

शीं **विकर्ण**राजा कचेरींत बसला असतां त्याजला गंधर्वानें दिलेल्या वचनाची आठवण झाली. पुढें संध्याकाळ झाली तरी गंधर्व येत नाहीं असें पाहून राजानें आपल्या सेवकांस **हातिमास** बागेंतून घेऊन येण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें सेवकांनीं बागेंत जाऊन तेथील पहारेकऱ्यांस तें वर्तमान कळविलें. नंतर पहारेकरी बागेचे दरवाजे उघडून आंत गेले आणि **हातिमा**चा तपास करूं लागले; परंतु तो तेथें सांपडला नाहीं. तेव्हां निराश होऊन त्यांनीं राजाकडे सर्व हकीगत निवेदन केली. ती ऐकतांच **विकर्णा**स अतिशय क्रोध येऊन पहारेकऱ्यांस चाबकांनीं मारून अंधार कोठडींत कोंडून ठेवण्याचा त्यानें कोतवालास हुकूम केला. त्यावेळीं 'आम्ही **हातिमास** सोडून दिलें नाहीं' वगैरे मजकूर पहारेकऱ्यांनीं सांगितला. परंतु **विकर्णा**नें तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. इकडे **हातिमा**सह गंधर्वपुत्र विमानांत बसून चालला असतां कित्येक दिवसांनीं त्यांस **विकर्णा**चा एक सरदार भेटला. उभयतांची नजरानजर झाल्यावर सरदारास वाटलें कीं, आपल्या राजानें स्वसंतोषानें यांची मुक्तता केली नसेल? तस्मात् हे पळून आले असावेत. तरी यांस पकडून आपल्या राजाजवळ न्यावें हें बरें. असा विचार करून त्यानें विमान पकडलें. इतक्यांत गंधर्वपुत्रानें आपली तरवार उपसली, आणि त्या सरदाराचे दोन्ही हात कापून टाकले. त्यावेळीं तो सरदार दुःखानें अतिशय संतप्त होऊन म्हणालाः—हे गंधर्वपुत्रा, स्वामिकार्याकरितां मी झटत असतां तूं माझे दोन्हीं हात कापून टाकलेस याचें फळ तुला थोडक्याच दिवसांत मिळेल. आतां ही हकीगत मी आपल्या राजास जाऊन सांगतों. असें म्हणून तो तेथून निघून गेला; व गंधर्वपुत्रानें आपलें विमान चालू केलें.

पुढें जातां जातां कांहीं दिवसांनीं त्यांस एक राक्षस वस्तीचें मोठें भयंकर अरण्य लागलें. तेव्हां गंधर्वपुत्र **हातिमास** ह्मणालाः—या अरण्यांतून प्रवास करणें मोठें धोक्याचें आहे. कारण येथील राहिवासी राक्षसांचा आणि आमचा पूर्वापार मोठा द्वेष आहे. तरी आतां येथून आपला प्रवास कसा होईल याविषयीं मला फार काळजी पडली आहे. हें त्याचें भाषण ऐकून **हातिम** ह्मणालाः—मी

जर राक्षसांचें स्वरूप धारण केलें तर तूं मजबरोबर येशील काय?

गंधर्व म्हणालाः—मला आपणाबरोबर उघड रीतीनें येतां येणार नाहीं. तथापि दिवसास मी यानमार्गानें गमन करीन आणि रात्र झाली म्हणजे जेथें तुम्ही मुक्काम कराल तेथें वस्तीस येईन. इतकें बोलणें झाल्यावर **हातिमानें** विमान वाहकांस परत जावयास सांगितलें. त्याप्रमाणें उभयतांसही वंदन करून ते स्वस्थानाकडे निघून गेल्यावर **हातिमानें** थोडेसें पाणी आणून **राजहंस** पक्ष्यानें दिलेलीं पिसें त्यानें जाळून त्यांची राख त्या पाण्यांत मिश्रित केली व तें पाणी सर्वांगास चोळलें. त्याबरोबर **हातिमाचें** पूर्व स्वरूप बदलून तो अगदीं हुबेहुब राक्षसाप्रमाणें दिसूं लागला. हा अद्भुत चमत्कार पाहून गंधर्वपुत्रास अतिशय आश्चर्य वाटून तो म्हणालाः—हा विलक्षण प्रकार कशाच्या योगानें झाला? तें कृपा करून सांगा. हें ऐकून **हातिमानें राजहंस**पक्ष्याची सर्व हकीगत त्यास निवेदन केली. परंतु कदाचित् हा गंधर्वपुत्र आपला विश्वासघात करील या भीतीनें त्यानें मोत्याविषयींचें वर्तमान मात्र सांगितलें नाहीं. तेव्हां **हातिमाच्या** शहाणपणाविषयीं व चातुर्याविषयीं गंधर्वपुत्रास मोठें नवल वाटलें व आपली कार्यसिद्धि याचे हातून खास होईल असें वाटून त्यास मोठा आनंद झाला. नंतर ते उभयतांहीं ठरलेल्या बेताप्रमाणें प्रवास करूं लागले. पुढें राक्षसांच्या राज्यांतून **हातिम** जावूं लागला असतां त्यास कोणीही अडथळा केला नाहीं. कारण तेथील रहिवाशांस हा आपल्याच सारखा आहे असें वाटूं लागलें. ह्याप्रमाणें पुष्कळ दिवसपर्यंत ते उभयतांही प्रवास करीत असतां, एके दिवशीं रात्रीं **हातीम** ज्या ठिकाणीं, वस्तीस राहिला होता त्या ठिकाणीं गंधर्वपुत्र वस्तीकरितां आकाशांतून खालीं उतरला. तेव्हां एका राक्षसानें ह्या उभतांस पाहून ती बातमी आपल्या मित्रांस कळविली. ही बातमी ऐकतांच ते सर्व राक्षस ज्या ठिकाणीं **हातीम** वस्तीस राहिला होता तेथें आले; व गंधर्वपुत्रासह **हातिमास** पाहून त्या उभयतांस राजाकडे घेऊन जाण्याचा विचार करूं लागले. इतक्यांत गंधर्वपुत्र जागा झाल्यामुळें त्यास त्या रा-

क्षसांचा बेत समजला. तेव्हां त्यानें हातिमास जागें करून तो सर्व वृत्तांत कळविला.

नंतर हातीम त्या राक्षसांस म्हणालाः—आम्ही फार लांबचा प्रवास केल्यामुळें थकून निजलों असतां तुम्ही आमची झोंप मोडलीत हें चांगलें केलें नाहीं. राक्षस म्हणालेः—तुम्ही कोण ? व कोठून आलां ? हें ऐकून हातीम म्हणालाः—मी एक प्रवासी असून कोठून आलों व जायचें कोठें हें मला मुळींच समजत नाहीं. कारण गंधर्वराजाच्या वीरसिंह सेनापतीनें आमचा राजा जो शूर्पकर्ण यास यमलोकीं रवाना करून त्याच्या राजधानीस आग लावून दिल्यामुळें माझें घरदार जळून फस्त झालें; त्यामुळें मी भ्रमिष्टासारखा वाट सांपडेल तिकडे भटकत फिरत असतों. आतां आमच्या राजाची इतकी धुळधाणी उडविण्याचें कारण काय म्हणाल तर, वीरसिंहाच्या प्रीतींतला एक मनुष्य बरझाक शहरास जात होता; त्याला आमच्या राजानें कैद केल्यामुळें हा इतका प्रळय झाला. प्रस्तुत तो मनुष्य बरझाक शहाराकडेसच निघून गेला आहे. हातीमाचें हें भाषण ऐकून राक्षस ह्मणालेः—तुझ्या बरोबर जो हा दुसरा मनुष्य आहे तो कोण आहे ? हातीम ह्मणालाः—हा कर्मपुरीच्या राजाचा पुत्र आहे. तेव्हां राक्षस ह्मणालेः—असें जर आहे तर आह्मी तुह्मा दोघांसही अडथळा करीत नाहीं. कारण तूं आमचा स्वजातीयच आहेस, आणि तुझ्या मित्राचा बाप आमच्या राजाचा स्नेही आहे. आतां आम्ही त्या बरझाक शहराकडे गेलेल्या मनुष्याच्या तपासास जातों, तरी तुम्ही स्वस्थ झोंप घ्या. असें म्हणून ते सर्व राक्षस तेथून निघून गेले.

राक्षस निघून गेल्यावर हातीम गंधर्वपुत्रास म्हणालाः—आतां येथें राहून उपयोग नाहीं; कारण राक्षसांच्या बोलण्याचा नेम नसल्यामुळें कदाचित् आणखी एखादें संकट उद्भवेल. हें हातिमाचें बोलणें गंधर्वपुत्रास मान्य झाल्यामुळें ते दोघेही मार्गक्रमू लागले. पुढें जातां जातां कांहीं दिवसांनीं ते सप्तसागराच्या संगमाजवळ येऊन दाखल झाले. तेव्हां हातीम म्हणालाः—हा सागर ओलांडून जाणें मोठें कठीण. कारण येथें एकही नांव दृष्टीस पडत

नाहीं. गंधर्वपुत्र म्हणालाः— त्याविषयीं तुम्ही मुळींच काळजी करूं नका. कारण येथून पांच कोशांवर एक प्रदेश आहे. तेथें सागराचें उल्लंघन करणारे वारू मिळतात. तरी त्या ठिकाणीं जाऊन मी आपणा करितां दोन वारू घेऊन येतों. तरी मी येईपर्यंत आपण ह्या ठिकाणींच असावें. नंतर **हातिमानें** ती गोष्ट मान्य केल्यावर गंधर्वपुत्र तेथून निघाला आणि ज्या प्रदेशांत ते वारू मिळत होते तेथें जाऊन पोहोंचला. तेव्हां त्या प्रदेशाचा अधिपती जो '**सोमदत्त**' त्याची आणि गंधर्वपुत्राची मैत्री असल्यामुळें तो प्रथम त्याजकडे गेला. पुढें उभयतांचें क्षेमकुशल झाल्यावर गंधर्वपुत्र म्हणालाः— तुझ्या जवळ जे सागर उल्लंघन करून जाणारे वारू आहेत त्यापैकी जर तूं मला दोन देशील तर मी तुझे उपकार आजन्मपर्यंत विसरणार नाहीं. गंधर्वपुत्राचें हें भाषण ऐकून **सोमदत्तानें** तावडतोब त्यास आपल्या अश्वशाळेंत नेलें, आणि म्हणालाः—हे सर्व वारू तुझे आहेत; यास्तव तुझ्या मर्जीस वाटतील ते यांतून घेऊन जा. **सोमदत्ताचें** हें भाषण ऐकून गंधर्वपुत्रानें दोन चलाख वारू निवडून काढून व मित्राची रजा घेऊन तो **हातिमा**जवळ आला. नंतर ते उभयतांही वारूंवर स्वार होऊन नद्यांचें उल्लंघन करूं लागले. तेव्हां त्यांचा चालण्याचा वेग पाहून **हातिमास** परमेश्वराच्या अगाध लीलेचें मोठें आश्चर्य वाटलें. पुढें अर्धामार्ग प्रवास केल्यावर त्यास क्षुधेची व तृषेची अतिशय पीडा झाल्यामुळें तो अगदीं विव्हल झाला. ही त्याची स्थिति पाहून गंधर्व पुत्रानें एक फळ हातिमास खावयास देऊन सांगितलें कीं, या फळाचा थोडासा अंश जरी पोटांत गेला तरी क्षुधेचें व तृषेचें शांतवन होईल, इतकेंच नाहीं तर श्रम परिहार होऊन जिवास आराम वाटेल. हें ऐकून **हातिमानें** तें फळ खाल्लें; तेव्हां क्षुधेच्या व तृषेच्या पीडा नाश पावून प्रवास करण्यास त्यास पुष्कळ उमेद आली. पुढें सागरोल्लंघन केल्यावर जेव्हां ते दोघे जमीनीवर उतरले तेव्हां **हातीम** ह्मणालाः—आपण **बरझाक्** शहरच्या अगदीं नजीक आलों नाहींका ? गंधर्वपुत्र ह्मणालाः—छे ! छे ! ! **बरझाक्** शहरास जावयास अजून दहा दिवस प्रवास केला पाहिजे. असो, आतां या

ठिकाणी तुह्मी स्वस्थ बसा ह्मणजे येथून जवळच जें माझ्या पित्याचें राज्य आहे तेथें जाऊन मी आपली सेना बरोबर घेऊन येतों. हें ऐकून हातीम ह्मणालाः—तुझ्या मनांतून **बरझाक्** शहरच्या विरूपाक्ष राजाबरोबर युद्ध करावयाचें आहे काय ? गंधर्वपुत्र म्हणालाः---तसें नाहीं. परंतु मार्गांत आपणावर अनेक संकटें येतील त्यांचें निवारण करण्यास बरोबर सैन्य असावें हें बरें. पुढें **हातिमानें** ठीक आहे असें म्हटल्यावर चार दिवसांनीं परत येण्याची मुदत करून तो तेथून निघून गेला.

इकडे **हातीम** करमणुकीकरितां आसपासच्या प्रदेशांत सहल करीत असतां एक रमणीय बाग त्याच्या नजरेस पडला. त्या वेळीं बागेचा दरवाजा उघडा होता. ह्मणून तो आंत गेला त्या बागेंत आंबे, फणस, केळीं, नारिंगें, वगैरे फळें विपूल असल्यामुळें गंधर्वपुत्र येईपर्यंत **हातिमानें** तेथेंच राहण्याचा निश्चय केला. इकडे गंधर्वपुत्र पवनगतीनें आपल्या नगरांत जाऊन पोहोंचल्यावर तेथील लोकांनीं त्याच्या पित्यास पुत्र आल्याचें आनंदकारक वर्तमान कळविलें. तें ऐकतांच राजास अतिशय आनंद होऊन तो आपले परिचारक बरोबर घेऊन पुत्रास सामोरा गेला आणि त्यास मोठ्या सन्मानानें घेऊन राजवाड्यांत आला. नंतर तो म्हणालाः—हे माझ्या प्रियकर पुत्रा, 'मी **बरझाक्** शहरास जातों' असें सांगून जो येथून गेलास तो अद्याप पर्यंत कोठें होतास ? आह्मी तुझी पुष्कळ दिवस वाट पाहिली परंतु जेव्हां तूं आला नाहींस तेव्हां पुष्कळ ठिकाणीं शोध केला; तथापि कांहींच पत्ता न लागल्यामुळें विरह—व्यथेनें मी मोठा चिंताग्रस्त झालों आहें. असो, परंतु ज्या उद्देशानें तूं **बरझाक्** शहरास गेला होतास तें तुझें कार्य झालें काय ? पित्याचें हें भाषण ऐकून गंधर्वपुत्रच्या नेत्रांतून प्रेमाश्रु वाहूं लागले. नंतर कांहीं वेळानें तो ह्मणालाः—मी ज्यावेळीं येथून **बरझाक** शहरास गेलों त्यावेळीं आपला आशिर्वाद ग्रहण केला नव्हता. त्यामुळें माझा उद्देश सिद्धीस गेला नाहीं. अशी स्थिती झाल्यामुळें मी अनेक प्रकारचीं संकटें व दुःखें सोशीत भ्रमिष्टा सारखा वाट फुटेल तिकडे जाऊं लागलों. पुढें एका पर्वताच्या लहानशा शिख-

रावर शोक करीत बसलों असतां जगदीश कृपेनें त्याठिकाणीं एक परोपकारी मनुष्य आला. त्याला **बरझाक** शहरीं अंड्या एवढ्या मोत्याच्या प्राप्ती करतां जावयाचें होतें. पुढें जेव्हां त्यानें माझा शोक ऐकला तेव्हां परोपकार बुद्धीनें मजजवळ येऊन शोकाचें कारण विचारलें. त्यावेळीं मी सर्व हकीगत त्यास सांगितली. ती ऐकून तो म्हणालाः—तूं कोणत्याही प्रकारची काळजी न करितां स्वस्थ चित्तानें मजबरोबर चल. म्हणजे बरझाक् शहरच्या राजाच्या पणाप्रमाणें मी त्या मोत्याची पूर्वापार हकीगत सांगून तुझी इच्छा परिपूर्ण करीन.

पुत्राचें भाषण ऐकतांच राजा हांसून ह्मणालाः—सर्व गोष्टींत निपूण असे जे आम्हीं गंधर्व त्या आम्हांसही त्या मोत्याची पूर्वापार हकीगत माहीत नसून ती एक मनुष्य सांगणार व त्या योगानें तुझे हेतू पूर्ण होणार हें आश्चर्यच नव्हे काय? पित्याचें हें भाषण ऐकून गंधर्वपुत्र म्हणालाः—जो मनुष्य त्या मोत्याच्या प्राप्तीकरितां जात आहे तो सामान्य बुद्धीचा नसून सर्व शास्त्रें त्यास अवगत आहेत; त्यानें पृथ्वीपर्यटणाच्या योगानें अनेक प्रकारचें ज्ञान संपादिलें आहे; व भूत, भविष्य, वर्तमान समजविणारी जी **रमलविद्या** तीही त्याला पूर्ण अवगत आहे. यावरून तो कार्य सिद्धी करील अशी माझी पूर्ण खातरी आहे. हें ऐकतांच राजा म्हणालाः—इतका जर तो गुणवान् होता तर त्यास इकडे कां घेऊन आला नाहींस? गंधर्वपुत्र म्हणालाः—तो मार्गक्रमणाच्या योगानें अतिश्रांत झाल्यामुळें दोन दिवस विश्रांती घेण्या करितां एका ठिकाणीं राहिला आहे व **बरझाक्** शहरास जात असतां वाटेनें कोणत्याही प्रकारचें संकट येऊं नये सबब व ऐश्वर्यादाखल थोडीशी सेना समागमें असावी अशा हेतूनें ती नेण्याकारितां मी एथपर्यंत आलों आहें. पुत्राचें हें भाषण श्रवण करून राजानें थोडावेळ विचार केला. नंतर आपल्या मुख्य सेनाधिपतीस बोलावून आणवून पुत्राबरोबर सर्व सैन्यासह **बरझाक्** शहरास जाण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें सेनेची तयारी होतांच गंधर्वपुत्र पित्याची आज्ञा घेऊन कार्य–सिद्ध्यर्थ कुलदेवतेचें स्मरण करून निघाला.

पुढें ज्या ठिकाणीं **हातीम** राहिला होता तेथें आल्यावर त्यानीं **बरझाक्** शहरचा मार्ग—क्रमण्यास सुरवात केली. इकडे **बरझाक्** शहरच्या राजास दूतांनीं येऊन कळविलें कीं, आपल्या राज्य-सीमेंत अफाट सेना घेऊन कोणी गंधर्व आला आहे व त्याच्या स्वारीचा झोंक ह्या आपल्या शहराकडेसच आहे. दूतांचें हें बोलणें ऐकून राजानें अपार सेना सिद्ध केली आणि तो आपल्यावर चाल करून येणाऱ्या सैन्यास सामोरा गेला. पुढें उभयतांचीही सैन्यें मजल दरमजल करीत करीत जेव्हां एक मेकांच्या अगदीं नजीक आलीं तेव्हां गंधर्वपुत्रानें **बरझाक्** शहरच्या राजाची अपार सेना पाहून विपरीत प्रसंग न घडावा या हेतूनें आपला एक दूत **बर-झाक्**च्या राजाकडे पाठविला. त्याप्रमाणें दूतानें जाऊन राजास कळविलें कीं, **इमन** शहरचा राजपुत्र व त्याचा मित्र गंधर्वराजपुत्र हे दोघे आपली भेट घेण्याच्या इराद्यानें परिवारासह येत आहेत. दूताचें हें भाषण ऐकून राजानें सर्व सैन्यास जागच्याजागीं उभें केलें, आणि कांहीं निवडक लोक बरोबर घेऊन तो **हातिमास** सामोरा गेला. पुढें सर्वांच्याही भेटी झाल्यावर **विरूपाक्षराजानें** सर्व सैन्याची नीट रितीची व्यवस्था केली; नंतर **हातिमासह** ते शहरांत येऊन दाखल झाले.

पाहुण्यांचें यथायोग्य आदरातिथ्य केल्यावर दुसरे दिवशीं **वि-रूपाक्षराजानें हातिमास** व त्याच्या मित्रास दरबारांत बोलावून आणून येण्याचें कारण विचारलें. तेव्हां **हातीम हुस्नबानूची** व **मुनीरशहाची** सर्व हकीगत सांगून ह्मणालाः—आजपर्यंत मी तिच्या पांच प्रश्नांचा तर उलगडा केलाच. परंतु "**पाण्यांत राहणाऱ्या कोंबड्याच्या अंड्या एवढें मोतीं आणणें**" हा जो तिचा सहावा प्रश्न त्याचा उलगडा करण्याकरितां मी प्रस्तुत निघालों. पुढें तशा प्रकारचें मोतीं आपणाजवळ आहे; असें सम-जल्यावर ह्या ठिकाणीं आलों आहे; असें ह्मणून त्यानें आप ल्याजवळचा मोत्याचा नमुना त्याच्या पुढें ठेविला; तो पाहून **विरूपाक्षराजा** ह्मणालाः—तुह्मी हा जो नमुना दाखविलात त्या प्रमाणें एक मोतीं माझ्या जवळच आहे खरें, परंतु त्याच्या उत्पत्तीची

जो पुर्वापार हकीगत सांगेल त्यास आपलें कन्यारत्न अर्पण करून तें मोतीं आंदण देण्याचा माझा पण आहे. राजाचें हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—मला तुमच्या कन्येची मुळींच जरूरी नाहीं. फक्त त्या मोत्याच्याच आशेनें मी येथें आलों आहे. तेव्हां राजा ह्मणालाः—तुह्मी माझा पण सिद्धीस न्या. मग जर तुह्मांला माझ्या कन्येची जरूर नसेल तर तिची मनास वाटेल ती व्यवस्था करा. **विरूपाक्ष** राजाचें हें भाषण ऐकून **हातिमानें** मोत्याच्या उत्पतिविषयीं पूर्वापार हकीगत सांगितली. ती ऐकतांच **विरूपाक्ष** राजा उठून जामदारखान्यांत गेला आणि तें मोतीं आणून **हातिमा**पुढें ठेऊन ह्मणालाः—तुह्मी माझा पण पुरा केलात सबब हें मोतीं मी तुह्मास बक्षिस केलें आहें. आतां माझ्या कन्येची व्यवस्था आपण काय करतां ती सांगा. कारण माझ्या प्रतिज्ञेप्रमाणें ती आतां आपली ताबेदारीण झाली. राजाचें हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—हा जो माझा मित्र येथें बसला आहे तो तुमच्या कन्येच्या प्राप्ती करितां मागें एकवेळ येथें आला होता; हें आपणास माहीतही असेल. परंतु आपल्या पणाचें उत्तर देण्याचें याच्या अंगीं सामर्थ्य नसल्यामुळें निराश होऊन जावें लागलें. सदर्हू माझा मित्र गंधर्वराजपुत्र असून आपला जामात होण्यास योग्य आहे.

**हातिमाचें** हें भाषण **विरूपाक्ष** राजानें मान्य करूत ताबडतोब कुलोपाध्यायास बोलावून आणून तेथील रिवाजा प्रमाणें आपल्या कन्येचें गंधर्वपुत्राबरोबर लग्न लाविलें. पुढें चार दिवस लग्न सोहाळा झाल्यावर **हातीम** आपल्या मित्राजवळ जाण्यास रजा मागूं लागला. त्यावेळीं गंधर्वपुत्रानें मी आपला फारफार अभारी आहें असें दर्शवून **हातिमास** आणखीं कांहीं दिवस राहण्याचा आग्रह केला. परंतु **हातीम** जेव्हां ऐकेना तेव्हां **वीरसिंहाच्या** मुक्कामापर्यंत त्यास सुखरूप पोंहचविण्याची आपल्या निवडक सैन्यास आज्ञा करून त्यानें **हातिमाची** रवानगी केली. पुढें मजले मजलेनें मार्ग—क्रमण करीत असतां वाटेनें बऱ्याच राक्षसांनीं त्यांस उपद्रव दिला. परंतु **हातिमानें** युक्तिप्र-

युक्तीनें त्यांतून ही आपला बचाव केला. नंतर कांहीं दिवसांनीं **वीरसिंहाच्या** घरापर्यंत येऊन पोहोंचल्यावर **हातिमानें** सर्व सैन्यास परत जाण्यास आज्ञा दिली.

पुढें **वीरसिंहाची** भेट होतांच उभयतांस अतिशय आनंद झाला. नंतर एकसारख्या मेजवान्या व आनंदोत्सवाचे प्रकार सुरू होऊन दोन तीन दिवस गेल्यावर **हातिमानें शहाबादेस** जाण्याची इच्छा दर्शविली. तेव्हां **वीरसिंहानें हातिमास शहाबादेस** पोंचविण्याकरितां विमानाची योजना केली. नंतर उभयतांच्या प्रेम पूर्वक आलिंगनादि भेटी होऊन **हातीम** विमानांत बसला. पुढें थोडक्याच दिवसांत **शहाबादेस** पोंहोंचल्यावर **हातिमानें** सेवकांस विमान घेऊन परत जाण्याची आज्ञा केली आणि त्यानें शहरांत जाऊन **मुनीरशहाची** भेट घेतली. नंतर ते उभयतांही **हस्नबानूच्या** महालीं गेले. **हातिमास** सुखरूप आलेला पाहून **बानूस** अतिशय आनंद झाला. इतक्यांत भोजनाची सिद्धता झाल्याची वर्दी आल्यामुळें **बानूसह** सर्व मंडळी भोजनाकरितां पाकशाळेंत गेली. पुढें भोजनोत्तर **हातिमानें** तें आंड्या एवढें मोती **बानूपुढें** ठेऊन आपल्या प्रवासाची सर्व हकीगत निवेदन केली. ती ऐकतांच **हातिमाच्या** शूरपणाविषयीं **बानूस** फारच आश्चर्य वाटलें. नंतर थोड्यावेळानें **हातीम** सातवा प्रश्न विचारूं लागला असतां **बानू** ह्मणालीः—“ **हमाम बादगिर्दची खबर आणणें** ” हा माझा सातवा प्रश्न आहे. त्याचा सहा प्रश्नाप्रमाणें उलगडा करा ह्मणजे आपण सांगाल त्या प्रमाणें वागण्यास मी कबूल आहें. **बानूचें** हें भाषण ऐकून तिची रजा घेऊन ते उभयतांही धर्मशाळेंत आले. नंतर एकदोन दिवस विश्रांति घेऊन सातव्या प्रश्नाचें उत्तर लवकरच घेऊन येतों; असें सांगून **हातीम** मित्राची रजा घेऊन तेथून निघाला.

## प्रश्न ६ वा समाप्त.

---

# प्रश्न सातवा.

## " हमाम बादगिर्दची खबर आण. "



शहाबादेहून सातव्या प्रश्नाचा उलगडा करण्याकरितां हातीम निघाला तो वनोपवनें प्रवास करीत करीत एका शहरा जवळ आला. त्या शहराच्या वेशी नजीक असलेल्या विहिरीवर गांवांतील पुष्कळ लोकांचा जमाव पाहून तो तेथें गेला, आणि त्या जमलेल्या लोकांस 'येथें काय आहे?' असें विचारूं लागला. तेव्हां एक मनुष्य म्हणालाः—आमच्या गांवातील एका वैद्याचा मुलगा आज पुष्कळ दिवसांपासून अगदीं भ्रमिष्टा सारखा झाला असून त्या स्थितींत ह्या विहिरीवर तो नित्य येऊन बसत असे. त्याचा बाप वैद्यक्रियेंत चांगला निष्णात असल्यामुळें त्यानें पुष्कळ उपाय केले; परंतु त्या मुलाला मुळींच गुण आला नाहीं. पुढें आज दोन दिवसांच्या मागें त्यानें ह्या विहिरींत उडी टाकली. तेव्हां त्याला वर काढण्याकरितां आमच्या कित्येक लोकांनीं पुष्कळ प्रयत्न केला; परंतु तो किंवा त्याचें प्रेत अजूनपर्यंत आम्हांस सांपडलें नाहीं. इतकें त्या उभयतांचें बोलणें होत आहे तोंच त्या मुलाचे आई बाप मोठा आक्रोश करीत त्या ठिकाणीं आले. तेव्हां त्यांची दुःखद स्थिति पाहून हातिमास अतिशय वाईट वाटलें. नंतर तो त्यांजवळ जाऊन म्हणालाः—तुमच्या पुत्राचा शोध पुष्कळ लोकांनीं केला, तथापि ज्या अर्थीं त्यांस तो किंवा त्याचें प्रेत सांपडलें नाहीं; त्या अर्थीं त्याची व तुमची पुनः भेट होईल असें मला वाटतें; तरी शोकाचा—त्याग करून मी येईपर्यंत तुम्हीं ह्या ठिकाणीं बसा. वैद्यानें तें कबूल केल्यावर हातिमानें ताबडतोब विहिरींत उडी मारली; तेव्हां थोडक्याच वेळानें आपले पाय जमिनीला लागले असें त्यास वाटलें. नंतर तो डोळे उघडून पाहतो तों त्या ठिकाणीं विहिर किंवा पाणी वगैरे कांहींच नसून आपण एका मोकळ्या जमिनीवर उभे आहों असें त्यास वाटलें. मग तो थोडासा आश्चर्यभरित होऊन मार्ग—क्रमीत असतां कांहीं वेळानें एका बागेजवळ येऊन पो-

पोंहोंचला. त्या वेळीं बागेचा दरवाजा उघडा होता; म्हणून **हातीम** आंत गेला. पुढें बागेची अनुपम शोभा पहात पहात चालला असतां तो एका रत्नखचित महालाजवळ आला. तेव्हां पर-स्थानीं तेथील मालकाच्या परवानगी शिवाय आंत कसा प्रवेश करावा ? या बद्दलचा विचार न करितां बेधडक तो त्या महालांतील मुख्य दिवाणखान्यापर्यंत गेला. त्या ठिकाणीं भरजरीचे गालिचे आंथरले असून हंड्या, झुंबरें, वगैरे दीप प्रज्वलित केले होते. खिडक्यांस वाळ्याचे पडदे सोडले होते. मध्यभागीं दोन रत्न-खचित **सिंहासनें** मांडलेलीं असून एकावर रतीसही लाजविणारी अशी देदिप्यमान स्त्री व दुसऱ्यावर तिच्या स्वरूपास कांहींसा शोभणारा असा एक पुरुष बसला होता. सभोंवतीं स्वामि कार्यास उत्सुक अशा कितीएक रम्यारामा उभ्या असून नृत्य व गायनकलाभिज्ञ अशा वारांगना, **सिंहासनावर** विराजमान झालेल्या तरुणी तरुणांचें मन रंजवीत होत्या.

हा असा रमणीय प्रकार होत असलेल्या ठिकाणीं **हातीम** जाऊन पोंहोंचतांच ती तरुणी आपल्या प्रियकरास ह्मणालीः—हा मनुष्य आपला कोणी जातभाई दिसतो, तर त्याजवळ आपल्या मनांतून दोन शब्द बोलण्याचे असल्यास मी त्यास आंत बोलावतें. प्रियेचें हे शब्द ऐकून तरुणानें आपली संमति दर्शविल्याबरोबर तिनें एका दासीस **हातिमास** आंत घेऊन येण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें तो आंत येतांच त्या तरुणीनें त्यास एका **सिंहासनावर** बसावयास सांगितलें. पुढें कांहीं वेळ गेल्यावर जेव्हां नृत्यगायन बंद झाले; तेव्हां ती तरुणी **हातिमास** ह्मणालीः—आपण कोठें राहतां ? व ह्याठिकाणीं कोणत्या उद्देशानें आलां आहां? **हातीम** ह्मणालाः— मी **इमनदेशाचा** राहणारा असून **हमामबादगिर्दची** खबर आणण्या करितां जात आहें. परंतु वाटेनें एका शहरीं आल्यावर तेथील गांवकरी शहरच्या वेशीजवळ असलेल्या विहिरीवर मोठा आक्रोश करीत असलेले माझ्या नजरेस पडले. ह्यावरून तेथें जाऊन मी तपास केला. तेव्हां त्या शहरांतील एका वैद्याच्या मुलानें भ्रमिष्टपणांत त्या विहिरींत उडी टाकिली असून

पुष्कळ पाणबुड्यांनीं शोध केला तरी त्याचा पत्ता लागत नाहीं असें मला समजलें. इतक्यांत त्या मुलाचे आईबाप मोठा आक्रोश करीत त्या ठिकाणीं आले. त्यांचा तो पुत्रविरहशोक पाहून मला अतिशय वाईट वाटलें ह्मणून मी शोध करण्याच्या इच्छेनें त्या विहिरींत उडी मारली तों ह्या ठिकाणीं येऊन पोंहोंचलों.

**हातिमाचें** हे भाषण ऐकतांच तो तरुण ह्मणालाः—आपण ज्या मनुष्याचा शोध करण्याकरितां आलां आहां तो मी आहें. आतां कोणत्या उद्देशानें मी येथें आलों तें सांगतों ऐकाः—**महाराज**, ज्या विहिरींत आपण उडी मारून ह्या ठिकाणीं आलांत, त्या विहिरीच्या काठीं एके दिवशीं मी बसलों असतां इंद्राच्या अप्सरांस लज्जित करणारी अशी ही माझ्या सान्निध बसलेली चारुगात्रा, त्या विहिरींतून बाहेर आली. त्यावेळीं तिचें रूप पाहतांच कामज्वराचा पूर्ण पगडा बसल्यामुळें मी अगदीं भ्रमिष्टा सारखा झालों. पुढें नित्य मी त्या विहिरीवर येऊन बसावें व ह्या सुंदरीनें आपल्या नेत्रकटाक्षानें माझें अंतःकरण विद्ध करण्याकरितां प्रत्यहीं विहिरींतून बाहेर यावें. असा आमचा उभयतांचाही क्रम चालला असतां एके दिवशीं मी हिच्या मागून विहिरींत उडी मारली. त्या बरोबर ह्या ठिकाणीं येऊन पोहोंचलों. पुढें आमचा दोघांचा गंधर्वविवाह लागल्यामुळें स्वर्गसुखाप्रमाणें अमोल्यसुख मी प्रस्तुत अनुभवीत आहें. हें त्याचें भाषण ऐकून **हातीम** म्हणालाः—आपल्या आईबापांस व इष्ट मित्रांस शोकसागरांत लोटून देऊन रूपसंपन्न पत्नी प्राप्त झाली म्हणून कृतकृत्य झालों असें मानणें हें सुज्ञ मनुष्यास उचित नाहीं. हें ऐकून तरुण म्हणालाः—तुम्ही म्हणतां ही सर्व गोष्ट खरी. परंतु जर ही प्राणप्रिया परवानगी देईल तर मी एकवेळ आपल्या आई बापांस व इष्टमित्रांस भेटून परत येईन. नंतर **हातीम** त्या लोकोत्तर सौंदर्यवान स्त्रीस ह्मणालाः—तुमच्या कृपादृष्टीनें हा तरूण सुखी झाला खरा; परंतु पुत्र–विरहानें शोकाकुल झालेल्या ह्याच्या आईबापांस मात्र तुह्मीं दुःख दिलेंत. आतां त्यांना भेटून परत येण्याची जर तुह्मीं यास आज्ञा द्याल, तर मजवर मोठे उपकार होतील. **हातिमाचें** हें भाषण संपतांच

ती स्त्री ह्मणाली:—प्रथमतः हा जेव्हां मजबरोबर आला, तेव्हां मी होऊन ह्यास बोलावलें नव्हतें, तर त्यावेळीं जसा हा स्वसंतोषानें येथें आला तसाच आतांही येथून जाण्यास तो मुखत्यार आहे. हें तिचें भाषण ऐकतांच तरुण ह्मणाला:—प्रिये, मी आतां घरीं जातों. परंतु माझी विस्मृति न होऊं देतां वारंवार तूं माझी भेट घ्यावीस हें माझें तुजजवळ मागणें आहे.

तरुणाच्या ह्या बोलण्यावर ती स्त्री काय उत्तर देते हें ऐकण्याकडे **हातिमा**चें अगदीं लक्ष्य लागून गेलें होतें. इतक्यांत ती स्त्री गंभीर वाणीनें ह्मणाली:—पुरुषजातीसारखी आशाळभूत जात दुसरी कोणतीच नाहीं. कारण गंधर्व आणि मानव यांचा संबंध घडणें दुरापास्त असतां केवळ परोपकार बुद्धीनें मी ह्याचे मनोरथ पूर्ण केले ही गोष्ट विसरून हा वेडापीर नेहमीं मला आपल्या घरीं बोलावतो याला काय ह्मणावें? हें तिचें क्रोधयुक्त भाषण ऐकून **हातीम** ह्मणाला:—हे स्त्रिये, गंधर्वांच्या बहुतेक राज्यांत मी फिरलों असून मानवांबरोबर त्यांचा संबंध असल्याचीं उदाहरणें मी पुष्कळ पाहिलीं आहेत. इतकेंच नाहीं, तर ह्या गोष्टीचा मला स्वतःलाही अनुभव आहे. गंधर्वस्त्री ह्मणाली:—तुह्मी ह्मणतां ही गोष्ट खरी. परंतु हा जो संबंध आहे तो खऱ्या प्रीति वांचून होत नाहीं. आपल्या प्रियेच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच तो तरुण मोठ्या आवेशानें ह्मणाला:—मी स्वगृहाचा, मातापितरांचा व इष्टमित्रांचा त्याग करून तुझ्या बरोबर जी विहिरींत उडी टाकली ती खरी प्रीति असल्यावांचून कीं काय? आतां जर तुला खऱ्या प्रीतीची परीक्षा पाहावयाची असेल तर खुशाल पहा. तरुणाचें हें भाषण ऐकून गंधर्वस्त्रीनें आपल्या सेवकांस एका मोठ्या कढईत तूप घालून तें तापविण्यास सांगितलें. त्याप्रमाणें सेवकांनीं तूप तापविल्यावर गंधर्वस्त्री आपल्या प्रियकरास ह्मणाली:—जर तुझी माझ्यावर अंतःकरणपूर्वक प्रीति असेल तर ह्या तप्त घृतकटाहांत उडी टाक. आपल्या प्रियकरणीचे हे शब्द ऐकतांच तो तरूण कंबर बांधून परमेश्वराचें नांव घेऊन त्या कढईत उडी टाकण्यास सिद्ध झाला. व आतां उडी टाकणार इतक्यांत गंधर्वस्त्री त्याचा हात धरून

ह्मणाली:—प्रियकरा, माझ्या विषयीं तुझ्या मनांत खरी प्रीति आहे यांत बिलकुल संशय नाहीं. आतां तूं निःसंशय आपल्या घरीं जा, व तुझ्या इच्छेप्रमाणें प्रत्यहीं मी तुजकडे येऊन तुझे मनोरथ पूर्ण करीन. असें ह्मणून तिनें **हातिमास** व आपल्या प्रियकरास बाह्यप्रदेशीं नेऊन सोडण्याची आपल्या सेवकांस आज्ञा केली. त्या प्रमाणें सेवकांनीं त्या उभयतांस तेथें नेऊन पोहोंचविलें.

इकडे त्या तरुणाचा बाप व इतर मंडळी **हातिमा**च्या येण्याची वाट पहात बसली असतां उभयतांस विहिरींतून येतांना पाहून त्यांस अतिशय आनंद होऊन पुत्र भेट केल्याबद्दल त्यांनीं **हातिमा**चे अतिशय उपकार मानिले. नंतर ती सर्व मंडळी गावांत गेली. तेव्हां **हातिमा**ची परोपकार कीर्ति सर्व शहरभर पसरल्यामुळें मोठमोठे लोक त्याची भेट घेण्यास येऊं लागले. पुढें एक दोन दिवस गेल्यावर गंधर्वस्त्री आपल्या वचनाप्रमाणें प्रियकाराची भेट घेण्यास येत असते असें पाहून **हातीम** सर्वांची रजा घेऊन कार्यसिध्यर्थ मार्ग—क्रमण करूं लागला. जातां जातां कांहीं दिवसांनीं तो एका शहराजवळ येऊन पोहोंचला. इतक्यांत एक वृद्ध **फकीर** भेटल्यामुळें त्यानें त्यास सलाम केला. तेव्हां **फकीरानें** आशीर्वाद देऊन 'कोठून आलास? व जायचें कोठें?' वगैरे प्रश्न केले. नंतर **हातिमानें** आपली सर्व हकीगत विदित करतांच **फकीर** ह्मणाला:—बेटा, येथून थोड्या अंतरावर माझा मठ आहे तेथें चल व आजची रात्र त्या ठिकाणींच वसतीस रहा. **हातिमानें** हें **फकीराचें** भाषण मान्य केल्यावर ते उभयतांही थोडक्याच वेळानें मठांत येऊन पोहोंचले. नंतर **फकिरानें** ईशस्तवन केलें; त्या बरोबर षड्रस अन्नानें परिपूरित अशीं दोन ताटें तेथें उत्पन्न झालीं. त्यांचा उभयतांनींही उपभोग घेतल्यावर **फकीर हातिमास** ह्मणाला:—तूं जो **हमामबादगिर्द** पर्वताकडे जाण्याचा बेत केला आहेस तो सोडून दे. कारण आजपर्यंत तिकडे जितके लोक गेले त्या पैकीं एकही मनुष्य परत आला नाहीं, सबब तूं आपला अमोलिक प्राण व्यर्थ धोक्यांत घालूं नकोस.

**फकिराचें** हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणाला:—**हमामबादगिर्दा**-

कडे जाणें जरी भयप्रद आहे तरी परमेश्वरावर भरंवसा ठेवला असतां अनेक संकटांतून तो आपलें संरक्षण करील. आज पर्यंत जो मी प्रवास केला तो परमेश्वरावर भरंवसा ठेवल्यामुळें निर्भय रीतीनें तडीस गेला. त्या प्रमाणें हाही माझा प्रवास सुखरूप होणार नाहीं ह्मणून कशावरून? **फकीर** ह्मणालाः—तूं ह्मणतोस ही गोष्ट जरी सर्वथैव खरी आहे तरी **हमामबादागिर्द** पर्वतावर जें **इंद्रजाल** आहे त्याची माहिती नसल्यामुळें माझें ह्मणणें न ऐकतां जर तूं आपलाच हेका चालविशील तर जसा बेडूक आपला हेका चालवून शेवटीं पश्चात्तापाला पात्र झाला, त्या प्रमाणें तूंही होशील. **फकिराचें** हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—आपला हेका चालविल्यामुळें बेडकास कां पश्चाताप करावा लागला हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां **फकीर** ह्मणालाः—पूर्वीं एका तलावांत पुष्कळ बेडूक सुखानें राहत असतां त्यांतील एकास तें ठिकाण सोडून दुसऱ्या ठिकाणीं जाऊन राहण्याची इच्छा झाल्यामुळें त्यानें तो आपला बेत तिखटमीठ लावून दुसऱ्या बेडकांस सांगून ह्मणालाः—प्रवास केल्याशिवाय ठिकठिकाणच्या अनेक गोष्टींचें ज्ञान होत नाहीं; हें ऐकून इतर बेडूक त्याचा उपहास करून ह्मणालेः—ही मूर्खासारखी बडबड तूं आमच्या जवळ करूं नकोस. कारण हा जो तुझा विचार आहे तो ऐकला तर तुझ्या संगतीनें एखादेवेळेस आमचे प्राण धोक्यांत पडतील. यास्तव आमचें तुला सांगणें आहें कीं, हा जो प्राणघातक विचार तूं मनांत आणला आहेस तो सोडून देऊन प्राप्त असलेल्या सुखांत आयुष्याचा विनियोग करावास हें बरें. इतकें जरी त्या बेडकानीं सांगितलें तरी आपला हेतु न सोडतां तो बेडूक सहकुटुंब तेथून निघाला. वाटेनें आपल्या जुन्या ठिकाणच्या मंडळीची अतिशय निंदा करून नव्या ठिकाणच्या सौख्या विषयीं तो फुशारक्या मारूं लागला. पुढें कांहीं वेळानें एका तलावाजवळ येऊन पोंहोंचल्यावर तो आंत प्रवेश करणार इतक्यांत एका सर्पानें फुत्कार केला. हा सर्प त्या तलावांत पुष्कळ दिवसांपूर्वीं येऊन राहिला होता व त्या तलावांतील सर्व बेडूक त्यानें खाऊन टाकले होते. पुढें सर्व सामुग्री संपल्यामुळें

तो बरेच दिवस उपोषित असतां ह्या नव्या बेडकोबास सहकुटुंब येतांना पाहून त्यानें त्यांजवर झडप घातली व एकामागें एक तो आपल्या तोंडांत टाकीत सुटला.

आपल्या कुटुंबावर गुदरलेलें हें अरिष्ट पाहून बेडकानें चपळाई करून तळ्यांत उडी मारली व चिखलांत जाऊन लपून बसला. नंतर सवड पाहून सर्पाची नजर चुकवून तो आपल्या पूर्वस्थळीं येऊन पोहोंचला. त्यास एकटाच येतांना पाहून त्याचे पूर्वीचे मित्र कुटुंबाविषयीं चौकशी करूं लागले. हें पाहून तो बेडूक स्फुंदस्फुंदून रडूं लागला. तेव्हां कोणातरी दुष्ट प्राण्यानें ह्याच्या कुटुंबास यमसदनीं पाठविलें असेल अशी सर्वांनीं कल्पना केली व त्या बेडकास अर्धमेला करून आपल्या मंडळींतून हांकून लाविलें. इतकी गोष्ट सांगून **फकीर** ह्मणालाः—माझें सांगणें न जुमानतां आपलाच हट्ट चालवशील तर बेडकाप्रमाणें फशीं पडशील. हातीम ह्मणालाः— मी जे परोपकाराकरितां आजपर्यंत इतके श्रम सोसले आहेत त्या सर्वांवर पाणी पाडून केवळ भीतिस्तव माघार घेतली असतां वचनभंगाचें पातक लागून शिवाय जनांत अपकीर्तिही होईल. तस्मात् **हमामबादागिर्दाकडे** जाण्याचा जर आपणांस मार्ग माहीत असला तर कृपाकरून तो मला दाखवा. **हातीमाचें** हें निग्रहाचें भाषण ऐकून **फकिरानें** दुसरे दिवशीं त्यास बरोबर घेतलें आणि दोन रस्ते फुटलेल्या स्थळीं येऊन तो ह्मणालाः—आतां तूं उजव्या हाताच्या रस्त्यानें जा ह्मणजे मोठमोठीं शहरें व गांवें ह्यांजवरून तूं एका अतिउंच पर्वताजवळ जाऊन पोहोंचशील. ह्या पर्वतावर जीं भीतिप्रद ठिकाणें आहेत त्यांतून ईश्वरसत्तेनें पार पडल्यावर दोन रस्ते फुटलेल्या एका स्थळीं जाशील. तेथें गेल्यावर डाव्या बाजूच्या रस्त्यानें तूं जा. कारण उजवे हाताचा रस्ता जरी नजीकचा आहे तरी त्यांत भयें फार आहेत. यास्तव जरी फेरा पडला तरी डाव्या हाताच्या रस्त्यानें जा. **फकिराचें** हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः—ब्रह्मदेवानें प्राणिमात्राच्या ललाटीं जें आयुष्य लेखन केलें आहे तें पूर्ण झाल्याशिवाय प्रत्यक्ष यमाच्यानेंही विपरीत प्रकार करवत नाहीं; मग इतरांची ती काय कथा? ह्या क-

रितां जवळच्या रस्त्यानें न जातां लांबच्या रस्त्यानें जा हें आपलें सांगणें थोडेसें चमत्कारिक नव्हे काय? **फकीर** ह्मणालाः—मी जो तुला उपदेश केला आहे त्याप्रमाणें वागशील तर त्यांत तुझें हित आहे. नाहीं पेक्षां मर्जीस येईल त्याप्रमाणें कर. हे **फकिराचे** शब्द ऐकून **हातिमानें** त्यास सलाम केला व कार्य सिद्धयर्थ मार्ग क्रमण्यास सुरवात केली.

पुढें कांहीं दिवसांनीं तो एका शहराजवळ येऊन पोहोंचला असतां अनेक प्रकारच्या वाद्यांचा गजर त्याच्या कांनीं आला. तेव्हां 'शहरवासी लोकांचा एखादा मोठा सण असेल असें समजून' **हातीम** मोठ्या आनंदानें चालला असतां शहरानजीक एका मोठ्या मैदानांत टोलेजंग मंडप घातला असून सुंदर बैठकी घालून रत्नदीप प्रज्वलित केले आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या रमणीय स्थलीं हजारो लोक जमले असून रतीसही लज्जित करणाऱ्या अशा रम्या रामा नृत्य गायन करीत आहेत व पलीकडच्या बाजूस पाकनिष्पत्ति करण्याची मोठी धांदल उडाली आहे असें पाहून **हातिमानें** या धामधुमीचें कारण तेथील एका मनुष्यास विचारलें. तेव्हां तो मनुष्य ह्मणालाः—या शहरांत दरवर्षी एक **भुजंग** मनुष्यरूपानें येत असतो. तो आला ह्मणजे आह्मी शहरांतील सर्व लहान लहान मुलगे त्याजसमोर उभे करितों. नंतर त्याच्या मर्जीस वाटेल तो मुलगा त्यानें मागितला असतां आह्मास तो मुकाट्यानें द्यावा लागतो. आज त्याचा येण्याचा दिवस आहे; ह्मणून मंडप घालून हा समारंभ केला आहे. आतां आमचे सर्वांचें चेहेरे जरी आनंदी दिसत आहेत तरी अंतर्याम तिळतिळ तुटत आहे. कारण तो सर्प कोणत्या अर्भकावर धाड घालील याचा नेम नाहीं.

ही त्या मनुष्याच्या तोंडची हृदय-भेदक हकीगत ऐकून **हातीम** ह्मणालाः—तुह्मी बेफिकिर असा. मी त्यास आज ठार मारून तुमच्यावरचे भयंकर अरिष्ट टाळतों. परंतु प्रसंग पडल्यास तुह्मी मदत करण्यास तयार असा ह्मणजे झालें. **हातिमाचें** हें भाषण त्यानें आपल्या राजास कळविलें. तेव्हां त्यास अति-

शय आनंद होऊन त्यानें **हातिमास** राजवाड्यांत घेऊन येण्याची सेवकांस आज्ञा केली. पुढें आज्ञेप्रमाणें **हातिमास** राजवाड्यांत आणतांच राजा मोठ्या प्रेमानें **हातिमास** सामोरा गेला व त्यास मानमरातबेनें आणून आपल्या **सिंहासना**शेजारीं बसविलें. नंतर कांहींवेळ कुशल विचारल्यावर राजा ह्मणाला:—**महाराज**, आपण ह्या शहरांतील एका मनुष्याजवळ बोलल्याप्रमाणें जर आमच्यावरचें महाभयंकर अरिष्ट टाळाल तर मी व सर्व शहरवासी लोक आपले फार फार आभारी होऊं. **हातीम** ह्मणाला:—ज्या वेळेस तुमच्याजवळ तो **भुजंग** मुलगा मागेल तेव्हां तुह्मी निर्धास्तरीतीनें सांगा कीं, आमच्या सार्वभौम राजाचा पुत्र येथें आला आहे, त्याची परवानगी घेतल्याशिवाय आमच्यानें मुलास देववत नाहीं. राजानें **हातिमा**च्या सांगण्याप्रमाणें वागण्याचें कबूल केलें. इतक्यांत **सर्प** आल्याची वर्दी सेवकानें आणल्यावरून **हातिमासह** सर्व मंडळी त्यास पहावयास गेली.

नंतर तो **सर्प** त्या सुशोभित मंडपाजवळ आला तेव्हां **हातीम** मोठ्या उत्कंठेनें त्याजकडे पाहूं लागला. तो त्याचें तें चित्रविचित्र रंगाचें स्वरूप व अवाढव्य शरीर पाहून हा कोणीतरी राक्षस असून त्यानें हें **सर्परूप** धारण केलें असावें अशी **हातिमानें** कल्पना केली. इतक्यांत त्या **सर्पानें** आपल्या आंगाला आळेपिळे देऊन मानवरूप धारण केलें. तेव्हां राजानें त्यास मोठ्या सन्मानानें **सिंहासनावर** बसविलें आणि आपण हात जोडून उभा राहिला. पुढें थोड्यावेळानें भोजनाची सर्व सिद्धता झाल्यावर त्या वेषधारी राक्षसासह शहरवासी सर्व लोकांनीं भोजन केलें. भोजनोत्तर पानगुलाब होत असतां तेथील राजास त्या राक्षसानें शहरांतील सर्व मुलें आपल्या समोर आणून हजर करण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें राजानें सर्व मुलें आणून हजर करितांच सर्वांस निरखून पाहून त्यानें राज—पुत्रास पसंत केलें. तेव्हां राजा हात जोडून ह्मणाला:- **महाराज**, ह्या शहरीं आमच्या सार्वभौम राजाचा पुत्र आला आहे. सबब त्याच्या परवानगी शिवाय माझ्यानें या मुलास आपल्या स्वाधीन करवणार नाहीं. राजाचें हें भाषण ऐकतांच तो

वेषधारी राक्षस रागावून ह्मणालाः—तुझ्या सार्वभौम राजाचा जो पुत्र येथें आला आहे त्याला माझ्या समोर लवकर घेऊन ये. तेव्हां राजानें **हातिमास** आणवून त्याजसमोर उभें केलें. त्यास पाहतांच राक्षस ह्मणालाः—हे **इमन**च्या परोपकारी राजपुत्रा, तूं आपल्या शीलाप्रमाणें ह्या लोकांस साह्य झालास काय? असो, तुझी माझी पूर्वींची ओळख असून तुझ्या गुणांची कीर्ति ऐकली आहे; ह्मणून मी तुला एकवेळ सोडून देतों. त्यावर **हातीम** ह्मणालाः—**महाराज**, राजपुत्रास नेण्याविषयीं मी बिलकुल प्रतिबंध करीत नाहीं. परंतु जें करणें तें पूर्वापार चालत आलेल्या चाली प्रमाणें केलें पाहिजे. राक्षसानें "ती कोणती चाल" असें विचारल्यावरून **हातीम** ह्मणालाः—आमच्या जवळ एक मोतीं आहे; तें कांहीं वेळ पाण्यांत ठेवून नंतर तें पाणी तुमच्या सारख्या मुलें घेऊन जाणाऱ्या मनुष्यास प्यावयास द्यावयाचें ही आमची पहिली चाल. राक्षसानें त्या चाली प्रणाणें वागण्याचें तात्काळ कबूल केल्यावरून **हातिमानें** एक पाण्यानें भरलेलें भांडें आणविलें व त्यांत **आस्वलकन्येनें** दिलेलें मोतीं कांहीं वेळ ठेवून तें पाणी त्या राक्षसास प्यावयास दिलें. तें पाणी प्याल्याबरोबर त्या **महाराक्षसा**ची सर्व शक्ति नाहींशी होऊन तो अगदीं निर्बल झाला. तेव्हां **हातीम** ह्मणालाः—आह्मी तुह्माला एका मोठ्या पेटींत कांहीं वेळ बसवितों व ती पेटी बंद करून आमचा जो कुळाचार आहे तो उरकून घेतों. नंतर जेव्हां आह्मी तुह्मास हांक मारूं तेव्हां पेटींतून बाहेर येऊन आपला इच्छित पुत्र बेधडक घेऊन जा. राक्षसानें मायावी विद्येच्या बळावर **हातिमाचें** ह्मणणें तात्रडतोब मान्य केलें. तेव्हां **हातिमानें** राजाकडून एक मोठी मजबूत पेटी आणवून त्यांत राक्षसास बसावयास सांगितलें. त्याप्रमाणें तो बसल्यावर **हातिमानें** ती तात्रडतोब बंद केली, आणि राज सेवकांकडून त्या पेटी सभोंवती ज्वालाग्राही पदार्थांचा मोठा ढीग करून त्यास अग्नि लावून दिला.

पुढें अग्नीच्या ज्वाला लागतांच राक्षसानें बाहेर निघण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु अद्भुत गुणकारी मोत्यानें त्याचें सामर्थ्य

पूर्वीच हरण केल्यामुळें निरुपायास्तव यमलोकाचा रस्ता धरणें त्यास भाग पडलें.

**हातिमाचें** हें विलक्षण कौशल्य पाहून राजासह सर्व मंडळी त्याच्या पायांवर गडबडा लोळूं लागली. नंतर मोठ्या सन्मानानें शहरांत नेल्यावर उपकार परिपूरणार्थ प्रत्येक शहरवासी मनुष्य यथाशक्ति जवाहीर आणून **हातिमास** देऊं लागला; तेव्हां प्रथम तें घेण्याचें त्यानें नाकारलें. परंतु सर्वांचा अति आग्रह झाल्यामुळें **हातिमानें** त्या सर्व द्रव्याचा स्वीकार करून नंतर तें गरीबगुरिबांस वांटून टाकलें. पुढें दोन तीन दिवस पाहुणचार भोगून **हातीम** शहरवासी सर्व लोकांची आज्ञा घेऊन निघाला. जातां जातां कांहीं दिवसांनीं **फकिरानें** सांगितल्याप्रमाणें पर्वत उल्लंघन करून दोन रस्ते एका ठिकाणाहून फुटणाऱ्या स्थलीं येऊन पोहोंचला. यावेळीं **फकिराच्या** सांगण्याप्रमाणें लांबच्या पण निर्भय रस्त्यानें जाण्याचा **हातिमाचा** विचार होता. परंतु विस्मरणाच्या योगानें नजीकच्या व भयकारक रस्त्यानें तो जाऊं लागला. पुढें एक दोन दिवस गेल्यावर त्यास एक भयंकर अरण्य लागलें. त्यांत इतकीं कांटेरीझाडें होतीं कीं, एक पाऊल टाकण्यास सुद्धां फारच पंचाईत पडत असे. तेव्हां '**फकिरानें** सांगितलेला नजीकचा व भयकारक रस्ता हाच असावा' असें वाटून त्यास थोडासा पश्चाताप झाला. पुढें महाप्रयासानें तें अरण्य क्रमिल्यावर तो एका मोठ्या मैदानांत आला. त्या मैदानांत अक्राळ विक्राळ स्वरूपाचीं हजारों जनावरें इकडून तिकडे फिरत होतीं. त्यांस पहातांच येथेंच अपली **पुण्यतीथ** होईल असें समजून **हातीम** अतिशय घाबरला. पुढें थोड्या वेळानें तो धैर्य धरून चालला असतां तीं विक्राळ जनावरें क्षुधाशमनार्थ **हातिमाच्या** आंगावर धांवलीं, व आतां त्यास गट्ट करणार इतक्यांत पूर्वीचा **वृद्ध फकीर** त्या ठिकाणीं उत्पन्न होऊन ह्मणालाः—माझें सांगितलेलें ऐकलें नाहींस ह्मणूनच तूं हा असा पस्ताव्यांत पडलास.

हे **फकिराचे शब्द** ऐकतांच त्याचे चरणावर **हातिमानें** लोटांगण घातलें व झालेल्या अपराधाची क्षमा करण्याबद्दल प्रार्थना

केली, तेव्हां फकीर ह्मणाला:—'बेटा, झालेली गोष्ट परत येत नाहीं; तरी तुजजवळ आस्वलकन्येनें दिलेलें जें मोतीं आहे तें जमिनीवर टाक ह्मणजे संकटमुक्त होशील' असें सांगून तो अंतर्धान पावला. ह्या फकिराच्या सांगण्याप्रमाणें हातिमानें तें अमोल्य मोतीं ताबडतोब पागोव्यांतून काढून जमिनीवर टाकलें. त्याबरोबर ती जमीन प्रथमतः पिंवळया नंतर हिरव्यारंगाची होऊन शेवटीं अगदीं लाल रंगाची झाली. यामुळें जमीनीतून एका प्रकारची ऊष्णता निघूं लागली व ती त्या क्रूर-प्राण्यास असह्य होऊन ते ऐकमेकांशीं भांडून शेवटीं मृत्युमुखीं पडले. हा अद्भुत चमत्कार पाहून हातिमानें ईशस्तवन केलें. नंतर जमिनीवरचें अमोल्यमोतीं उचलून घेऊन तो मार्ग क्रमूं लागला. पुढें कांहीं दिवसांनीं तें मैदान सरून तो पूर्वींपेक्षांही एका घोर अरण्यांत येऊन पोहोंचला. त्या अरण्यांत कांटेऱ्या झाडांची अतिशय गर्दी असल्यामुळें चालतांना हातिमास ते बोंचत; तथापि "दैवीं असेल तें भोगण्यास कुरकुर करून उपयोग नाहीं" असें समजून तो मुकाव्यानें होणारीं दुःखें सहन करीत मार्ग क्रमूं लागला. पुढें एके दिवशीं पूर्वींप्रमाणेंच भयंकर जनावरांनीं हातिमास गांठलें. तेव्हां तो अतिशय भयाभीत झाला. परंतु मागें अशाच समयीं फकिरानें सांगितलेली गोष्ट आठवल्यामुळें त्यानें आपल्या पागोव्यांतून अमोल्य मोतीं काढून जमिनीवर टाकलें. त्याबरोबर पूर्वींप्रमाणें जमिनीचे निरनिराळ्या प्रकारें रंग बदलून तींतून निघणारी उष्णता असह्य झाल्यामुळें त्या क्रूर प्राण्यांनीं आपापसांत भांडून यमलोकाचा रस्ता धरला. तेव्हां निर्भय झाल्यामुळें परमेश्वरस्तवन करून तो मार्ग क्रमावयास लागला.

पुढें जातां जातां कांहीं दिवसांनीं तें अरण्य उल्लंघन करून तो एका भरवस्तीच्या शहराजवळ येऊन पोहोंचला. त्या शहरवासी लोकांनीं जेव्हां हातिमास घोर अरण्याकडून येतांना पाहिलें; तेव्हां त्यांस अतिशय आश्चर्य वाटलें. कारण "त्या मार्गानें येणें जाणें सुरक्षितपणाचें नसल्यामुळें ते लोक लांबच्या रस्त्यानें प्रवास करीत असत. असें असतां हा मनुष्य अरण्याच्या भयंकर मार्गानें सुरक्षित

आला तेव्हां तो मार्ग निर्भय झाला असावा खचित." असा विचार करून त्यांनीं ती गोष्ट आपल्या राजास कळविली. राजानें हातिमास आपल्याजवळ बोलावून आणून सर्व हकीगत विचारली तेव्हां; तो ह्मणाला:—आपल्या समजुती प्रमाणें तेथें क्रूर व भयंकर असे हजारों प्राणी होते खरे, परंतु एका फकिराच्या कृपेनें मी त्या सर्वांचा नाश केल्यामुळें आतां तो रस्ता निर्भय झाला आहे. हातिमानें सांगितलेल्या गोष्टीचा खरेपणा पहण्याकरितां राजानें तत्काळ आपल्या कांहीं सेवकांस त्या घोर अरण्यांतून जाऊन यावयास सांगितलें. व हातिमाची आपल्याच येथें रहाण्याची सोय केली. पुढें चार पांच दिवसांनीं ते सेवक परत येऊन ह्मणाले:—राजाधिराज, त्या अरण्यांत आतां कोणत्याही प्रकारचें भय राहिलें नाहीं. फक्त कांटेरी झाडें अतिशय असल्यामुळें चालण्यास पंचाईत पडते. परंतु जर तीं झाडें काढून टाकून साफ रस्ता केला तर आपणांस प्रवास करण्यास फार उत्तम सोय होणार आहे.

हें सेवकांचें भाषण ऐकून राजा हातिमास ह्मणाला:—मी प्रथमतः आपल्या बोलण्यावर भरंवसा ठेविला नाहीं ही मोठी चूक केली. कारण त्या योगानें आपला अपमान झाला, यास्तव ह्या गोष्टीबद्दल मला क्षमा असावी. हें ऐकून हातीम ह्मणाला:—आपण जें केलेंत तें योग्य केलेंत. कारण कित्येक लबाड लोक आपमतलबाकरीतां हव्यातशा बाता झोडतात. सबब त्यांच्या बोलण्याची खात्री करून घेतल्याशिवाय सुज्ञ पुरुषानें त्यांवर कधींही विश्वास ठेवूं नये. हातिमाचें हें मार्मिक भाषण ऐकून राजास अतिशय आनंद झाला व त्यानें आपल्या जामदारखान्यांतून अपरमित द्रव्य आणून हातिमास दिलें. तेव्हां हातीम ह्मणाला:—मी एकटा असल्यामुळें हें द्रव्य माझ्यानें नेववणार नाहीं. राजा ह्मणाला:—तुमच्या गांवापर्यंत हें मी आपल्या सेवकांकडून पोंचवितों. हातीम ह्मणाला:—तुह्मी ह्मणतां ही सर्व गोष्ट ठीक आहे, परंतु एका मोठ्या महत्वाच्या कामाकरितां मला लांबचा प्रवास करावयाचा आहे. तो करून आल्यावर आपण दिलेल्या भेटीचा मी अंगिकार करीन. राजा म्हणाला:—आपणांस कोठपर्यंत जाव-

याचें आहे? **हातीम** म्हणालाः—पलीकडच्या प्रदेशांत जो **हमा-मबादगिर्द** नांवाचा पर्वत आहे तेथपर्यंत मला जावयाचें आहे. राजा म्हणालाः—आजपर्यंत जितके लोक त्या पर्वताकडे गेले त्यापैकीं कोणीही परत आला नाहीं. यास्तव स्नेहाखातर मी तुम्हांस सांगतों कीं, तो पर्वत पाहण्याची जी आपली मनीषा आहे ती सोडून द्या. **हातीम** ह्मणालाः—तें कांहीं असो. एकदां जो मी तिकडे जाण्याचा निश्चय केला आहे तो कालत्रयींही फिरणार नाहीं. **हातिमाचें** हें निग्रहाचें भाषण ऐकून राजानें आपल्या दोघां हुषार सेवकांस **हातिमास विलासपूर** शहरापर्यंत नेऊन पोंचविण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें सेवक सिद्ध होतांच **हातीम** राजाची रजा घेऊन तेथून निघाला. पुढें कांहीं दिवसांनीं ते **विलासपुरा**सन्निध जाऊन पोहोंचतांच सेवक **हातिमाची** रजा घेऊन परत फिरले. नंतर **हातीम विलास**पुरांत शिरला आणि एका धर्मशाळेंत त्यानें मुक्काम केला. पुढें एक दोन दिवस गेल्यावर कांहीं नजराणा घेऊन तो त्या शहरच्या राजाकडे गेला, व आपण आल्याचा मजकूर सेवकांबरोबर त्यानें राजास कळविला. तेव्हां राजा सेवकांस ह्मणालाः—माझी भेट घेण्याच्या इच्छेनें जो मनुष्य आला आहे त्याचें नांव काय? व कोणत्या उद्देशानें तो येथें आला आहे? याची चवकशी करून या. आज्ञेप्रमाणें सेवकांनीं जाऊन **हातिमास** विचारलें तेव्हां तो ह्मणाला, मी **इमन**देशाचा राहणारा असून माझें नांव **हातीम** असें आहे. येथील राजाच्या सुस्वभावाची कीर्ति ऐकल्यामुळें एकवेळ भेट घेण्याच्या इच्छेनें आलों आहें.

**हातिमाचें** हें ह्मणणें सेवकांनीं जाऊन राजास कळविलें; तेव्हां राजानें त्यास आंत घेऊन येण्याविषयीं आज्ञा केली. त्याप्रमाणें **हातीम** आंत येतांच राजानें त्यास आपल्या शेजारीं बसविलें. पुढें कांहीं वेळ उभयतांचे कुशल प्रश्न झाल्यावर **हातिमानें** बरोबर आणलेला नजराणा राजापुढें ठेविला. तो अमोल्य नजराणा पाहून राजास अतिशय आनंद झाला. पुढें उभयतांचें अनेक विषयांवर बोलणें झालें; त्यावरून त्याची हुषारी, मर्यादशीलता, व चातुर्य हीं पाहून कांहीं दिवसपर्यंत त्यानें **हातिमास विलासपुरांत** राहण्या-

चा आग्रह केला, व ती गोष्ट त्यानें मान्य केली. नंतर कांहीं वेळानें **हातीम** राजाज्ञा घेऊन तेथून निघून धर्मशाळेंत आला. पुढें नित्यशः एकवेळ राजदर्शनास जाण्याचा क्रम ठेविला असतां एके दिवशीं बहुमोल नजराणा त्यानें राजास अर्पण केला. तो पाहून राजा अतिशय आनंदभरित होऊन ह्मणालाः—आज पर्यंत नजराण्या दाखल जें द्रव्य आपण मला दिलेंत त्याचा मोबदला माझ्याकडून कांहींच झाला नाहीं. **हातीम** ह्मणालाः—आपण मजबरोबर जी मित्रत्वानें वर्तणुक केलीत तिची किंमत मी दिलेल्या नजराण्यापेक्षां शतपटीनें जास्त आहे. आतां मोबदला करण्याची जर आपली इच्छाच असेल तर माझी जी मनिषा आहे ती पूर्ण करा. राजा ह्मणालाः—जें तुझ्या मनांत असेल तें निर्धास्त रीतीनें बोल. माझ्यानें होईल तितका प्रयत्न करून तुझी इच्छा पूर्ण करीन.

राजानें प्रसन्न मनानें केलेलें हें भाषण ऐकून **हातीम** ह्मणालाः- आपल्या राज्य सीमेंत जो **हमामबादगिर्द** नांवचा पर्वत आहे तो एक वेळ स्वदृष्टीनें पहाण्याची मला अतिशय इच्छा झाली आहे. तरी तिकडे जाण्याविषयीं महाराजांनीं कृपाळू होऊन परवानगी द्यावी. **हातिमाचें** हें भाषण ऐकतांच राजा खिन्न वदन करून ह्मणालाः—तुह्मी माझ्याजवळ जें मागणें मागितलेंत तें मान्य करण्यास पुष्कळ अडचणी आहेत. त्यापैकीं पहिली अडचण ही आहे कीं, **हमामबादगिर्दकडे** कोणाही मनुष्यास जाऊं द्यावयाचें नाहीं, अशाविषयीं मी शपथ घेतली आहे. दुसरी अडचण अशी आहे कीं, तुह्मी माझे परम मित्र असून तुह्मास जाणून बुजून मृत्यूच्या घरांत दवडण्याविषयीं मला अतिशय वाईट वाटतें. कारण आजपर्यंत तिकडे जे मनुष्य गेले त्या पैकीं कोणीच परत आला नाहीं. इतक्यांत मध्येंच **हातीम** ह्मणालाः—त्या विषयीं तुह्मी बिलकूल काळजी करूं नका. कारण आजपर्यंत लोखंडाच्या मनुष्यासही सोसणें कठीण अशा प्रकारचीं अनेक संकटें मी अनुभविलीं आहेत असें ह्मणून त्यानें **मुनीरशहा** करितां **हस्नबानूच्या** सहा प्रश्नचा उलगडा केल्याविषयींची सर्व हकीगत निवेदन केली. ती ऐकतांच राजा म्हणालाः—हे परोपकारी मनुष्या, अशी जर तुझी परोप-

कार बुद्धि आहे तर **हमामबादगिर्द**कडून आपण विजयी होऊन याल असें मला वाटतें सबब तिकडे जाण्याची मी तुम्हांस परवानगी देतों.

इतकें बोलणें झाल्यावर राजानें **हमामबादगिर्द**च्या रखवालदारांस एक पत्र लिहून तें **हातिमा**जवळ दिलें, आणि तेथपर्यंत सुखरूपतेनें पोंचविण्याची आपल्या सेवकांस आज्ञा केली. नंतर दुसरे दिवशींच राजाज्ञा घेऊन **हातीम** सेवकां बरोबर तिकडे जाण्यास निघाला. पुढें दरकुच दरमजल करीत करीत जेव्हां ते **हमामबादगिर्द**जवळ येऊन पोहोंचले तेव्हां **हातिमानें विलासपूरच्या** राजानें दिलेलें पत्र तेथील रखवालदारांच्या स्वाधीन केलें. त्यांत "सदर्हू मनुष्यास **हमामबादगिर्द** पर्वत पाहाण्याची परवानगी दिली आहे. परंतु जर तो स्वखुषीनें त्या पर्वतामधील भयंकर ठिकाणीं न जाईल अशी तजवीज कराल तर मजकडून आपणांस मोठें बक्षीस मिळेल " हा मजकूर पाहून रखवालदारानें तें पत्र आपल्या जवळ ठेवलें आणि सेवकांस परत जाण्याची आज्ञा करून **हातिमास** बरोबर घेऊन आपल्या घरीं गेला. पुढें एक दोन दिवस पाहुणचार झाल्यावर रखवालदारानें **हमामबादगिर्द**कडे न जाण्याविषयीं **हातिमास** फारच आग्रह केला. परंतु तो जेव्हां ऐकेना तेव्हां निरुपायास्तव त्या पर्वतामधील **हमामखान्याच्या** दरवाज्यापर्यंत त्यानें त्यास नेऊन पोहोंचविलें. तो दरवाजा दोन माड उंच असून त्याचे शेजारच्या भिंतीवर " ह्या पर्वतामधील **हमामखान्यांत शूरसेनराजानें** जें **इंद्रजाल** करून ठेवलें आहे तें बहुत काळपर्यंत राहणारें असून तिकडे जो मनुष्य जाईल त्यास क्षुधेची व तृषेची पीडा न होतां तो कधींही परत येणार नाहीं " असें लिहिलें होतें. हा लेख वाचून 'मिळाली एवढी माहिती पुरे आहे; व आतां येथून परत जावें' असें **हातिमास** वाटलें; परंतु बराचवेळ विचार केल्यावर तें स्थळ एकवेळ स्वदृष्टीनें पहाण्याचा निश्चय करून तो रखवालदारांस सलाम करून मार्ग—क्रमूं लागला.

पुढें कांहीं वेळ गेल्यावर मागें फिरून पहातो तों ज्या दरवाज्यांतून आपण आलों तो दरवाजा व रखवालदार ह्या पैकीं को-

र्णीच दिसत नाहीं. हें पाहून त्यास फारच आश्चर्य वाटलें, व अनेक प्रकारचे तरंग त्याच्या अंतःकरणावर उद्भवूं लागले. अशा स्थितींत कांहीं वेळ गेला नाहीं तोंच एक मनुष्य आपणाकडे येत आहे असें त्यानें पाहिलें. त्यावेळीं त्याच्या जिवास थोडेसें समाधान वाटून येथें कोठेंतरी मनुष्य-वस्ती असेल अशी त्यानें कल्पना केली. पुढें तो मनुष्य अगदीं जवळ आल्यावर **हातिमानें** त्यास सलाम केला. तेव्हां त्या मनुष्यानें **हातिमाच्या** हातांत एक आरसा दिला मग मोठ्या औत्सुक्यानें त्यांत तो पाहूं लागला असतां एक **हमामखाना** त्याचे नजरेस पडला. नंतर **हातीम** ह्मणालाः—तूं ह्या **हमामखान्या** मधील नोकर आहेस काय ? तो मनुष्य ह्मणालाः—होय महाराज. त्यावर **हातीम** ह्मणालाः—बरें, तर तो **हमामखाना** कोठें आहे हें मला दाखीव. नंतर तो मनुष्य ह्मणालाः—येथून थोडक्याच अंतरावर तो **हमामखाना** आहे यास्तव मजबरोबर आपण चलावें. **हातिमानें** ती गोष्ट मान्य केल्यावर ते उभयतांही तेथून निघाले. वाटेनें चालत असतां तो मनुष्य ह्मणालाः—परदेशस्थ जे मनुष्य **हमामखाना** पहाण्याच्या इराद्यानें येथें येतात त्यांची उत्तम रीतीची बरदास्त ठेवण्याचें काम माझ्याकडे आहे. ह्या कामावर आणखीही बरेच लोक आहेत परंतु आजची पाळी माझी आहे. **हातीम** ह्मणालाः—जर तूं माझी उत्तम रीतीची बरदास्त ठेवशील तर तुझ्या मेहनती बद्दल मी चांगलें बक्षीस देईन. नौकरानें ती गोष्ट मान्य केली; इतक्यांत ते उभयतां **हमामखान्या**जवळ येऊन दाखल झाले. ही इमारत फारच सुंदर असून तिला एक अति ऊंच शिखर होतें. त्या शिखराकडे **हातीम** निरखून पाहत असतां तो नोकर आंत गेला व आपल्या मागून येण्याविषयीं त्यानें **हातिमास** खुणाविलें. त्याप्राणें तो आंत गेल्यावर लाल दगडांनीं बांधलेली एक पुष्करणी त्यास लागली. तेथपर्यंत गेल्यावर तो नौकर ह्मणालाः—ह्या पुष्करणींत उतरावें ह्मणजे मी आपल्या आंगावर पाणी ओततों. हें त्याचें भाषण ऐकून **हातिमानें** आंगांतील कपडे काढून ठेऊन पुष्करणींत उतरला त्याबरोबर त्या नौकरानें पाण्यानें भरलेले तीन तांबे **हातिमाच्या**

अंगावर ओतले. इतक्यांत प्रळयकाळाप्रमाणें मोठा गडगडाट होऊन अंधकारानें सर्व दिशा व्यापून गेल्या. पुढें कांहीं वेळानें सर्व अरिष्टाची जरासी शांतता झाल्यावर **हातीम** चोहोंकडे भयाभीत मुद्रेनें पाहूं लागला असतां **हमामखान्यावरील** अति ऊंच शिखर वाढत असलेलें त्याच्या नजरेस पडलें. इतक्यांत ज्या पुष्करणींत **हातीम** उभा होता तींतील पाणी वर चढत चाललें, व थोडक्याच वेळांत आसपासचा सर्व प्रदेश जलमय झाला.

हा अद्भुत चमत्कार पाहून **हातिम** अतिशय भयाभीत झाला व त्या पुष्करणींतून बाहेर निघण्याचा प्रयत्न करूं लागला. परंतु बाहेर कसें निघावयाचें हें माहीत नसल्यामुळें त्याचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. पुढें कांहीं वेळानें पाणी अतिशय वाढल्यामुळें **हातिमाचे** पाय जमीनीपासून सुटले; तेव्हां तो पोहूं लागला. नंतर त्या भयंकर स्थितींत तो आपल्याशीं ह्मणालाः—माझ्या मित्रांनीं ह्या भानगडींत न पडण्याविषयीं उपदेश केला असतां त्याचें न ऐकतां मी आपला हेका चालविला त्याचें हें फळ मला भोगावें लागत आहे. असो, **ब्रह्मदेवानें** जें ललाटीं लेखन केलें आहे त्याप्रमाणें घडल्या शिवाय कधींही रहावयाचें नाहीं. असा विचार तो करीत आहे इतक्यांत तें पाणी शिखरापर्यंत पोंचल्यामुळें **हातिमानें** मोठ्या उत्सुकतेनें त्या शिखरास धरलें. त्या बरोबर विद्युल्लतेच्या गर्जनेप्रमाणें मोठी गर्जना झाली व 'आपण एका घोर अरण्यांत उभे आहों' असें त्यास वाटलें. नंतर ईशस्तवन करून तो पुढें चालला असतां एक अतिशय सुंदर महाल त्याच्या नजरेस पडला. त्या महालाचा दरवाजा उघडाच असल्यामुळें तो आंत गेला. जाण्या पेक्षां बाहेर असणें चांगलें, असें वाटल्यावरून तो ज्या दरवाज्यांतून आंत शिरला होता त्यांतून बाहेर येण्याकरितां इकडे तिकडे फिरूं लागला. परंतु तो न सांपडल्यामुळें आपली अजून **इंद्रजालांतून** सुटका झाली नाहीं असें त्यास वाटलें. नंतर तो त्या महालांत इकडे तिकडे फिरत असतां खाण्याचे पुष्कळ पदार्थ **दृष्टीस** पडल्यावरून त्यांपैकीं त्यानें बरेच भक्षण केलें. तरी ही त्याची तृप्ती झाली नाहीं हें पाहून तो अतिशय चकित झाला.

पुढें त्या महालांतील मुख्य दालनांत गेल्यावर संगमरवरी दगडाचे पुष्कळ पुतळे खालील फरसबंदींत अर्धे पुरलेले त्याच्या दृष्टीस पडले, तेव्हां नानाप्रकारचे तरंग त्याच्या मनवर उद्भवूं लागले इतक्यांत तेथें असलेला एक पोपट मनुष्यवाणीनें ह्मणालाः—हे मानवी प्राण्या, ह्या ऐंद्रजालिक फेऱ्यांत सांपडून आपल्या अमोलिक प्राणास व्यर्थ धोक्यांत कां घातलेंस ? पोपटाचें हें भाषण ऐकून हातीम साशंक मुद्रेनें चोहोंकडे पाहूं लागला असतां एका संगमरवरी दगडावर कोरलेला एक लेख त्याच्या नजरेस पडला. तेव्हां मोठ्या उत्सुकतेनें तो त्या लेखाजवळ गेला आणि एकाग्र चित्तानें वाचूं लागला असतां “ हे मनुष्य प्राण्या, येथ पर्यंत तूं आलास खरा; परंतु आतां तुझी येथून कधींहीं सुटका होणार नाहीं. कारण हें सर्व इंद्रजाल शूरसेन राजानें उत्पन्न केलें आहे. तें अशाकरितां कीं, सदहू राजा एके वेळीं ह्या ठिकाणीं सहल करण्याकरितां आला असतां त्याजला एक अमोल्य हिरा सांपडला. त्याच्या जोडीचा हिरा मिळविण्या विषयीं त्यानें पुष्कळ यत्न केला; परंतु जेव्हां तो मिळेना तेव्हां असलें अमोल्य रत्न परक्याच्या हातीं लागूं नये ह्मणून अनेक जादुगारांच्या मदतीनें त्यानें हें इंद्रजाल निर्माण केलें व हा रमणिय महाल बांधून तें अमोल्य रत्न एका ऐंद्रजालिक पोपटाच्या पोटांत घालून त्यास ह्या महालांत टेवलें. आतां येथें येणाऱ्या मनुष्याच्या मनांत जर आपली सुटका करून घेणें असेल तर ह्या माहलांतील मुख्य दिवाणखान्यांत एका सुवर्ण—चौरंगावर एक धनुष्यबाण ठेवलें आहे, तें घेऊन त्या पोपटास तीन तीक्ष्ण बाण मारून त्याचा प्राण घ्यावा व तें अमोल्य रत्न आपल्या हस्तगत करून घ्यावें; म्हणजे त्याची ह्या इंद्रजालांतून सुटका होईल. परंतु तीन बाण मारून जर त्याची कार्य सिद्धी होणार नाहीं तर त्यास संगमरवरी दगडाचा पुतळा होऊन राहणें भाग पडेल. ”

हा लेख वाचून हातिमानें विचार केला कीं, ह्या ठिकाणीं जे हे दगडी पुतळे आहेत ते माझ्याच सारखा हेका धरून शेवटीं फसले गेले आहेत. आतां त्यांच्या प्रमाणेंच जर माझी स्थिति व्हा-

वयाची असेल तर कांहीं चुकावयाची नाहीं. परंतु ह्या कामांत मी विजयी व्हावें असा जर ईश्वरी संकेत असला तर तो ह्या वेळीं माझें साह्य करील; यांत बिलकूल शंका नाहीं. असा विचार करून त्यानें दिवाणखान्यांत जाऊन धनुष्य बाण आणलें, व पोपटाच्या पिंजऱ्या समोर उभें राहून एक बाण सोडला; परंतु तो पोपट त्वराकरून पिंजऱ्यावर जाऊन बसल्यामुळें हातिमाचा एक बाण फुकट गेला. त्या बरोबर त्याचें गुडघ्यापर्यंत शरीर संगमरवरी दगडाचें बनलें. तेव्हां तो पोपट मनुष्य वाणीनें पुनः ह्मणालाः—हे मनुष्या, अजून तरी तूं आपला हात आटोप ! नाहींतर ह्याही पेक्षां जास्त दुःख तुला भोगावें लागेल ! पोपटाचें हें भाषण ऐकून हातीम रडूं लागला. पुढें कांहीं वेळानें त्यानें विचार केला कीं, "हातीं धरलेलें काम अर्धवट टाकणें हें सुज्ञ मनुष्यास उचित नाहीं" असें वाडवडील सांगत आले; या न्यायानें आणखी दोन प्रयत्न करून नशिबाची परीक्षा पाहण्याची जर आपणास सवड आहे तर ती व्यर्थ कां दवडावी. असा विचार करून त्यानें धनुष्य बाण हातीं घेतलें व पोपटाचें मर्मस्थळ लक्षून दुसरा बाण सोडला. परंतु त्यानें तो मोठ्या शिताफीनें चुकविल्यामुळें हातिमाचें अर्धें शरीर संगमरवरी दगडाचें बनलें. ह्यावेळीं हातिमास अतिशय दुःख झालें. तरी "कुडींत प्राण आहे तों पर्यंत प्रयत्न करून पहावयाचाच" असा निश्चय करून त्यानें कांहीं वेळ जगदीशाची प्रार्थना केली. नंतर पोपटाचें कंठस्थल लक्षुन त्यानें तिसरा बाण सोडला, त्या बरोबर तो पोपट मृत होऊन पिंजऱ्यांतून खालीं पडला. ह्यावेळीं प्रळयकाळाप्रमाणें मोठी गर्जना झाली व अंधकारानें सर्व दिशा व्याप्त झाल्या. हा विलक्षण प्रकार पाहून तो अतिशय भयाभीत झाला.

पुढें कांहीं वेळानें सर्वत्र शांतता झाल्यावर हातीम चोहोंकडे पाहूं लागला तों महाल वगैरे सर्व इंद्रजाल अदृश्य झालें असून ज्या ठिकाणीं पोपटाचें कलेवर पडलें होतें त्या ठिकाणीं एक अति तेजस्वी हिरा पडला आहे. हें पाहून हातिमानें मोठ्या उत्कुकतेनें तो हिरा उचलला. त्या बरोबर तेथें जे संगमरवरी दगडाचे पुतळे

होते ते मनुष्यरूपी होऊन हातिमाच्या पायांवर गडबडा लोळूं लागले. नंतर हातिमानें सर्वांस उठविलें तेव्हां ते ह्मणाले:—आमची ह्या इंद्रजालांतून सुटका कशी झाली? ती मेहेरबानी करून आह्मांस कळवा. हें ऐकून हातिमानें त्यांस सर्व हकीगत निवेदन केली. तेव्हां ते ह्मणाले:—हे उदार पुरुषा, आह्मासर्वांवर आपले जे उपकार झाले आहेत ते कधींही फिटावयाचे नाहींत. इतकें बोलणें झाल्यावर हातीम त्या सर्वांसह तेथून निघाला. पुढें मार्गांत त्यास हमामबादगिर्देचे रक्षण करणारे कित्येक रखवालदार भेटले. त्यांस हातिमानें सर्व हकीगत कळवितांच, तेही आनंदकारक बातमी आपल्या राजास सांगण्याकरितां त्वरेनें निघून गेले. नंतर मजल दरमजल करीत कांहीं दिवसांनीं हातीम, विलासपुरास पोहोंचल्यावर त्यानें राजांची भेट घेऊन सर्व वर्तमान निवेदन केलें. नंतर एक दोन दिवस राहिल्यावर जेव्हां हातीम शहाबादेस जाण्या करितां निघाला तेव्हां राजास ह्मणाला:—आपण मला हमामबादगिर्दकडे जाण्याची परवानगी दिलीत त्याबद्दल उतराई होण्या करितां जें अमोल्य रत्न मी त्या पर्वतावरून आणलें आहें तें तुह्मांस देण्याचा माझा हेतू आहे; परंतु शहाबादेस पोंचल्यावर हस्नबानूस तें दाखवून मग मी तुह्माकडेस पाठवून देईन. आतां माझी एक विनंती आहे ती ही कीं, हमामबादगिर्द पर्वतावरील इंद्रजालांतून मुक्त करून जे हे मनुष्य मी बरोबर आणले आहेत त्यांस कोणाचाच आश्रय नसल्यामुळें आपण आश्रय द्यावा. राजानें ती गोष्ट मान्य करतांच हातीम त्या सर्वांची रजा घेऊन निघाला.

पुढें मजले मजलेनें कांहीं दिवसांनीं तो शहाबादेस येऊन पोहोंचल्यावर ज्या धर्मशाळेंत मुनीरशहा राहिला होता तेथें गेला. नंतर उभयतांच्याही भेटी झाल्यावर हातिमानें आपल्या प्रवासाची सर्व हकीगत त्यास निवेदन केली. ती ऐकतांच मुनीरशहाच्या डोळयांतून आनंदाश्रू वाहूं लागले. तें पाहून हातिमानें त्याची समजूत केली. नंतर ते उभयतांही हस्नबानूच्या महालीं गेले. त्यावेळीं हातिमास कार्य—सिद्धी करून आलेला पाहून तिला जो

आनंद झाला तो कांहीं सांगतां येत नाहीं. पुढें कांहींवेळ उभयतांचें ही क्षेमकुशल झाल्यावर **हातिमानें** सप्तपर्यटणाची सर्व हकीगत निवेदन करून पुराव्या करितां बरोबर आणलेलें अमोल्य रत्न तिला दाखविलें. तेव्हां **बानू** ह्मणाली:—कराराप्रमाणें तुह्मी माझ्या सातही प्रश्नाचा निकाल केला, तरी आतां आपण जी आज्ञा कराल ती मान्य करण्यास मी सिद्ध आहें. हें तिचें भाषण एकून **हातीम** ह्मणाला:—ज्याच्याकरितां अश्रांत श्रम सोसून मी सातही प्रश्नांचा उलगडा केला असा जो माझा मित्र **मुनीरशहा** त्याज बरोबर तूं विवाह करावास, अशी माझी इच्छा आहे. **हातिमाचें** हें भाषण **बानूनें** मान्य करून तिनें आपल्या गुरूस बोलावून आणलें आणि सुमुहूर्त पाहून लग्नाची सर्व सिद्धता करविली. पुढें मोठ्या थाटामाटानें **मुनीरशहाचें** व **हस्नबानूचें** लग्न सुमुहूर्तावर लागल्ययावर **हातीम** एक महिनापर्यंत **शहाबादेंत** राहिला. **हमामबादागिर्द**वरून आणलेला हिरा त्यानें सेवक हस्तें **विलासपुरास** पाठवून दिल्यावर **मुनीरशहा**जवळ स्वदेशीं जाण्याची परवानगी मागितली. त्यावेळीं **मुनीरशहा** हातिमाच्या पायांवर गडबडां लोळून ह्मणाला:—आपले जे मजवर उपकार झाले आहेत ते यावज्जन्म फिटणार नाहींत. हें ऐकून **हातीम** त्यास पोटाशीं धरून ह्मणाला:—मी जे श्रम केले आहेत त्याची सफलता झालेली पाहून मला जो आनंद झाला आहे तो कांहीं सांगतां येत नाहीं. असो, आतां तुह्मी उभयतांही सुखसंतोषानें काल–क्रमण करा, ह्मणजे झालें. असें ह्मणून **बानूची** व **मुनीरशहाची** रजा घेऊन तो **इमन**शहरास जाण्या करितां तेथून निघाला.

पुढें कांहीं दिवसांनीं **इमन** शहरास पोहोंचल्यावर नगरांतील लोकांनीं त्याजवर पुष्पवृष्टी करून घरोघरीं उत्साह केले. नंतर तो स्वगृहीं गेल्यावर माता पित्यांस भेटला; तेव्हां त्यांनींही मोठा

उत्साह करून गरीब गुरीबांस पुष्कळ दानधर्म केला. पुढें सुमुहूर्त पाहून ताई राजानें हातिमास राज्याभिषेक केल्यावर त्यानें पुष्कळ दिवसपर्यंत प्रजेचें पुत्रवत् पालन करून चोहोंमुलखीं आपला कीर्तिध्वज फडकाविला. व परमेश्वर कृपेनें अंतीं सद्गति पावला.

प्रश्न ७ वा समाप्त.




